






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






अनुक्रमणिका








१९६५

















# नवी अस्मिता आज फुले

**या मातीच्या कणाकणांना शौर्याचें वरदानच आहे.**
**या मातीच्या कणाकणांना समर्पणाचे वेडच आहे.**
**या मातीच्या कणाकणांमधि अपमानाची चीडच आहे.**
**या मातीच्या कणाकणांमधि त्यागाची पण चाडहि आहे.**

अशी ही माती! माथ्यावर हिमकिरीट, भाळीं काश्मीरच्या बिंदिया, पायांत सागराचे नुपुर, कमरेला सह्याद्रीचा सुवर्णपट्टा एका हातीं द्वारका, सोमनाथाचे सुवर्णालंकार तर दुसऱ्या हातीं बिहार, बंगालसारखे विद्वत्ता, कलांचे अलंकार. गळ्यांत पंच नद्यांची सुवर्णभूमि. अशी व ह्यासारख्या अनेक अलंकारांनीं नटलेली भूमि! इथें दाराला कुलुपें न लावतां यात्रेला जाण्यासारखी नीति नांदूं शकते. इथेंच पाहुण्यांना तृप्त करण्यासाठीं स्वपुत्राचें मांस शिजविले जाऊं शकते. इथेंच स्वप्नांत दिलेलीं वचनें पाळण्यासाठीं स्वतःच्या जीवनाचें सर्वस्व दिलें जाऊं शकते. 'आधीं लगीन कोंडाण्याचें' म्हणणारा व रणांगणावर लढून वीरगति पत्करणारा मराठा जन्मूं शकतो. अशी ही वेडी माती आणि तिचे वेडे सुपुत्र! आजवर ह्या मातीवर अनेक महत्वाकांक्षी माणसें चालून आलीं. पण अवध्योऽहम्, अजिक्योऽहम् अशाच तऱ्हेचा हुंकार ह्या मातीनें दिला आहे. आजही ती देत आहे.

गेल्या तीन महिन्यांत पुन्हां एकदां हेंच घडलें. शक, हूण, शिकंदर, अब्दाली या सऱ्यांचा गाळीव अर्क जणूं पाकच्या रूपानें पुन्हां एकदां ह्या मातीवर चालून आला. आणि पुन्हां ह्या मातीनें आपलें समर्पणाचे, ऐक्याचे, बलिदानानें अमर होण्याचें, धैर्याचे, आणि अतुल पराक्रमाचे एक नवें भारत लिहायला सुरुवात केली आहे. केली आहे असेंच आम्हीं म्हणतो कारण तो संगर अजून संपलेला नाहीं. अजूनही सैतान 'शांत' झाला नाहीं. आणि देवांचा विजय–अंतिम विजय झालेला नाहीं. हें महाभारत लिहिण्यासाठीं जे वीरवर पुढें सरसावले, त्यांना आम्हीं अभिवादन करतो. आज घडविल्या जाणाऱ्या नव्या, तेजस्वी, अस्मितायुक्त, स्वाभिमानी. इतिहासाचे तेच खरे शिल्पकार आहेत. 'इंच इंच लढवूं' हा त्यांचाच निर्धार जणुं आमचा एखादा भाट, चारण गातो. पण कृति घडते जवानांची! काश्मीरपासून राजस्थानपर्यंत रणकुंड पेटले आहे. कांहीं गांवें भस्मसात् झाली आहेत, तर कांहींचें जीवन उध्वस्त झाले आहे. पण तरीहि 'अनादि मी, अजिक्य मी, अवध्य मी, अदह्य' मी असा निर्धारच जणुं आमच्या जवानांनीं कृतीनें सिद्ध केला आहे. त्या कृतीची गाथा आतां क्षणाक्षणाला प्रकाशांत येत आहे. आकाशांतलें आपलें श्रेष्ठत्व सिद्ध करणारे वैमानिक, विमान विध्वंसक तोफखान्याचा एखादा राजू–गुरुबक्षसिंग, पथानिया, कीलर, रामचंदानी, मदन खरे–किती नांवें सांगूं? भारतीय एकात्मता ही एक 'प्रकृति' आहे. आणि 'प्रकृति' प्रसंगांप्रसंगांतून कसोटीचा देत असते. ठरावांनीं ती सिद्ध (वा नष्ट) होत नाहीं. भारतीय जवानांनी हें सिद्ध केले आहे. तिथे मुसलमान हा एका 'इस्लामी' शत्रूविरुद्ध प्राणपणानें लढला. हे सारे एकात्म भावाने लढले. अनेक जागतिक विक्रम सिद्ध करण्याच्या जिद्दीनें लढले. अनेक चमत्कार केले. जगही थक्क झाले. इथें "सेनापति" हे "पर्यंकपति" झाले नाहींत. त्यांनीं सेनांना नेतृत्व दिले–प्रसंगी बलिदानांचेहि मोल देऊन! अशा असंख्य ज्ञात, अज्ञात वीरांनीं घडविले आहे हे आधुनिक भारत! आणि अशांच्या समर्पणांतून, पराक्रमांतून, त्यागांतून घडत असतात तेजस्वी राष्ट्रें! ह्या आधुनिक भारतांत काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत एकच हुंकार उत्स्फूर्तपणें गरजला "जय जवान! जय भारत!!" जवानांचें आणि जनतेचें हें एकात्म नातें आज नवा इतिहास लिहायला बसलें आहे. ह्या क्रांतीचे शिल्पकार म्हणून जवानांनो, तुम्हांला अभिवादन असो.

आधुनिक भारताच्या मानकऱ्यांनो, शिल्पकारानों, माना देऊनही ह्या मातेची 'शान' राखणाऱ्या कर्मवीरांनो. मृत्यूवर झेपावत जाणाऱ्या आकाशपतंगांनो, प्रत्येक तोफेचा गोळा अचूक मारून शत्रूचीं विमानें टिपणाऱ्या राजूंनो, तुम्हांला प्रणाम! तुमच्या पराक्रमाला अभिवादन! तुमच्या त्यागाला हा मानाचा मुजरा! तुमच्या त्यागाला 'दीपावली' चें हें 'सन्मानपुष्प' अर्पण करतो. जय जवान! जय-भारत!

**– संपादक**







अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





भारत सरकारचें १९६५ चें श्रेष्ठता प्रमाणपत्र विजेते मराठी

दीपावली वार्षिक
(नोव्हेंबर १९६५)
वर्ष २२ वे
मूल्य ३॥ रु.

# दीपावली

संपादक
चित्रकार दीनानाथ दलाल.

## श्रेयनामावली—

- इंद्रधनुष्यी कलाकृति : रंगविलासी :– नायिका, गायिका, अभिनायिका, शृंगार नायिका व नृत्य तांडव (भेट)
- तीन रंग चित्र माला : मराठी पत्रकार टॅव्लो, मराठा गडी (अप)यशाचा धनी, दीपावली' चा (वार्षिक) नाटचोत्सव. युद्धबंदीसह ब्लॅकआउट झालाच पाहिजे व आणखी फुलबाज्या, भुईनळे आणि हॅड्रोजन बॉम्बस्
- खास युद्धचित्रें : आज घडतसे हे रामायण, शांता जेव्हां दुर्गा होते, कामधेनु ही वीरप्रसवा, स्तंभामधुनी रुद्र प्रगटला.
- कथा : पु. भा. भावे • अरविंद गोखले • वामन चोरघडे • अच्युत बर्वे • गोपाळकृष्ण भोबे • वि. वा. पत्की
- ना. व्यं. देशपांडे • प्रभाकर अंत्रे • सुरेश वेंगुर्लेकर • सरोजिनी बाबर • जितेंद्र अभिषेकी • सिनिक्
- विनोदी कथा, लेख : पु. ल. देशपांडे • जयवंत दळवी • पद्माकर गोवईकर • राजाराम हुमणे.
- खास लेख : न. वि. गाडगीळ • अरविंद ताटके • वा. रा. कान्त.
- कविता : कुसुमाग्रज • बा. भ. बोरकर • इंदिरा • राजा बढे • वि. म. कुलकर्णी • मंगेश पाडगांवकर
- शांता शेळके • मधुकर केचे • दिलीप पु. चित्रे • वा. रा. कान्त.

झेंडूचे गोंडे [ विडंबनें ]— ह. शि. खरात.

– आणि –

**"मला परदेशांत भेटलेली अविस्मरणीय स्त्री"**

अरविंद गोखले, अच्युत बर्वे, सदानंद रेगे, जयवंत दळवी, रमेश मंत्री, प्रा. अनंत काणेकर, दिलीप चित्रे, शंकर सारडा व वसंत देशमुख.

टे. नं.
Gram

संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. यांनीं स्टेट्स पिपल प्रेस, जन्मभूमि भवन घोगा स्ट्रीट येथें छापले. या प्रतीस किंमत ३॥ रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अविकृत मतें असतातच असें नाहीं. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI • Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay – 4.



अनुक्रमणिका

**ती माझ्या खूप जवळ आली. आणि मग दूर गेली रस्त्यांत**
**ओळखही न दाखविण्याइतकी—**
**—आणि तरीही मला खंत वाटली नाहीं.**

शिरीन आज मी तुला तुझ्या नवऱ्यावरोबर जातांना पाहिलं. वाटेच्या कडेलाच मी माझी फटफटी थांबवून उभा होतो. व्होराशीं बोलत होतो. व्होरानंहि तुला पाहिलं.

"ती पहा शिरीन दस्तूर !" व्होरा मला कोपरखळी मारून म्हणाला. "आतां ओळखसुद्धां दाखवायला रिकामी नाहीं. मारे नवऱ्याच्या हातांत हात अडकवून हिंडते आहे. तुमच्या हातांत हात अडकवून अशीच ती किती फिरली, हें त्या पंजाबी लालाला कळलं, तर त्याला झीट येईल."

"कांहीं झीट यायला नको." मी उत्तर दिलं. "वाढलेल्या मुलीशीं लग्न करतांना ह्या गोष्टी पुरुषांनीं आतां गृहित धरायला पाहिजेत !"

"काय गृहित धरायला पाहिजे ?" गुलाबचंद व्होरा उसळून म्हणाला "चोवीस वर्षांची बी. ए. झालेली शहाणीसुरती मुलगी तुमच्यासारख्या पन्नाशीला टेकलेल्या पुरुषासाठीं पागल झाली होती हें तिच्या तरण्याताठ्या नवऱ्यानं गृहित धरायचं ?"

"वाटेल ते गृहित धरायला चिंता नाहीं." मी म्हणालो "अविवाहित मुलींची ती अवस्थाच मुळीं मोठी चमत्कारिक असते. तेव्हां त्यांना कांहीं गोष्टी कळतच नाहींत आणि कांहीं गोष्टी कळतात पण वळत नाहींत."

"असेल बुवा!" व्होरा पंजे उलथे करून म्हणाला "पण ती तुमच्या-वर कशासाठीं भाळली होती, हें अद्याप मला नीटसं कळलेलं नाहीं."

"ते तिलाही नीटसं कळलं नसेल." मी म्हणालो. "सगळं कळून सवरून ह्या गोष्टी चाललेल्या नसतात आणि असतातहि !"

"हें कोड्यांतल्यासारखं बोलणं झालं !" व्होरा उद्गारला.

"कोड्यासारखंच ते कांहींतरी आहे." मी उत्तरलो. आणि क्षणभर थांबून म्हणालो "तुला दाद न देतां ती माझ्याकडे आली. ह्याचं तुला नवल वाटत आहे कां ?"

"होय." व्होरा म्हणाला "नवल वाटत आहे आणि थोडं वाईटहि. खरं म्हणजे मी तुमच्यापेक्षां जास्त तरुण . . . ."

"म्हणजे चाळीसावं वर्ष चालू असलेला." मी हंसून उद्गारलो.

"पण पन्नासापेक्षां चाळीस कमीच कीं नाहीं ?" व्होरा म्हणाला. "पुन्हां आम्हीं दोघंही गुजराती बोलणारे, माझं घर तिच्या घरापासून जवळ, कार्यालयांतहि आम्ही जवळ जवळ बसत होतो, तरी तिची धांव पहावी तो तुमच्याकडे. . . !"

"तूं तिला एकंदरींत ठेंगणा वाटलास !" मी संपत आलेली सिगारेट फेंकत म्हणालो.

"तुम्हीं तिच्यापेक्षां जास्त उंच आहांत हे खरं आहे." व्होरा विचार करीत म्हणाला "पांच फूट साडेपांच इंच उंचीची ही पारशी पोरटी. आम्हांला नाहीं तेवढी उंची मिळालेली. देवानें तुम्हांला सहा फूट लांबीचा भक्कम देह दिला आहे. तुमचा पगारहि आमच्यापेक्षां जास्त. कंपनींत अधिकार जास्त मोठा. तुमचं बोलणं थोडं पण त्यांत चातुर्य विशेष. तिच्यासारखीच तुम्हांला पुस्तकांची आणि सिनेमा-नाटकांची आवड मोठी. आणखी तुमचं वय मोठं त्यामुळें अनुभवही मोठा...!" व्होरा स्वतःच्या बोलण्यावर प्रसन्न होऊन हंसला. मी दोनच शब्द उच्चारले आणि म्हणालो—

"खरं आहे !"

"पण तरीसुद्धां !" व्होरा दूर दूर जाणाऱ्या तुम्हां दोघांच्या पाठमोऱ्या आकृतींकडे पहात म्हणाला, "तरी सुद्धां आज तिनं कांहीं तुम्हांला ओळख दिली नाहीं. शब्दानं तर तिनं ओळख दिली नाहींच. पण नुसतं हंसणं नाहीं, पाहणं नाहीं, कीं नमस्कार नाहीं. एखाद्या तिऱ्हाईताजवळून निघून जावं तितक्या तटस्थपणें ती तुमच्या जवळून निघून गेली."

"तिच्या दृष्टीनें मी आतां एक तिऱ्हाईतच आहे व्होरा ! शिरीन आणि निहालसिंग ह्यांच्या आयुष्यांत मला आतां कांहीं एक स्थान नाहीं."

"स्थान असूं द्या नाहीं तर नसूं द्या !" व्होरा कडवट स्वरांत म्हणाला "पण तुम्हाला तिच्या वृत्तीचा राग आला नाहीं कां ?"

"नाहीं आला व्होरा." मी शांतपणें म्हणालो.

"तर मग काय वाटलं तुम्हांला ?" व्होरानें विचारलें.

"नेहमीं वाटत आलं तेंच वाटलं." मी उत्तर दिलं. "मला वाटलं कीं, तिचं कल्याण व्हावं. तिनं सुखी असावं, तिला सुख मिळावं. खरं सांगायचं तर आपल्या नवऱ्यावरोबर तिला जोडीनें चालतांना पाहून मला फार आनंद वाटला. हेंच दृश्य मला दिसावं, अशी माझी मनापासून इच्छा होती."

चार दोन क्षण व्होरा माझ्याकडे पहात राहीला व मग पुन्हां डाव्या हाताचा पंजा उडवीत म्हणाला, "तुम्हीं दोघंहि मोठी पोहोंचलेलीं माणसं दिसतां. एकेकाळीं तुमच्या इतक्या जवळ येऊन आतां तुम्हांला नुसती ओळखही न दाखविणारी ती बाई विलक्षण आणि ह्या अपमानाविषयीं खेद ना खंत बाळगतां तिचं कल्याण इच्छिणारे तुम्हींही विलक्षण !"

"कमंही म्हण व्होरा !" मी उत्तर दिलें. "पण हे असंच व्हायला हवं होतं. मला माझा संसार होताच. तिलाही तिचा संसार मिळायला पाहिजे होता. तिला तिचा जोडीदार मिळाला आणि मला विसरुन जाण्याइतकी ती त्याच्यांत रमली, हेंच उत्तम झालं !"

"तथास्तु !" व्होरा म्हणाला आणि दुचाकीवर टांग टाकून निघून गेला. मीही माझी फटफटी सुरू केली आणि भरधांव सोडली. माझं मलाच जाणवलं कीं, इतक्या वेगानं मी माझं वाहन कधी चालवलं नाहीं. स्वभावानंच मी धीमा मनुष्य आहे. वयानं आणि अनुभवानं अधिक सावध बनलो आहे. तुझ्या आठवणींनं मला उगाच चाळवल्यासारखं झालं. माझ्या हृदयाचा वेग कांहीं वाढला नव्हता, पण वाहनाचा वेग वाढला. तो वेग मी मंद केला आणि विचार करूं लागलो. तुझं लग्न झालं. त्याला आतां दोन महिने होऊन गेले. लग्न झालं आणि तूं लागलीच त्यागपत्र दिलंस. तुझ्या जागीं कार्यालयांत दुसऱ्या स्टेनोची नेमणूक झाली.

# लगीन

## —पु. भा. भावे

तुझ्या जागीं दुसऱ्या मुलीला बसलेली पाहून चार-दोन दिवसच मला चुकल्यासारखं वाटलं. नंतर विशेष कांहीं बिघडल्यासारखं मला वाटलंच नाहीं. तसं विशेष कांहीं बिघडलं नव्हतंच. उलट फार बिघडल्यासारखं होतं, ते चांगलं सरळ झालं होतं. मार्गाला लागलं होतं. एरव्हीं तुझ्या माझ्या संबंधांतून अगदीं जीवावर बेतणील अशा भानगडी उत्पन्न होऊं शकल्या असत्या. त्याचीही मला कल्पना होती. म्हणून मी शक्य तेवढ्या सावधपणानें वागत होतो. पण माझ्याहि सावधपणाला कांहीं मर्यादा होत्या. दैवाचे फासेच उलटे पडले असते, तर मी तरी काय करणार होतो ? पण तसं घडलं नाहीं. निहालसिंगशीं तुझं लग्न झालं. तुझ्या लग्नालाहि मी उपस्थित राहूं शकलों नाहीं. कंपनीच्या कामासाठीं तेव्हां मला दिल्लीला जावं लागलं. मी तुला नुसतीच अभिनंदनाची तार पाठविली आणि माझ्या बायकोला तुझ्याकडे अहेर पाठवायला सांगितलं. तिनं तो तुला मोठ्या आनंदानं पाठविला असेल. तिलाही तुझ्या लग्नामुळें हायसं वाटलं असेल. मला तर बरं वाटलंच. एका परीनं सुटका झाल्यासारखं वाटलं. तुझी सुटका झाल्यासारखं वाटलं आणि माझीही सुटका झाल्यासारखं वाटलं. नाहींतर एरव्हीं असं किती दिवस चालण्यासारखं होतं ? पन्नाशीला टेकलेला विवाहित पुरुष चोवीस वर्षांच्या मुलीला कुठवर पुरला असता ? तो तिला काय देऊं शकला असतां ? मी तुला काय दिलं ? तुला मी सिनेमाला नेलं. आपण दोघे हॉटेलांत गेलो. दूर गांवाबाहेर माझ्या फटफटीवरुन फिरलो. आपण अगदीं मोकळेपणानं गप्पा मारल्या. पुरुषाच्या संगतींत सुख,

७








### कांहीं शोधायाचे नाहीं

**कांहीं शोधायाचे नाहीं, सारें घरींच येणार**
**कांहीं मागायाचें नाहीं, माझा हातच देणार**
**दिठी उलटली आंत, प्राणा लागले पाझर**
**आतां घागरींत उभा सारा रूपाचा सागर**
**नाहीं बोलायाचें कांहीं : मौन निळाईत गातें**
**दळीं चांदण्याचें पीठ हाताविणा माझें जातें**

**बा. भ. बोरकर**

तुझ्यासारख्या उपाशी तापाशी मुलीला मी दिलं. पण हें सुख औट-घटकेचं होतं. त्याला कांहीं पायाच नव्हता. हा पत्त्यांचा बंगला होता. वाळूवरची इमारत होती. नीतीला, रीतीला, आणि व्यवहारांला सोडून सारं कांहीं घडत होतं. पण हें मुळीं घडलंच कसं? हें कां घडलं ? कां घडावं ? जे घडलं, त्यांत मी पुढाकार घेतला असं तूंदेखील म्हणणार नाहींस. मी माघार घेतली नाहीं, पण पुढाकार घेतला नाहीं. मी तुझ्याशीं फारसा बोलत देखील नव्हतो. अगदीं कामापुरतं काम ठेवत होतो. कार्यालयांतले अन्य पुरुप तुझ्या भोंवतीं घोटाळत होते, ते मी पहात होतो. व्होराच तुझ्या किती पुढें पुढें करीत होता. पुरुपाला मोह पडावा अशी तूं होतीसच. तूं तरतरीत होतीस, बुद्धिवान् होतीस, आकर्पक होतीस. तुझा सडपातळ, लवचिक आणि उंच देह तुला फार शोभून दिसत होता. तुझे दांत हिरकण्यांसारखे होते. तुझ्या डोळ्यांत पाणी होतें. रेशमी केसांवर तांवूस सोनेरी छटा होती. एखाद्या राणीसारखा तुझ्या आकृतींत आणि हालचालींत डौल होता. हें सारं मी पहात होतों. मोह ? नाहीं, तसा मला तुझ्याविपयीं प्रथम तरी मोह वाटला नाहीं. तुझ्याशीं बुद्ध्या सलगी करावी असंहि मला वाटलं नाहीं. ती माझी पद्धत नाहीं. तें माझें वयहि नाहीं. लग्नकार्य झालेला, मी लेकुरवाळा मनुष्य. मला कधींच कशाचा मोह पडला नाहीं, असं नव्हे, पण ह्या वयांत एखाद्या मुलीच्या मागें धांवावं असा माझा स्वभाव नाहीं. त्यांतला धोका आणि हास्यास्पदता दोन्हीं मला ठाऊक आहेत. म्हणून मी नुसता लांबून तुझ्याकडे पहात राहिलो. तुझ्याकडे पाहून मला वाईट मात्र वाटत असे. लग्नकार्य न होतां कुठल्याहि कुबट कार्यालयांत आयुष्यांतली उमेदीची वर्षं घालविणाऱ्या कुठल्याहि कुमारिकेकडे पाहून जे मला नेहमीं वाटलं, तेच मला तुझ्याविषयीं वाटत होतं. मला तुझ्याविपयीं वाईट वाटत होतं. तुझ्यासाठीं माझा जीव तुटत होता. एखाद्या कांटेरी रानांत फुलूनै फुलून सुकणाऱ्या फुलाकडे पाहून वाटावं, तसं तुझ्या सद्गुणांकडे पाहून मला वाटत होतं. तुझं सौंदर्य, तुझी बुद्धी, तुझी टापटीप, सारं सारं वांया चाललं आहे भलत्या जागीं तें उधळलं जात आहे असं मला वाटत होतं. वाळवंटांतल्या झऱ्यासारखं तुझं आयुष्य आटून चाललं होतं. जे कुठल्याच कारणीं लागत नव्हतं. महिन्याला मिळणारं वेतन • हें कांहीं तुझ्या गुणांचं खरं मोल नव्हतं. खरं चीज नव्हतं. एखाद्याचा संसार फुलवायला उपयोगी पडावेत असें तुझे गुण होते. तूं उत्तम गृहिणी झाली असतीस. उत्तम माता झाली असतीस. पण तूं कांहींच झाली नव्हतीस. घर उजळून सोडण्याची ज्या दिव्याची शक्ती, त्यानं आपलं रस्त्यावर गळत उभं रहावं, तसं तुझं आयुष्य चाललं होतं. पुष्कळसे पतंग तुझ्याभोंवतीं घोंगावत होते. पण त्यांत मी नव्हतो. तुझ्या उंचीला येईल असं ह्या कार्यालयांत कुणीच नाहीं अशी खूणगांठ मी मनाशीं बांधली होती. माझा विचारच मी केला नव्हता. पण तो विचार तुला सुचला, असंच आतां म्हणणं भाग आहे.

प्रथम तूं माझ्याजवळ पुस्तक मागायला प्रारंभ केलास. माझ्या हातांत एक दिवस तूं एक प्रख्यात इंग्रजी कादंवरी पाहिलीस आणि म्हणालीस—

"चांगल्या पुस्तकांची आवड असणारे इथें एकटेच दिसतां. बाकीचे सगळे सेक्स्टन ब्लेकवालेच आहेत."

"डिटेक्टिव कादंवऱ्या तुम्हांला आवडत नाहींत कां ?" मी तुला विचारलें.

"आवडतात कीं !" तूं म्हणालीस. "पण कधीं कधीं वाचायला आवडतात. दरोडेखोर आणि हत्यारी ह्यांच्या संगतींत माणूस नेहमीं राहूं शकत नाहीं. त्याला चांगली माणसं लागतात."

"चांगली माणसं आणि चांगलीं पुस्तकं थोडी असतात." तुझ्या हातांत पुस्तक देत मी म्हणालों.

"पण असतात !" माझ्याकडे पहात व माझ्या हातांतून पुस्तक घेत तूं म्हणालीस. पुस्तक घेतांना तुझा हात माझ्या हातावर किंचित् रेंगाळून गेला. पुरुषांवरोवर काम करणाऱ्या बायकांना पुरुपाच्या स्पर्शाचे तसें आतां कांहीं विशेप वाटत नाहीं. तसें वाटून त्यांचे चालण्यासारखेहि नाहीं. पण तुझा तो स्पर्श अगदीं अजाणता होता, असं मला वाटले नाहीं. कांहीं वाढलेल्या कुमारिकांना पुरुपाच्या स्पर्शाची अनावर भूक लागलेली असते. शक्य होईल तेव्हां त्या पुरुपाला स्पर्श करीत असतात. तसाच तुझा तो स्पर्श मला वाटला. परंतु तसा स्पर्श तूं व्होराला करीत नव्हतीस. कार्यालयांतल्या अन्य कुठल्याहि पुरुपाला करीत नव्हतीस. व्होरानें एकदां प्रसादाची खडीसाखर तुझ्या तळव्यावर ठेवण्याचा प्रयत्न केला. तूं तळवा मागे घेतलास व मेजाकडे बोट दाखविलेस. जोशीनें एकदां तुझ्या हातावरील "धनरेपा" आणि "वुद्धिरेपा" पहाण्याचा प्रयत्न केला. तेव्हांहि आपला तळवा तूं त्याला दुरून दाखविलास. तूं अतिशय स्वच्छ मुलगी होतीस. वाटेल त्याचा स्पर्श तुला चालत नसे. म्हणून तुझा तो स्पर्श माझ्या ध्यानांत राहून गेला. माझें पन्नाशीला पोहोंचलेलं वय माझ्या ध्यानांत होतें. पण स्त्रीचें चरित्र अगम्य आहे हेंहि मला ठाऊक होतें. जगांत अशक्य असं कांहीं नाहीं, अशक्य वाटणाऱ्याला गोष्टीहि अगदीं अकल्पितपणें घडतातहि. हे मला ठाऊक होते. आणि तसेंच कांहीं तुझ्या माझ्यांत घडूं लागलें.

एके सायंकाळीं मुसळधार पाऊस पडत होता. तुला कार्यालय



अनुक्रमणिका

सुटल्यावर घरीं जायचे होते. कोसळणाऱ्या पावसाकडे पहात तूं पडवींत उभी होतीस. तूं फिकट गुलाबी रंगाचा पाणकोट आणि तशीच कुंची घातली होतीस. मी मोटार बाहेर काढली आणि तुझ्याकडे पाहिले. तूं धांवत गाडीपाशी आलीस. पावसाच्या धारा तुझ्या अंगावर पडल्या. चेहऱ्यावरून सांडल्या. एखाद्या जलपरीसारखी तूं दिसूं लागलीस.

"हें तुमचं पुस्तक" कादंबरी परत देत तूं मला म्हणालीस "दिवस-भरांत द्यायला झालंच नाहीं. फार काम होतं !" शाळेंतल्या अभ्यासाला कंटाळलेल्या मुलासारखा तूं चेहरा केलास.

"एवढ्या पावसांत पुस्तक द्यायला कशाला आलीस ?" मी तुला विचारलं.

"नाहींतर राहून गेलं असतं. कुणीतरी नेलं असतं. हरवलं असतं." तूं म्हणालीस. "भिजलं सुद्धां असतं बसची वाट पाहतां पाहतां !"

"बसनं तुम्हीं घरीं जाणार ?" मी विचारलं.

"बसनंच मी घरीं जात असते." तूं उत्तर दिलंस. "अस्सा कंटाळा येतो कधीं कधीं बससाठीं त्या लांबलचक रांगेत उभं रहायचा !"

"तर मग या गाडींत !" मी दार उघडत म्हणालो. "आज मी तुम्हांला तुमच्या घरीं नेऊन सोडतो. फार पाऊस आहे !"

"थँक्यू !" तूं म्हणालीस व मुकाट्यानं माझ्या शेजारीं येऊन बसलीस. बाहेर पाऊस कोसळत असतां माझ्या शेजारीं मऊ उबदार आसनावर तूं बसली होतीस, त्याचा तुला आनंद वाटत होता. मी खिशांतून सिगारेट काढली व ओठांत धरली. गाडी चालवीत असतांच मी सिगारेट पेटविणार होतो. तेव्हां तूं माझ्या हातांतील काडचाची पेटी घेतलीस व म्हणालीस– "नको, नको ! मी पेटवून देते, तुमची सिगारेट !" तुझा चेहरा माझ्या चेहऱ्याच्या जवळ आला. तूं माझी सिगारेट पेटविलीस. काडीचा जळता गुल तुझ्या मांडीवर पडला. झटकन् मी तो गुल चिमटींत घेतला व विझविला तूं माझा हात हातांत घेतलास व म्हणालीस– "बोटाला चटका तर बसला नाहीं ?"

"बसला थोडासा !" मी हंसून म्हणालो. "तुमच्या सारखी मुलगी जवळ असतांना एवढा चटका बसायचाच. पण तो तुम्हांला बसण्या-पेक्षां मला बसलेला बरा !" माझें तें वाक्य ऐकून तूं लाजलीस, हंसलीस आणि म्हणालीस–

"चटका कुणालाहि बसणं वाईटच !"

"तें खरं, पण तो निदान सोसण्याची शक्ति असलेल्या माणसाला बसावा !"

"तुमच्यांत खूप शक्ति आहे नाहीं ?" तूं माझा दंड चाचपलास. माझा दंड आणि माझं सारंच शरीर कमावलेलं आहे. लहानपणापासून मी व्यायाम केला आहे. अद्याप करतो. तुझीं बोटें माझ्या पिळदार दंडाभोंवतीं एखाद्या रेशमी पिसाप्रमाणें फिरत असतांच मी माझा डावा पंजा पुढं केला आणि म्हणालो—

"माझा हा पंजा वाकवून पहा." तूं प्रथम एका हातानें माझा पंजा वाकविण्याचा प्रयत्न केलास. मग तुझे दोन्हीं हात माझ्या पंजाशीं झटूं लागले. माझा पंजा खालीं आला नाहीं. मी एका हातानें गाडी चालवितच होतो. शेवटीं दमून तूं माझा पंजा दोन्हीं तळव्यांत दाबून धरलास व म्हणालीस–

"खरंच तुमच्यांत खूप शक्ति आहे. आपल्या ऑफिसांतले बहुतेक सगळ पुरुष नुसते खुजे आहेत. माझ्याइतकी उंचीसुद्धां कुणापाशीं नाहीं."











अनुक्रमणिका





"तुझ्यापाशीं अनेक प्रकारची उंची आहे. शिरीन" मी सहजगत्या एकवचनावर आलो. तुझ्या बोटांत मी बोटें गुंतविली आणि म्हणालो, "बुद्धीची उंची, सौंदर्याची उंची, कर्तृत्वाची उंची !"

"पण तुमच्याइतकी मी उंच नाहीं." तूं म्हणालीस. "तुमच्यांत फार जास्त शक्ति आहे. तुमचा स्वतःवर तावा तरी किती आहे. एका हातानें चाक सांभाळतां आहांत !"

"त्यासाटीं मला पारितोषिकहि तसंच मिळत आहे !" तुझी बोटें दावत मी म्हणालो. तूं तो दाव परत केलास. तुझ्या त्या प्रतिसादानें माझें वय मी पुरतेच विसरलो. तूं एक तरुण स्त्री आहेस आणि तुला मान्य, आणि तुझ्यापेक्षां अधिक बलिष्ट असा मी एक पुरुष आहे एवढेच माझ्या ध्यानांत राहिले. वयाच्या आवरणाखाली दडलेलें माझ्यांतले तारुण्य व त्या तारुण्यांतला वेडूटपणा उसळून वर आला व मी तुला माझ्याजवळ ओढले. गाडी एका दगडावर उसळली. तू मला अधिकच विलगलीस आणि म्हणालीस–

"पहा वरं ! अशानं घरीं जाण्याऐवजीं स्वर्गांत जाण्याची वेळ येईल !"

"काय चिंता आहे ?" मी उत्तर केले. "माणसाला एक दिवस मरायचेच आहे. पण मरण्याचेहि प्रकार असतात. वाहेर पाऊस कोसळत असतां, जग ओले व हिरवे दिसत असतां, तुझ्यासारखी मुलगी जवळ असतां मरण आले तर मला ते फार आवडेल !"

"हें बोलणं मला फार आवडलं." कौतुकानें माझ्याकडे पहात तूं म्हणालीस. एखाद्या धुंदींत कसला तरी मोठा जुगार खेळून प्राणावर उदार होणारे पुरुष वायकांना नेहमींच आवडत असतात. तुझी आवड मला तुझ्या डोळ्यांत दिसली आणि मी विचारले, "पण माझ्या बरोबर मरायला तुला आवडेल कां ?"

"आवडेल !" तूं उत्तर दिलेस.

"तूं तरुण आहेस." मी म्हणालो, "आणि मी तेवढासा तरुण नाहीं."

"ह्या क्षणीं तुम्हीं माझ्याइतकेच तरुण आहांत. माझ्या सहवासांत तुम्ही माझ्याइतकेच तरुण रहाल. "त्या क्षणाची धुंदी तुलाहि चढली व तूं बोलूं लागलीस, "तारुण्य हे वृत्तीवर अवलंबून असतं. शक्तीवर अवलंबून असतं. नुसत्या वयावर अवलंबून नसतं !"

"मी माझं वय विसरलोच आहे." मी म्हणालो.

"वय विसरणं तुम्हांला आवडत नाहीं कां ?" तूं प्रश्न केलास.

"वय विसरणं कुणाला आवडणार नाहीं ? पण लोक आपले वय विसरलेले नसतात. परिस्थिति आपल्याला वय विसरूं देत नाहीं."

"ह्या गाडींत परिस्थिति नाहीं." तूं म्हणालीस, "केवळ तुम्हीं आणि मी आहोंत. आपण बनलूं ती परिस्थिति आहे." तूं माझ्या हातावर हात ठेवून म्हणालीस व मग दचकून उद्गारलीस, "लॉर्ड ! माझं घर आलं. मला उतरलं पाहिजे." तूं घाईनं गाडीचं दार उघडलंस. मी म्हणालो—

"बघ, परिस्थिति माणसाला ही अशी खाली उतरविते !"

"मग तुम्हींहि उतरा कीं खालीं म्हणजे आपली परिस्थिति सारखी होईल. जरा घरांत या. मी तुमची माझ्या आईवडिलांशीं ओळख करून देतें."

"आतां नको." मी म्हणालो.

"या ना !" तूं माझी वाही धरलीस. मी मुकाट तुझ्या मागोमाग घरांत आलो. घरांत एक प्रकारची विषण्णता दाटलेली होती. तुझा म्हातारा खोकत होता आणि म्हातारी गुडघे शेकत बसली होती. आपल्या पिचक्या डोळ्यांनीं त्यांनीं माझ्याकडे एकदां पाहून घेतलें. तूं त्यांची आणि माझी ओळख करून दिलीस. ती दोघेहि मला थकलेली, अबोल, तुसडी आणि विचित्र वाटली. त्यांच्या डोळ्यांत नापसंतीची चमकहि उमटून गेल्याचा मला भास झाला. पण तीव्र नापसंती दाखविण्याइतका तकवाहि त्यांचे ठिकाणीं शिल्लक नव्हता. तूं घरांतली मिळवती मुलगी होतीस. तुझ्यावर हीं माणसें अवलंबून होती. तुला आवरण्याइतके किंवा दुखविण्याइतके बळ त्यांचे ठिकाणीं नव्हते. तुझी हवी ती गोष्ट त्यांनीं चालवून घेतली असती आणि पचवून टाकली असती. माझे तुझ्याकडे येणें आणि येत रहाणें त्यांनीं असेंच पचविले. मी जायला निघालों. पाऊस थांवला होता. तुं गाडीपर्यंत आलीस आणि म्हणालीस—

"जाणार ?"

"गेलं पाहिजे." मी उत्तर दिलं. "घरीं वायको वाट पहात असेल."

[पृष्ठ २०५ वर पहा]

प्रकाशबंदी




कांहीं नाहीं, हवाईहल्ल्याचं प्रात्यक्षिक चाललंय हवालदारसाहेब.









वतन में मुझको जीना है,
वतन में मुझको मरना है।
वतन पर ज़िन्दगी को
एक दिन कुरबान करना है।।

Fierce warriors rushed to meet us;
we met them, and o'erthrew them:
They struggled hard to beat us;
But we conquered them, and slew them.



**तेरी हसती रहे । मेरा खून बहे**
**तू आज़ाद रहे । हम रहें न रहे ॥**

इसी असीम श्रद्धा से भारतीय जवान सीमाओंपर लड़ रहा है ।

किसी एक जमाने में भगवान शिवजी ने नरकासूर का नाश किया था । उस घटना को याद करने के लिए हम दीपावली मनाते हैं । भगवान शंकर के आशीर्वाद से हमारे जवानों ने आगे बढ़ कर शत्रुओं को परास्त किया । संसार में दुष्टों के पापों का भार बढ़ जाता है तब शिवजी अपनी तीसरी आँख खोलते हैं और उन दुष्ट पापियों से पुण्यकारियों की रक्षा करते हैं ।

हमारे जवान भारतीय सीमाओं पर सिर हाथोंपर लिये लड़ रहे हैं । मातृभूमि की रक्षा के लिए कई जवानों ने अपनी जान कुरबान की । हम भारतवासी आज के शुभ अवसर पर कहेंगे

**जुग जुग जिओ जवान ।**



## Blessed are The Brave !

In the trinity of Hindu Gods, Shiva is the Supreme Destroyer. When the world is overwhelmed by evil he opens his third eye and, with the divine fire projecting from it, destroys the evil. Shiva, or Shankar, is the protector of the brave and the good. The Indian Jawan, who rushed to defend our country in an hour of peril, naturally considers himself blessed by Shankar. Who, among the valiant, does not remember the battle cry of generations of Maratha warriors: "Har Har Mahadeo"?

With the blessings of the Destroyer of Evil our fighting forces went into battle and delivered a knock-out blow to the Pakistani aggressor. May the Jawan continue to guard and defend our motherland !

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# हीं घरं तीं घरं

## —पु. ल. देशपांडे

यांच्या आनंद विलासी लेखणीनं
खास दीपावलीसाठीं
लिहिलेला हा एकमेव
**प्रदीर्घ गृहपट**

**मी** सदैव घर शोधीत असतों. माझ्यासाठीं किंवा माझ्या कुठल्याहि मित्रासाठीं नव्हे. मला घरं पहाण्याची हौस आहे. निष्कारण माणसं पहायला मला आवडतं तसं घरंहि पहायला आवडतं. घर नवीन असायला हवं असाहि माझा हट्ट नाहीं. किंबहुना नव्या घरापेक्षां जुनंच घर मला अधिक आवडतं. दगडाविटांच्या घरांलाहि चार पावसाळ्यांचं पाणी पचवल्याखेरीज पालवी फुटत नाहीं. दारच्या रोपट्याप्रमाणें घरहि कांहीं काळानंतरच जीव धरतं. तोपर्यंत तें कोरं करकरीत असतं. दुकानांतून आणलेल्या धोतराच्या पानासारखं. धुवून निऱ्या काढल्याखेरीज गिरणींत विणलेल्या वस्त्राचं धोतर होत नाहीं तर चार बरेवाईट कौटुंबिक आघात झाल्याखेरीज घराला घरपण येत नाहीं. एकदां ते असं सजीव झालं कीं, मग त्या घराला स्वभाव येतो. गुणधर्म येतात—खोडी येतात. इतकंच काय वाचा देखील फुटते. हीं घरं बोलतात.

### कळपांतून कुलुपांत

'घर' हा माणसाचा भलताच मोठा शोध. केवळ आडोसा किंवा आसरा ह्या पलीकडलं कांहींतरी त्यानं साधलं. घर म्हणजे आसरा नव्हे—निवारा नव्हे. घराला आसरा, 'निवारा' वगैरे नांवें देणारी माणसं एखाद्याला जेवायचं आमंत्रण 'आज दुपारीं आमच्या घरीं भूक भागवायला या' असं देत असावीत अशी आपली मला उगीचच शंका येऊन जाते. गुहेंतला नुसता निवारा आणि आसरा सोडून आदिमानव घरांत आला तेव्हाच मनुष्य प्राण्यानें प्राणिसृष्टीशी असलेलं आपलं नातं सोडून आहार निद्राभय मैथुन ह्या पलीकडलं कांहींतरी साधायला सुरुवात केली. मनुष्य म्हणून घेण्यापेक्षां गृहस्थ म्हणवून घेण्यासाठीं त्याची धडपड सुरू झाली. भिंतीचा शोध लागला आणि कळपांत रहाणारा माणूस कुलुपांत राहूं लागला. भिंत आल्यावर दरवाजे आले, उंबरठा आला, खिडक्या आल्या, झरोके आले, ओसरी आली, पडवी-ओटे-खांब—पाखीं आलीं. अंगण आलं—परसूं आलं—परसांत आड आला—आळवाची खाच सुद्धां आली. तेवढ्यांत कुणा चतुर माणसाला घरावर घर बसवतां








कौशल्य बुलुंद दरवाजांत ओतलं. शें-सवाशें फूट उंचीच्या त्या तसल्या दरवाजामध्यें आंत शिरणाऱ्या धिप्पाडांतल्या धिप्पाड माणसाला चिमुकला करून टाकण्यांत सामर्थ्य असतं. किंबहुना प्रचंड वास्तूंनीच माणसांना दबवून टाकणं हें जेत्यांचं हमखास शस्त्र आहे. जुन्या राजवटींतली घरं पाडून नवीन त्याहून उंच आणि रुंद घरं बांधायचीं हा राजनीतींतला पहिला पाठ आहे. सरंजामशाहींतलें वाडे जाऊं द्या पण लोकशाहींतले मंत्री देखील बगीचेवाल्या बंगल्यांत रहातात. रहावेच लागते. चार दरवाजे आणि पांच पहारेकरी ओलांडून गेल्या-शिवाय माणूस मोठा वाटत नाहीं. माणसाचं काय पण देवाचं मोठेपण देखील देवळाच्या अवाढव्यपणावर अवलंबून असतं. सात डोंगरांच्या माथ्यावरचा तिरुपति व्यंकटरमणाचा हौद जवाहिरांनीं भरतो आणि पारावरच्या मारुतीला अंगभर तेल मिळत नाहीं. देवापेक्षां देव-ळाच्या आकारावर हें अवलंबून असतं.

## पोळपाटावरचा पापड 'सोंवळा' होता

पण देवाचं 'देऊळ असो वा माणसाचं मकाण असो त्याला इतिहास आल्याशिवाय त बोलत चालत नाहीं. **एखाद्या घटनेचा इतिहास केव्हां होतो हें पोळपाटावरचा पापड कुठल्या क्षणीं सोवळ्यांतला होतो हें सांगण्याइतकंच अवघड आहे.** अंगणं गेलीं आणि त्यामागून घरगुती पापडहि गेले. आतां पापड–लोणचीं ही घरच्या वार्षिक कार्यांतले भाग न राहतां बाजारहाटींतून मिळवायचे 'जिन्नस' झाले. तशीच घरंहि 'फ्लॅट्' झालीं–ब्लॉक झाले–दोन खोल्यांचे–तीन खोल्यांचे. पुन्हां एकदां आदिमानवाच्या आडोशाच्या जमान्याकडे माणूस जायला लागला. पण अजूनहि बोलकीं घरं भेटतात. इतिहास सांगतात. तो रोमहर्षक किंवा स्फूर्तिदायक असावा लागतो असंहि नाहीं.

"अग–तुझी नर्मदाकाकू उंबरठ्यावरचं माप ओलांडून आंत शिरत होती आणि पलिकडे गोठा होता–सदाशिवाची खोली केलीय ना आतां तिथं–तिथं कालिंदीला कळवड झाली. तीन दिवस खरवस खात होतो–आठवतं का नमूताई—" असला इतिहास देखील चालतो. मग नुकतेच दांत काढून घेतल्यामुळें तोंडाचं बोळकं झालेली काकू नववधूच्या वेषांत आलेली दिसते. वाजंत्री ऐकू येतात. मोतिबिंदू-वाल्या काकांच्या कपाळीं मुंडावळ्या चढतात आणि भित्खूचली-कलथून खांब गेला असल्या अवस्थेंतले तें घर क्षणभर टुमटुमीत होतें. अंगणापुढल्या गडग्यावरून घसरून खालीं आल्यावर कपाळाला पडलेली लहानशी खोक आठवली तरी ती पुरते. मग त्या घरांतली माणसंच नव्हे तर त्या घरांतल्या साऱ्या अचेतन वस्तूहि आपल्या नात्यांत येतात. नव्हे त्या घरांतल्या अंधार उजेडालाहि निराळा अर्थ असतो. स्वैपाकघराच्या छपरांतून येणारा ठराविक सूर्यकिरण–अंगणांतल्या झाडांच्या सांवल्या. यांना देखील इतिहास असतो. माजघराच्या दरवाजाच्या आडचा अंधार कांहीं नाजुक कथा सांगतो. त्या अंधाराचा फायदा घेऊन दादानें वहिनीच्या गालावर मारलेली टिचकी आपण पाहिलेली असते आणि वहिनीनें साय वाढायचं वचन देऊन हे कुणाला सांगायचं नाहीं वरं कां शिरीभाऊजी म्हटलेलं असतं तें आतां दादावहिनींच्या मुलींचं लग्न झालं तरी आठवत असतं. माजघराच्या दारामागल्या अंधारांत तो चित्रपट दिसतो. घरांतला अंधारसुद्धां जेव्हां आठवणींतल्या चिजांनीं भरायला लागतो त्याच वेळीं घराला रंग येतो. असल्या वस्तूत मोक्षाची सुद्धां अपेक्षा न ठेवतां मूळ पुरुष हिंडत असतात ते काय उगीच ?

मी हल्लीं शोधतों तीं असलीं घर. दिवसेंदिवस घर ही एक तर वास्तुशिल्पी मंडळींना अपचन झाल्या अवस्थेंत पडलेल्या स्वप्नांतल्या आकृतींनीं सिमेंटकांक्रीटची रुपं घेतल्यासारखी व्हायला लागली आहेत. अलीकडेच मी एक असलं नव-गृह पाह्यलं. त्याच्या स्वैपाक-घराला दार होतं. पण झोपायच्या खोलीला नव्हतं.

## विहार खुल्लमखुल्ला •

अन्नटंचाईच्या ह्या काळांत आहार चोरून आणि विहार खुल्लं-खुल्ला हेंहि ठीकच आहे म्हणा. युगंधर्म–युगधर्म म्हणतात ते बदलतात ते हे असे ! शयनमंदिर आणि शौचकूप यांनीं जवळिक साधली आहे. मेजवानीचं मेज दिवाणखान्यांत आलं. अशा कांहीं नव्या उलथा-पालथी झाल्या. त्यांतल्या त्यांत चुलींतल्या कोळशानं काळं केलं आणि तिच्या पोटांत गॅस् भरला हें बरं झालं. मात्र गॅसच्या चुली आल्यामुळ वांगडा भाजायची सोय गेली आणि पापड भाजलेहि जात असत हा दाखला कांहीं वर्षांनीं इतिहासांतून शोधून द्यावा लागेल. नव-स्त्रीच्या वेषभूषेंत जुन्या डोळ्यांना, ही बाई नीट नेसून संपायच्या आंतच फिरायला निघाली असं वाटतं तसं ह्या नव-घरांत तें अजून पुरं बांधून व्हायचं आहे असंच वाटत असतं. धनिकांच्या घरांची हीं अशीं तऱ्हेवाईक वळणं तर सामान्यांसाठीं एकाच ठशाच्या एकमेकांवर उभ्या आडव्या ठेवलेल्या पेट्या ! म्हणजे पुन्हां आदिमानवाच्या काळांतले बंद आडोसे ! घरांचं वर्णन दोन बेडरुम्स, किचन, व्हरांडा किंवा वन्बेडरुम, किचन् असं व्हायला लागलं किंवा दिल्लीच्या परिभाषेंत डीटू, सीवन्



आतां तीन तीन आवृत्त्या कशा संपणार !

अनुक्रमणिका

टाइप असं झालं कीं, मला तरी—हॉटेलांतल्या माणसाची वर्णनं 'एक सफेद टोपी—लाल खमीस वा पैरणे—' काळा गागल एक रुपया—अशी करतात तसं वाटतं. इथं म्हणजे माणसाचा 'इस्मम' होतो. ह्या छापांच्या घरांनाहि नुसता देह असतो—देहस्वभाव नसतो. ही घरं एक तारखेसाठीं उरलेल्या एकुणतीस-तीस दिवसाची धडपड करणारांचीं. मग ती तीन बेडरूम्सचीं असोत वा एक ! त्या घरांना बेडरूम असते—पण दादांची खोली किंवा आप्पांची ओटी नसते. त्या घराच्या कोपऱ्यांना नांव नसतं.

## आज्जाचा कोपरा

एकदां एका खेड्यांत गेलों होतों. अंगणांत बसलो होतो. सिगरेट काढली. नेहमींप्रमाणें काडी नव्हती. पाटीलबुवांनीं पोराला सांगितलं "बाबज्या—आज्जाच्या कोपऱ्यांतून आगपेटी आन !" आज्जाचा कोपरा ! त्या चिमण्या घरांतल्या एका कोपऱ्यांत वर्षानुवर्षं म्हातारा आज्जा तरट टाकून बसायचा. त्यामुळें तो कोपरा आज्जाचा होता. आतां आज्जा गेल्याला धा वर्सं झालीं तरी तो आज्जाचा कोपरा ! धोबी आणि तलाव दोघेहि गेले तरी धोबीतलाव राहिला आहे तसा ! अचेतनाला अशी सचेतनाच्या आठवणींची संगत असली कीं, लाकूड-दगड विटाहि बोलक्या होतात. म्हणून मला नाना पेठ म्हणणारांपेक्षां नानाची पेठ म्हणणारी माणसं आवडतात. अजूनहि पुण्यांत शाळूकर बोळ म्हणण्याऐवजीं शाळूकराचा बोळ म्हणणारी माणसं भेटलीं—शिवाजी नगरला भांबुडं म्हणणारे भेटले किंवा-मुंबईच्या पाली हिलला मोतमावली म्हटलेलं आढळलं आणि सायनला शींव म्हणणारा दिसला कीं, माणूस माझ्या गोत्रांतला वाटतो. मामंजी जाऊन पंचवीस वर्षं झालीं तरी खोली मामंजींचीच झाली पाहिजे. बाप्पांच्या ओटीला बाप्पाने पाय लागून दहा वर्षं होऊन गेली असतील पण ती बाप्पांची ओटी ! मग त्या ओटीला इतिहास येतो. तिथल्या आरामखुर्चीवर एकदम बसवत नाहीं. जस्ती काड्यांचा चष्मा लावून 'बलवन्तराव म्हणजे अजब बुद्धीचा माणूस' म्हणणारे आणि पंचावन्नाव्या खेपेला गीतारहस्याचं पारायण करणारे बाप्पा दिसतात आणि मग त्या खुर्चीवर बसून पुष्ट नितंबाचं वर्णन करणारी कथा वाचायला मासिक उघडायचे धैर्य नाहीं होत. मागली भिंत देखील जस्ती काड्यांचा चष्मा लावून—'बघूं रे काय वाचतोस तें—' असं म्हणेल कीं, काय अशी भीति वाटायला लागते.

## अस्सं अंगण सुरेख बाई.

मुख्य म्हणजे अशा असल्या घरांना अंगण असतं. अंगण हा घराचा आरसा आहे. आरश्यासारखं लख्ख सारवलेलं असतं म्हणून नव्हे. घरांतलं कुटुंब किती नांदतंय् किती गाजतंय् तें अंगणांत पाहून घ्यावं. वयाची आदब सांभाळीत बसलेले पांडवासारखे कर्ते मुलगे, माहेरवासणी, एकदोन पोक्त्या पुरवत्या—आणि गुडघ्यावर लुटलुटत अंगण पालथं घालणाऱ्या गुंड्यापासून ते दारीच्या आंब्यावर झोके काढणाऱ्या नातवंडांच्या संख्येवरून सारं घर पारखतां येतं. अस्सं अंगण सुरेख बाई म्हणतात तें हेंच ! हें अंगण लखलखतं तें वडील मंडळी-



## अटकेवरती झेंडे

राजा वढे

अता न घेऊं पाउल मागे—केली आगेकूच
उरी बसोनी आम्ही जिंकिला उरी आणखी पूंच
सुटले आता तीर नांव तें नकोच मागे फीर,
रक्त सांडुनी पावन केला आम्ही हाजी पीर
रणगाडयांचे रडगाणें तें अमेरिकेचे बांब
फेंकित आले पाकस्थानी जिंकायातें छांब
आले चालुन पॅटन गाडे—शिंग रोखुनी गेंडे
देता धडका पार उलथले—केवळ मारुनि धोंडे.
अचूक घेती वेध ससाणे गिधाडावरी नीट
गरुड गोंधळे पडे पालथा खाली येउनि झीट
पेंढा टाकुनि पळती भित्रे पाकिस्तानी शेर
तरस जळाले. तया कळेना या वणव्याचा घेर
'छू करते ही निकले मियाँ अयूब कातिल भुत्तो
दूम दबाकर भगो भोंकते लालचीन के कुत्तों
नमक हरामी करे न कोई, जो सच्चा इस्लामी
खून बहायेंगे हम अपना आझादीके हामी
हम सब हैं भारत के बंदे मुस्लिम, सिख्ख इसाई
एक जमींपर पले फुले हम हिंदी भाई भाई'
भारतियांनो रणमर्दांचे मोडु नका अवसान
करुं मोकळा काश्मिर अमुचा आम्ही हिंदिजवान
पावन सलिला सुरसरिता ती मुक्त कराया सिंधू
आम्ही वाहवूं रक्त प्रवाही अमुचा बिंदू बिंदू
तरस, गिधाडे, शेर पळवुनि शिंग मोडके गेंडे
पराक्रमाचे लावुनि परतू अटकेवरती झेंडे

विषयींच्या आदरांतून—लेकीसुनांच्या गळ्यांतल्या मण्यांतून—आजी गावशीच्या लाडांतून आणि उघड्याबंब शरीराची लाज न बाळगता बसलेल्या तगड्या मुलांच्या गप्पांतून ! त्यांतून परगांवीं कामधंदा-निमित्त असलेल्या मुलाने किंवा जांवयानें कर्तबगारी गाजवल्याची हकीगत सांगणारे— 'हें आपल्याच आशीर्वादाचं फळ आहे... म्हणणारं मर्यादशील पत्र त्या दिवशींच्या डाकेनें आलेलं असावं. मग एखादी केल्याधरल्याली म्हातारी कौतीक संगित सांगू लागते—

### लोज पुलनाची पोली

'अकरा म्हयन्यांचा होता तेव्हां बोलायला लागला होता—आठवतं का यस्वदे—'

"लोज पुल्नाची पोली कल म्हणायचा—पण पायगुण सूनबाई-चाही—" तेवढ्यांत वडील सून मामंजींना ऐकू जाईल अशा बेतानें दारा आडून टोमणा मारते——

"पण कऱ्हाडचाची म्हणून नापसंत करायचं चाललं होतं—"

मामंजी बसल्या जागीं खुदखुदत म्हणतात— 'कळलं बरं का यमुने—आज काय थंडया फराळावरच गाई गाई का आमची—' सूनबाई जीभ दातांनीं चावत आंत पळते.

दिवेलावणीला आंतून आंबेमोहराचा वास अंगणापर्यंत येतो.

### अंगणांतला पारिजातक

संसारातलीं सारीं सुखं—सारी दुःखं दारच्या प्राजक्तासारखीं त्या अंगणांत सांडलेली असतात. तीं वेचत ही बैठक चालते. असल्या अंगणाचीं घरं फार बोलकीं. दारीं टांगलेला सोन्याच्या वर्खाचा नारळ शुभकार्याची खूण पटवतो. वाटेचा वाटसरू फाटका समोर उभा पाहून क्षणभर थबकतो. सासरची पाठवणी चाललेली असते. टोप्या घालून टांग्याकडून घराकडे नि घराकडून टांग्याकडे धावणारे भाऊ ट्रंक वळकटयांची ने-आण करीत असतात. 'पोहोंचल्यावर पत्र पाठवा बरं अनुताई——' अशा सारखं पांच शब्दांचं वाक्य देखील गळ्यांतल्या आवंढ्यांना मागें ढकलत बोलावं लागतं. घरांतली पोरं उगीच टांग्याच्या आसपास रेंगाळत असतात—वृद्ध मातापितरांना नमस्कार घडतो—हातावर दही पडतं—बाळंतातल्या बालराजांचे मुके घेऊन होतात—टांगा हलतो—कौलं डोकडोकावून बघतात—त्यावेळीं परसदारीचा कौलावरून डोकं वर काढून बघणारा माड देखील झावळ्यामागें तोंड दडवितो. अंगणांतल्या चिमण्या बावऱ्या होतात.

अशाच एखाद्या खळ्यांत कधीं दिवंगतांच्या आठवणी निघतात. सासूबाई अहेवपणीं गेल्याचा उल्लेख होतो—वृद्ध आणि एकाकी मामंजींच्या छातींत गलबलल्यासारखं होतं. आणि मुलालेकरांदेखत डोळे पाणावतील म्हणून उगीचच एखाद्या नातवाला हाताशीं धरून 'मिलिंदा कविता म्हण बरं चांगलीशी—' म्हणून ते विषय टाळतात. अंगणामागल्या घरांना हें असलं खूप पहायला मिळतं.

### ओसरीवर नारद

ओसरी, पडवी, चौक हे प्रकार तर जोडा पगडी उपरणं ह्यांच्या-सारखं इतिहास जमा झाले. सुटाबरोबर सगळंच सुटसुटीत झाले. नाहींतर ओसरीचीं भिंत ही एक अजब चित्रसंग्रह मिरवीत असे. सोस हा जुन्या पिढीचा गूण अजब होता. पैशाचा सोस नव्हता असं नाहीं पण घरांत एकदां शिरलेली वस्तू घराबाहेर जाऊं द्यायची नाहीं हा सोस मोठा. जुन्या वाटल्या, तगडं उडालेलीं भांडी—आणि

तुटक्या उलथण्यापासून ते विवस्त्र छत्रीपर्यंत साऱ्या मंडळींना 'रहा रहा' म्हणून ठे न घेतलेलं असायचं. त्या ओसरीवरच्या भिंतीवर टिळक, शिवाजीमहाराज, चरखा फिरवणाऱ्या गांधींच्या शेजारीं जांवईबापू आणि लेक, सत्यनारायणाच्या केळीच्या खुंटापुढला नारदमुनी– (अनंत शिवाजीदेसाई टोपीवाले-मोती बाजार मुंबई) चि. सौ. कां. सुमनचं हिंदी प्रथमाचं फ्रेम केलेलं प्रमाणपत्र–दादाचा बी. ए. झाल्यावेळचा गाऊनमधला फोटो आणि महाराणी विक्टुरियाच्या दिल्लीदरबारचा फोटो हे गुण्यागोविंदानें नांदत. त्यांतच एखाद्या धाडसी काकानं मारलेल्या वाघाच्या धुडावर पाय ठेवून काढलेला त्याचा फोटो–एक दोन ग्रूप फोटो–(त्यांतल्या कडेवरच्या लहान पोरानें आयत्या वेळीं मान फिरवून घोळ केलाच पाहिजे.) मग सूनबाईला भिल्लीणीच्या वेषांतली फूल-भरणी केलेला फोटो. (कुठल्या भिल्लीणी असली पुष्पभूषा करतात शिवशंकर जाणे) हा फोटो गांवांतल्या पारंडेकर बंधु किंवा शेरतुकडे फोटो स्टूडियोनें काढल्याची निशाणी हवीच. केस मोकळे सोडून त्याच्यावर फुलांचा मुकुट घातलेल्या त्या भिल्लीणीच्या ( 'आरुणच्या खेपेला.) फोटो शेजारीं तुळतुळीत गोटा केलेल्या एखाद्या मुंजा मुलाची लंगोटी घालून दंड देऊन उभी केलेली तसबीर–शिवाय मग मुद्दाम एन्लार्ज करून घेतलेला सासूबाई आणि मामंजींचा रंगीत फोटो. ('लुगड्याचा जरीचा कांठ अगदीं हुबेहूब काढलाय होऽऽ.) असल्या फोटोंत स्थानिक फोटुग्राफरनें हाताशीं असलेले सगळे रंग वापरलेले असतात. ह्या गर्दीत कुठें जागा उरलीच तर ठाणें किंवा जो असेल त्या जिल्ह्याचा नकाशाहि असतो. दरवाजाला तोरणं–वर वरें सत्य बोला–या.बसा नमस्कार–भीड भिकेची वहीण आहे–निश्चयाचे बळ तुका म्हणे तेंचि फळ–यत्न तो देव जाणावा–सत्य संकल्पाचा दाता–यापैकीं एक दोन हवींच ! माडीवर मात्र मुख्य पंगत रविवर्म्यांची–झोपाळ्यावरच्या मोहिनीपासून ते वनवासांत देखील तंदुरुस्ती ठीक असलेल्या अशोकवनांतल्या सीतामाईपर्यंत ! विश्वामित्र मेनकेचे चित्र पाहून हा गोसावी ट्रॅफिक पोलिसासारखा त्या तान्हें पोर घेऊन आलेल्या बाईला 'साईड' कशासाठीं देतोय–हें कोडं मला लहानपणीं पडलं होतं. वाढत्या वयाबरोबर त्या चित्रातल्या मोक्याच्या जागा कळायला लागत्या. आणि घरांतील एखादी सरू उर्वशीच्या चित्राकडे पाहून नव्यानें आलेल्या पदराची हालचाल सुधारायला लागलेली–वडील नजरेला दिसली कीं, वासनातून तिची कुंडली काढली जाते. सरूलाहि वर्गांतलीं आवाज आणि मिसरूड फुटलेलीं मुलं आपल्याकडे चोरून पहायला लागल्याचं कळतं आणि तींहि सुखावते. आडाजवळच्या औदुंबराच्या पाराशीं ती जरा जास्तीच रेंगाळायला लागते. पलीकडच्या माडांच्या राईतून शेजारच्या एखाद्या बर्व्यांची खिडकी दिसते आणि खिडकीमागून बर्व्यांचा गोपू आपला 'आभ्यास' बघत राहिलेला तिला दिसतो. कालपरवापर्यंत तो तिला–'सरे तू नको आमच्यांत खेळायला' म्हणायचा. त्या गोपूंत देखील पुन्हापुन्हां पहाण्यासारखं नवीन काय आलंय् ते तिला कळत नाहीं आणि आताशा परसदारीच्या ह्या औदुंबराखालीं आपल्याला उगीचच हंसू कां येतं नि उगीचच रडू कां येतं हेहि तिला उमगत नाहीं. आणि कांहीं वर्षांनंतर कुण्या धनकताघरीं नांदणारी सरू कौतुकांच्या पायघड्यावरून चालत जेव्हां माहेरी येते त्यावेळीं परसदारीचा तो औदुंबर मिस्किलपणानें 'सांगू का तुझ्या नवऱ्याला ?' असं म्हणतोय असं वाटतं तिला. त्या औदुंबराला हात जोडतांना पाहून कुणीतरी म्हणतं–'रस्ता काढताहेत तिथून –औदुंबर पाडणार मुन्सिपाल्टी–"

"नको नको–" असं ती म्हणून जाते. झटकन् स्वतःला सावरते नि म्हणते–'औदुंबराचं झाड तोडूं नये म्हणतात ना ग आज्जी–'

असले औदुंबरच काय पण भिंतीचे पोपडे देखील आठवणी घेऊन उभे असतात. हीं घरं पडत नाहींत भिंती पडल्या तरी पडत नाहींत–सुपारीबळचांच्या वाटण्या झाल्या तरी पडत नाहींत. हिरमुसलीं होऊन उभीं रहातात. वर्षभर खिन्न असतात–पण गणेशचतुर्थीला उजळून येतात. त्या एका दिवसासाठीं विभागलेले भाऊ–जावा–नणंदा कुठून कुठून एकत्र येतात. त्या एका दिवसासाठीं उरलेले तीनशेंचौसष्ट दिवस तें घर उभं असतं. एकच कशाला ? अशीं हिरमुसली होऊन उभी राहिलेली आळीच्या आळी मला आठवतें. माझ्या गांवची नव्हे. मी आळीवाल्या गांवांत वाढलोंच नाहीं. मध्यंतरी माझ्या मित्राच्या गांवीं गेलों होतो. दिवेलागणीची वेळ होती. उभ्या आळींत एकाच घरांत दिवा होता आम्हीं उतरलों होतो त्या ! उरल्या वास्तूंत चिडीचूप. चांगल्या दुमजली वास्तूंत देखील. आजारी माणसाची दाढी वाढते, तसें बागेतलें गवत रोगटपणानें वाढलेलें. आंगणांत पाला पाचोळा. तो न्याहाळीत ओशाळेपणानें एक एक घर उभें. परित्यक्तेसारखें. कधीं भिंतीवरच्या शेवाळ्यामागें तोंड दडवीत. तर कधीं तुटक्या फळकुटांची लक्तरें सांवरीत.

"जन्याचें नारे घर ?" महादेव म्हणे !

[पृष्ठ १६८ वर पहा ]









**आंतला ख्याल आंत राहिला तर ते झाले अध्यात्म! ख्याल वाहेर गेला-तर त्याला म्हणतात....कांहींतरी म्हणत असतीलच!**

घराची एक साधी वसकी खिडकी; उंची कमी, रुंदी जास्त. वारा आंत येतो, उजेड येतो वाहेरून. आंतून नजर टाकावी तर ख्याल वाहेर जातो. वाहेरच्यांना आंतले दिसत नाहीं.

असली खिडकी खोलीला असणें आणि तिच्यांतून वाड्यांतील चौकामधल्या हालचाली दिसणें वाईट, फार वाईट!

आंतला ख्याल आंत राहिला तर ते झाले अध्यात्म! ख्याल वाहेर गेला तर त्याला म्हणतात...कांहीं तरी म्हणत असतीलच!

इतका रेखीवपणा अन् तोही या वयांत सहसा आढळत नाहीं. अशी कोरीव जिवणी क्वचितच! गालावर जरा कुठे आता आला सुरकुती एखाद् दुसरी; कबूल, पण पावडरचा एक हात सहज सगळे मिटवू शकेल! डोळे जिथें असायचे, नेमके तिथेंच; तृप्तीनें ओसंडत असलेले. कुणी टक लावली किंवा कुणाची लागली तरी संकोच नाहीं. भुवया काळ्याभोर, कपाळ—अशा कपाळाला कुणी कुणी अष्टमीच्या चंद्राची उपमा देतात. चौथ्या दिसाचे पाणी अंगावर घेणें झाले कीं, त्या कपाळावर कुंकवाची आडवी चीर रेखाटावी आणि चंद्राला म्हणावे, जरा वघ येऊन! सर्वांगावर कांति, पुरेशी सायसाखर खाल्ल्यागत!

सर्वांत मोठा मुलगा सत्तीस वर्षांचा; या अंदाजानें हिशेव केला तर वयाची चाळीशी उलटून दोन वर्षें तरी खरी? अशा स्त्रीला कुणीहि नांव विचारले तरी ती नुसते 'राधा' असें सांगणार नाहीं, 'राधावाई' असें लांबते नांव सांगेल. नांवाला 'वाई' लागली की इमारत जुनी!

तरी देखील चौथ्या दिवशीं न्हायल्यावर कपाळी रेखलेली कुंकवाची आडवी चीर!

आडव्या खिडक्या वाईट असतात. आंतून वघणाऱ्याला सगळे दिसते, निवांतपणें, निःसंकोचपणे!

पण असा हा वघणारा रात्रीं कधी सुखानें झोपू शकत नाहीं. त्याचे नशीवच ते! त्याच्या ललाटीं लिहिली असते तगमग! दिवसा तो भिरभिर वघतो, उगाच खालीं नजर घालून! रात्रीं आठवत असतो अर्धवट दिसलेले, खालच्या नजरेनें वघितलेले. तळमळ, तडफड! नीस काय अन् दीस काय! एकच! इतक्यांत पहाटवीरा आंत झेप घेतो, सवे आणतो वास, पानांचा फुलांचा!



अनुक्रमणिका

निवांत झोप झाल्यावर प्रभाती नवजीवन घेऊन जागे झालेल्या पाखराच्या फड-फडीचा वासही तो बरोबर आणतो. तो वास हुंगत हुंगत हा तडफडणारा जीव उगीचच बसल्या जागीं कामावीस होतो. मग दुसऱ्या दिवसासाठीं निर्मळ संकल्प आखतो. मग त्याचा डोळा लागतो. संकल्पही झोपतात. उगवले कीं, हा जागा, मात्र जियल्या तियें ! त्यामुळें ती तगमग उताराला लागलेल्या पाण्या-सारखी गति घेत वहात असते. वारा आंत येईल हे ठाऊक असते. तो हवासा वाटतो, भीति वाटली तरी हवासा वाटतो घामानें चिंब झालेल्याला सरोवर दिसावे; आंत डुंबायचे, पण कल्पनेनें काटा यावा. जो या काटचाला भितो त्यालाच करंटा की, काय म्हणातात म्हणे !

अशीच एक पहाट. वारा आंत यायची प्रतीक्षा. पण तो यायच्या अगोदरच आवाज आला कुणीतरी बादलींत पाणी ओतत होते; दुसरे कुणीतरी त्या पाण्यांत विसण मागत होते. कपडे भिजविल्याची चिळ्ळ् पिळ्ळ् !

"अहो, केवढ्यानं आवाज करतां ! जागे होतील ना सारे घरचेदारचे !"

"तुझं आपलं मुलखावेगळंच ! चांगली बाथरूममध्यें आंघोळ करावी तर..."

"आतां तुम्हीं सांगा नि मी ऐकतें. कोठीतलं, हौदातलं पाणी विटाळलं म्हणजे मग निस्तरावं कुणी ? एवढंसं पाणी मागितलं तर हा कंटाळा !"

"अग ! मी चार वाजतां उठलो; पाणी तापवायचं म्हणजे काय...."

"पण तुम्हांला जागं मीच केलं ना ? शंभर हाका मारल्या ! शेवटीं..."

"शेवटी खडे फेकून मारले ! काय त्रास...."

"ठीक आहे; हा त्रास लक्षांत ठेवीन. तुमचं नुकसान होऊं देणार नाहीं. मग तर झालं ना ?"

यानंतर कोणाला ऐकूं जाणार नाहीं असें विश्रब्ध हसणें ! त्या हसण्यानें आयु-ष्याच्या पंचवीस वर्षांच्या ढिगाऱ्यावर पांघरूण घातले गेले.

इतर कुणी जागे नाहीं ही ठाम समजूत ! जो जागा आहे त्याचा त्रासिकपणा मनावर घेण्याचे कारण नाहीं. तो आपली वसुली भरपाई करून घेईल. त्यांत सुख कदाचित् नसेल पण क्लेश मुळींच नाहींत. आतां या झुंजुमंजूच्या क्षणीं तो खटचाळपणा करून छेडील असे आता वय नाही. काळाचे, वेळेचे भान विसरून येईल अशी उभारी नाहीं, ना तिकडे ना इकडे ! भूक भागल्याचे ढेकर, तरी चव रेंगाळते, खवखव आसते!

राधाबाई निवांतपणें न्हात होती. सचैल आंघोळ करायची म्हणजे एकेक वस्त्र भिजले पाहिजे, ही खात्री करून घ्यायला हवी. पदर भिजवायचा, पुन: अंगावर घ्यायचा; कुणी कुणी बघत नाहींत ना ? या आशंकेनें आसमंत चोरट्या नजरेनें. भिर-भिरायचे ! छे ! कुठें म्हणतां कुठे प्रकाश नाहीं. चौकातल्या खिडक्या अंधारातच आहेत. ज्या खिडकींत उत्तररात्र उलटे-स्तवर उजेड असतो तेथें सामसूम आहे. आता सूर्य डोकावून पाहील तेव्हाच हालचाल ! आंगणातल्या फुलझाडावर फुले फुलली आहेत. कुणी बघायच्या अगोदर या वया-तली ही लाज झाकली पाहिजे, निस्तरली पाहिजे.

या आडव्या खिडक्या वाईट असतात; अंधारांतलेही दाखवितात !

ही चोर नजर राधाबाईला दिसणें शक्य नव्हते. दिसल्यानेंही तिचे कांहीं नुकसान झाले नसते. तिचे न्हाऊन झाले. आडपदर, आडगुढ्याचे नेसून ती कामाला लागली. चहा झाला. घरांतली मुलं माणसें तीन दिवसांनंतर तिच्या हातचा चहा पिऊन तृप्त झाली. मलाही मोह झाला कीं, आपण जावे; परिचयाचा, शेजारपणाचा फायदा घ्यावा; एक कप चहा घ्यावा; चहा पितांना कपाच्या अंतरायांतून राधाबाईकडे बघून घ्यावे. मोह झाला पण धीर मात्र झाला नाहीं. माझ्यापुरता तिला बघण्याचा विचार सोयीचा होता, पण समजा कीं, तिला माझे डोळे दिसले असते; माझ्या बाहुल्यांत मी पकडून ठेवलेली सकाळची तिची आकृति दिसली असती आणि भरल्या घरांत कुणाला न कळत तिनें कपाळावर आठी पाडली असती व तिरस्काराचा एक निःश्वास टाकला असता तर...?

राधाबाईला मी आजच बघत होतो असे नव्हे. सगळ्यात धाकटा तिचा अशोक. तो झाला त्यावेळीं अशोकचे वडील दौऱ्यावर होते. तेव्हां सूतिकागृहांत पोचविण्याचे काम मीच केले होते; दहा दिवसांत हवे–नकोची विचारपूस मीच केली होती. अनेकदा त्या मंडळीकडे जेवलो होतो. त्यांच्याकडे मला व मजकडे त्यांना उघडे दार होते. राधा-बाईंच्या दोन्हीं मुलींची लग्नें याच विन्हा-डांत माझ्यादेखत झाली होती. अशोकला कॉन्वेंटमध्यें मीच प्रवेश मिळवून दिला होता!



—वामन चोरघडे

हे सगळे खरे पण सकाळच्या झुंजुर-क्यांत दिसलेली राधाबाई वेगळीच ! व्यक्ती महत्त्वाची नसते. वैशिष्ट्य परि-स्थितीचे, प्रसंगाचे ! पहाटे दिसलेली राधा-बाई दिसायला नको होती आणि जसजशी नको होती तसतशी, डोळे उघडे ठेवा कीं बंद ठेवा, दिसतच होती. नेहमींचे नऊवारी लुगडे नव्हते. आडगुड्याचे, थिट्या पदराचे ते नेसणें; किंचित् झाक-लेली म्हणूनच उघडी पाठ; ओणव्याने घरकाम आटोपतानाची हालचाल !

मन असे मागे गेले. खूप वर्षांमागें जाऊन कल्पना करू लागले, कसल्यातरी रूपाची, आकृतीची जिच्यांत आजची निपूर्ण पुरासारखी खळखळत होती. अवघ्या अर्ध्या पावतासाच्या घटने-नंतर इतका बदल ?

त्या देखणेपणांत जे बघता, कल्पिता आले ते नजरेसमोरून हलेना. इतर कांहीं कांहीं दिसत नव्हते; तिची मुलें दिसली नाहींत, तिचा संसार दिसला नाहीं;







जळभारी ढगाच्या सावलीत विसावत बसलेली राधाबाई पण दिसली नाहीं.

तगमग, चाळा, संकोच, लाज भीति! आपले आपल्याशीच बोलतांना मनाची थरथर. हे थरथरते मन घाबरते आणि ज्याला घाबरते त्याच्याच पुढयांत जाऊन उभे राहते—वाघाच्या वासानें त्याच्याकडे जाणाऱ्या घोडयासारखे !

शेजार झाला म्हणून काय झाले, एकदम या नव्या उभारीत ये जा वाढविणें शक्य नव्हते. फूल वास घेऊं देते, प्रतिकार करीत नाहीं. पण इथें बोलाचा अन् फुलाचा अवसर नव्हता. दिवसाढवळया त्याच खिडकींतून बघत राहणेंही शक्य नव्हते, कारण अनेकदा माझ्याशी काम असले कीं, राधाबाई याच खिडकींतून हाक मारायची, बोलायची !

खूप जावेसे वाटू लागले, खूप बोलावेसे वाटू लागले आणि निकडीचे काम असल्या-शिवाय मी बोलत नाहीं असे भासवितांना मनाची त्रेधा तिरपिट उडू लागली. खूप खूप कामें काढावीत म्हणजे आपले आपल्याला तरी समजाविता येईल— 'छे, तसं कांहीं नाहीं बरं कां! आपलं सहज कामानिमित्त' असे आपल्याच मनाला समजावून 'गप रे' म्हणता येईल !




दुपारी अशोक शाळेंतून आला. त्याला बोलाविले. त्याच्या अभ्यासाची चौकशी केली. त्याच्याकडे शाळेंत मुळींच लक्ष दिले जात नाहीं, असा एक झकास शोध मला लागला. अशोकच्या हातावर मूठभर टॉफी ठेवली. त्याला अभ्यासाचे लिहायला माझ्या खोलींत बसवून त्याच्या वाटयाची कामें करायला मी त्याच्या घरीं गेलो. आपल्या मुलाकडे एवढे लक्ष ? राधाबाई तृप्तीच्या हास्यानें चेहरा उजळीत मला बसा म्हणाली. आजचे शिक्षक कसे निष्काळजी असतात हे मी पटवून देत होतो. ती डोळे विस्फारीत ऐकत होती—अशी, जवळच, समोर बसून ! अशोककडे लक्ष द्यायलाच हवे, नाहीं तर तो मागे राहील हे तिला पटले कीं, नाहीं कुणास ठाऊक; मला पटले होते !

दुसरे दिवशीं बिचाऱ्या अशोकला सूचना मिळाली की मी, जे सांगेन ते त्याने ऐकायलाच हवे !

अशोकची जिवणी, त्याचे कपाळ... कदंबाची स्फुटकोरक फांदी बघून रामाला सीता आठवावी, त्याने तळमळावे, केविलवाणें व्हावे आणि प्रजेच्या भितीनें सगळे आतल्याआंत ठेवणें नशिबी यावे. रामाला निदान सीतेची तरी भीति नव्हती !

सहामाही परीक्षेंत अशोकचा नंबर दुसरा आला. त्या यशाचे श्रेय त्याला देऊन मी सुखावलो ! राधाबाईसकट सगळयांनीं माझ्याबद्दल जवळीक दाखविली. आजवर मी निमित्त शोधत होतो बोलायला. आता राधाबाईला गरज वाटू लागली. पोळयांतून मध ठिपकावा तशी ती माझ्याबद्दल बोलू लागली. इतरा-जवळ. मला चेकाळायला तेवढे पुरले.

पण माझ्याबद्दल, माझ्या एकटयाजवळ तिने कां बोलू नये ?

मनाचा हा फेस कांहीं दिवस शिगेवरी येत गेला. सर्वांच्या साक्षीनें सार्वजनिक बोलण्यापेक्षां खिडकींतून निवांत, न कळत बघणें अधिकाधिक आवडू लागले. अशोकला शिकवीत होतो. त्या उपकाराचे





फळ मिळत होते. त्यापासून अधिक विश्र-ब्धाची आस खोटी होती तरी वाढत होती. याहून अधिक उपकार केले तर ? तशीही संधी मिळाली.

अशोकचे वडील; साधा, सरळ, भोळा माणूस. एवढ्यातच मी त्याच्याशी कमी बोलत होतो. एरवी तासन् तास गप्पा मारण्यांत वेळ कसा गेला हे कळत नसे. माणूस निर्मळ, निरोगी, चार जणांत उठून दिसणारा, कुणालाही वाटेल कीं, त्याच्याशी दोन शब्द बोलावे. माझे बोलणें बंद झाले ते वेगळे. कधीं कधीं राधाबाईचे शब्द कानावर येत 'अहो, ऐकलं कां ? अहो, ते हे आणायचं आहे.' वास्तविक 'अहो' हा अगदींच निरुपद्रवी उद्गार ! पण मला तो बोचू लागला. या माणसाला अशोकचा पिता मानायला हरकत नाहीं पण राधाबाईचा... ! म्हणजे मला आपले असे वाटत होते.

असा हा एकमार्गी माणूस; कुणाच्या उपयोगी पडता आले तर आनंद मानणारा. बँकेंत खजिनदाराची नोकरी. जोखमीचे काम. कुणाची तरी कणव आली, त्याचे भले करायला गेला आणि बळी पडला. प्रकरण अंगाशीं आले. चोवीस तासांच्या आंत दोन हजार रुपये भरायला हवेत. ज्याच्यामुळें भरावे लागणार तो प्रामाणिक होता पण त्याचा निरुपाय होता.

एवढी रक्कम चोवीस तासांत कशी भरणार ? अशोकच्या घरच्या दोन मुली उजवल्या. मोठा मुलगा अजून शिकतोच आहे. घरभर माणसे. घरांत सोवळे ओवळे, कूळकुलाचार. कसेबसे आजचे उद्यावर सुखाने रेटले जाई हे खरे पण एवढ्या रकमेची सोय नव्हती.

अशोककडून ही कुणकुण अर्धवट कळली. राधाबाईला विचारावे म्हणून उठलो, तोच राधाबाई आंत आली.

"अशोक, तू जा खेळायला. मला यांच्याशी कांहीं बोलायचं आहे."

चेहऱ्यावर हास्य पण उसने आणलेले. आंतून हादरा बसलेला.

"अशोकला बाहेर जावं लागावं असं काम तरी कोणतं ? आणि त्यासाठीं तुम्ही स्वतः आलात ? मला हांक दिली असती तर फार बरं वाटलं असतं."

"मला नसतं वाटलं. ही चर्चा मुला-बाळांच्या देखत नको, म्हणून तुमच्याकडे आले. एकटे आहांत तोवर बोलून घेते."

अशोकने कल्पना दिली होती. नाहींतर या शब्दांनीं फार गुदगुल्या झाल्या असत्या.

"थोडी कुणकुण लागली मला. कुणीतरी मित्र . . ."

"हो, तीच चिंता पडली आता. तो व्यवस्था करतो म्हणाला, पण आम्ही या चोवीस तासात काय करणार ? म्हटलं, तुम्हांला कांहीं मार्ग सुचला तर विचारावा. माझ्या दागिन्यांचा कांहीं उपयोग होऊं शकेल कां ?"

"अशोकचे वडील काय म्हणतात ? त्यांच्याशी बोलायला हवं."

"अहो, ते तर मघापासून कपाळावर हात देऊन बसले आहेत !"

"मला उपाय सुचतो. तुम्हांला पटला तर बघा. ही रक्कम मी देऊ शकतो. अट एक आहे. मी कांहीं उपकार केला असं कोणी अन् विशेषतः तुम्ही मनांत देखील आणायचं नाहीं. तसं तुम्ही माझ्याशी वागायचं नाहीं. तुमची सवड झाली कीं, मला माझी रक्कम परत करा."

राधाबाईनें माझ्याकडे पाहिले, तिचा विश्वास बसेना माझ्या बोलण्यावर आणि माझा विश्वास बसेना तिच्या बघण्यावर ! तिच्या दृष्टींत मुलेबाळे, संसार, पती, कूळकुलाचार, अब्रू आणि कृतज्ञता होती. आणि या सर्वांतून मला फक्त दिसत होती त्या दिवशीं न्हायल्यावर रेखलेली कुंकवाची आडवी चीर ! त्या दिवशीं खिडकीतून बाहेर गेलेला ख्याल !

"तुम्ही स्वस्थ असां. काळजी करू नका. मी तास दोन तासांत येतो. तोवर तुम्ही नानासाहेबांना गरम कॉफी करून द्या. मी आलो कीं, आपण सगळे चहा घेऊ. चालेल ? की आणखी कांहीं ?"

"चालेल हो ! चहाच काय, मागाल ते ! आणखी कसं सांगू ?"

राधाबाईच्या डोळ्यांत यावेळीं मी दिसलो !

किटाळ निस्तरले. आठ पंधरा दिवसांत त्यांच्या त्या मित्राने पैशाची व्यवस्था





अनुक्रमणिका

केली. सगळे आनंदात. उद्या चेक वटविला जाईल !

उद्या उगवण्याच्या आदली रात्र. दिवस कामाकष्टांत निघून जातो. प्रकाशात किडामुंगीचा त्रास जाणवत नाहीं. रात्रीच्या अंधारांत मात्र जे दिसू नये ते दिसू लागते. तळमळ, तगमग ; 'अहो, चहाच काय, मागाल ते !'

पण उद्या पैसे घेऊन येतील ते नानासाहेब. राधाबाई यायची नाहीं. कदाचित मलाच बोलावतील, चहा देतील. त्यापेक्षा पैसे नसते दिले तर बरे झाले असते ! 'अशोक, तू जा बाहेर खेळायला. . . !'

खिडकींतून बाहेर बघितले. सगळा अंधार. खोलीतला दिवा बंद केला. मनांत कांहीं येत होते, कांहीं दिसत होते. कधीं राग स्वतःचाच, कधीं चाड !. . . .

आणि इतक्यांत चौकाच्या पल्याड असलेल्या त्या बिऱ्हाडाचे दार उघडले. उजेड चौकांत आला. त्याच्या मागोमग राधाबाई बाहेर आली. अं ? लुगडे नऊवारी की पाचवारी साडी ? बाहेर म्हाणी घराचा दिवा लागला व दार बंद झाले. पाण्यात तांब्या बुडविल्याचा आवाज. इकडे बिऱ्हाडाच्या दारांतून नानासाहेब बिछान्यावर उठून बसलेले दिसले. बाकी सगळा वाडा शांत, निवांत झोपला होता

जळजळ. कांहींतरी पेटले. धूर. धूर झाला. वारा यायला हवा. इकडे दिवा लावला तर तिकडे दिवा विझेल. ते नको होते.

दिवस उजाडला. कधीं नव्हे ती त्या दिवशी चौकांत उघडणारी माझ्या खोलीची खिडकी मी बंद केली. तो धूर नको. ते गुदमरणे नको.

काय चुकले होते कोण जाणे. कोण चुकले होते कुणास ठाऊक. नुसती व्यक्ती, नुसती आकृती खरी नव्हे. प्रसंग, घटना, तिच्याशी निगडित व्यक्ती ! त्या दिवशीचे सचैल स्नान आणि कालच्या रात्रीचे ते !

दुपारी राधाबाई आली. हिरव्या नोटांची चळत तिच्या हातीं होती. शरीराची, मनाची विलक्षण तृप्ती तिच्या हालचालीत होती. अंगावरचे चार दोन दागिने उठून दिसत होते. चेहऱ्यावरची ओढ निमाली होती; नितळपण झळाळत होते. कुंकवावरचे किटाळ गेल्याने त्याची लाली तकाकत होती. संथ, मंद चाल; निर्मळ निःसकोच दृष्टी. त्या दृष्टींत अशोक होता, त्याचे वडील होते, लग्न झालेल्या दोन मुली मुद्दाम सासरहून त्या डोळ्यांत खेळायला आल्या होत्या. त्यांपैकीं धाकटीचे दिवस भरले होते; केळीच्या गाभ्याचे लोभस पिवळेपण कांतीवर शोभत होते; घरांतले देव होते; फुलांनीं खुललेला देव्हारा होता; तुपाची फुलवात होती; कापराचा वास होता; आणि—

आणि सगळ्यांत शेवटीं डोळ्यांच्या कडेतू मी होतो, एका बाजूला असा कोपऱ्यात; माझ्या दोन्हीं हातांनीं मी असे एक झिरझिरीत पांघरूण धरले होते, चमेलीच्या कळ्या झाकायला वापरावे तसे !

राधाबाईच्या त्या दृष्टींत तरळणाऱ्या सर्वांना ती हवी होती; ती छोटी गर्भारशीण तर सारखी आई आई हांक मारत होती !

राधाबाईची ती तृप्त, ओली, कृतज्ञ दृष्टी !

ही राधाबाई बघताच, गेल्या कांहीं दिवसात ज्या राधेच्या आकृतीने मी वेडापिसा झालो होतो, ती आकृति



अनुक्रमणिका

घेतली. दिव्या भोवती फडफडणारे किडे नाहीसे झाले ! माझी मला लाज वाटली !

आताच्या या राधाबाईकडे शुद्ध हरवून त्यागत मी बघू लागलो. ती देखील बघत होती, नित्य कामातून देव्हाऱ्याकडे लक्ष जावे तशी !

"तुमचे पैसे द्यायला आले आहे. तुमची अट मी विसरले नाही. म्हणून कांहीं बोलत नाहीं. पण खरोखर तुम्ही फार, फार.....! मला जर तुमच्यासाठीं कांहीं करता आलं. . . असं बघू नका, आता नाही बोलत; न बोलताच तुम्हाला समजेल. खरं ना ? हे घ्या."

मी हात पुढे केला. दीड एक महिन्यापासून वावचळलेला माझा ख्याल कसा, कुठून, कधी गुपचूप आत आला ते कळले नाहीं. त्या क्षणी असे वाटले की, राधेच्या डोळयातले हे इमान, ही अब्रू संभाळली पाहिजे; यापैकीं कशाचाही अवमान, अपमान होता कामा नये; नाहींतर माझा मान राहणार नाहीं. त्यापेक्षां मान गेली तरी परवडेल !

"रागावू नका. पण मला तुमच्यासाठीं काही करता आले तर..."

कांहीं बोलायला मला सुचले नाहीं म्हणून मी बोलून गेलो—

"खरंच तुम्ही माझ्यासाठीं कांहीं कराल ?"

"हो ! सांगाल ते ! शपथ घेते."

"तुमच्याकडे पैठणी आहे ?"

"हो ! आता मालीच्या लग्नात पुनः घेतली. कां ?"

"तुमचे दागिने आहेत? गोठ, पाटल्या..."

"हो आहेत ! पण हे सगळं कशासाठीं ? कां विचारता तुम्ही ?"

"विचारत नाहीं; करायला सांगतो. तुम्ही शपथ घेतली ना ? मग ती पाळायची. ती नऊवारी पैठणी, जरीच्या बुट्टयांची चोळी, डोक्यांत राखडी, मूद, अग्रफूल; कपाळावर बिजवरा; कानात बुगडी, वेल; गळयात टीका, ठुशी, सरी, गोफ, चंद्रहार; हातात गोठ, पाटल्या, तोडे; दंडात वाकी; पायात जोडवी, विरोल्या— सगळं घालायचं अन् तेही आता, या वयात ! कपाळावर कुंकू, डोळ्यांत काजळ, हाताला उटी— बघू या कोण छान दिसतं ते, दागिने की. . . ! अन् एक फोटो काढायचा ! छान निघेल ! त्या फोटोची एक प्रत मला द्या, म्हणजे माझ्या उपकारांतून तुम्ही सगळे मुक्त !"

"अहो, हे काय भलतंच ! इश्श बाई ! काय म्हणतील सगळे ?"

"मला काय ठाऊक ! तुम्ही शपथ घेतली आहे !"

"मी कुठे नाहीं म्हणते ? एवढंच ना ? पण फोटो कोण काढणार ? सांगा ना कोण काढणार फोटो ?"

आणि चेहऱ्यावर असा फिक्कट संध्यारंग ! डोळयात हर्षाचा नगार ! रेखीव, सरावाने आकारलेली अंगकाठी !

पावसाची सर ! कमलपत्रावर मोत्यांची उधळण ! आणि दळभारी कमळाचे फूल प्रसन्नपणें उमलावे !

राधाबाईचा नितळ मुखडा नजर चोरी न करता मला बघता आला, बघावासा वाटला— बघितला— बघत राहिलो !!

● ● ●

विचारवंतांना शून्यांतही पदार्थ दिसतात, कलावंतांना ओबडधोबड दगडांतही पाषाण शिल्पें दिसतात. जे तर सहज दिसत नाहीं असे कांहींतरी कवींना गवसते.
—काकासाहेबांनाही पालमच्या विमानतळावर विमानें आणि वैमानिकां-पलिकडे कांहीं 'पॉट' दिसले. त्याचें तर हें वर्णन!



# पालम विमानतळावर

—नं. वि. गाडगीळ

स्वातंत्र्य मिळून १८ वर्षे झाली आणि तसें म्हटले तर जवळ जवळ एक पिढी झाली; सामान्यपणें २० वर्षे म्हणजे एक पिढी असा दंडक शिक्षण क्षेत्रांत आहे. सामाजिक जीवनांत ३० वर्षे म्हणजे एक पिढी असें आपण मानतो. तथापि कमी जास्त प्रमाणांत एक पिढी स्वातंत्र्य प्राप्तीनंतर मध्यें होऊन गेली आहे. आणि या पिढीनें काय प्रगति पाहिली, काय परागतीचा अनुभव घेतला, किती सुख भोगले व दुःख सहन केले याचा हिशोब यथासमय इतिहासकार घेतील. कालाच्या अगदीं जवळ असल्यानें यथार्थतया चित्र काढतां येणार नाहीं. परिस्थितीचे सम्यक आकलन करतां येणार नाहीं. तथापि सामान्यपणें या कालखंडात वैचारिक प्रवाह, नैतिक व सांस्कृतिक दृष्टीनें किती बदलले आहेत, कसे वाहात आहेत याची कल्पना करणें अगदींच अशक्य नाहीं. इतक्या थोड्या काळांत, इतक्या झपाट्यानें सामाजिक व नैतिक मूल्यें बदलली आहेत कीं, त्याला दुसरे उदाहरण अतीत काळांतील अगर अन्य देशांतील देतां येणार नाहीं. आज कालचे असें कांहीं राहिलेच नाहीं. आजचे म्हणून आपण सुरू करीत आहोंत व आज संपावयाच्या आधीच ते सोडून देत आहोत. हा विचित्र सामाजिक अनुभव भारतांत येत आहे. आणि त्याच प्रमाणांत व तितक्याच तीव्रतेनें महाराष्ट्रांतहि येत आहे. क्षणभर हे जे चालू आहे त्या समाजच्या नित्य जीवनाशी, मौलिक श्रद्धेशी सुसंवादी आहे कीं नाहीं याचा विचार करणें अवश्य झाले आहे असें माझे प्रामाणिक मत आहे.

कांहीं दिवसांपूर्वी नेहमीप्रमाणें दिल्लीला गेलो होतो. आणि परत येण्याच्या विमानाला वेळ होता, म्हणून दिल्लीच्या विमानतळावर तास-दोन तास बसून राहिलो होतो. १८ वर्षांपूर्वीचा विमानतळ आतां तो राहिला नव्हता. किती तरी पटीनें त्याचा विस्तार झाला होता. प्रवाशांची बसण्याची जागा आतां पूर्वीच्या इतकी मर्यादित राहिली नव्हती. आतां प्रवाशांची संख्या १०–१२ पासून शेंकडोपर्यंत आली होती. आतां तासाला तीन-तीन, चार-चार विमाने तळावर उतरत व तळावरून निर्वाण करीत होती. आणि प्रवाशांची संख्या अफाट वाढल्यामुळें त्यांच्या सोयीसाठीं, निवाऱ्यासाठीं अगदीं आधुनिक सुखसाधनांनीं सज्ज झालेली ऐषआरामी निवासस्थानें बांधण्यांत आलीं होतीं. त्यांत ठेवलेलें फर्निचर हें कोठल्याहि राजवाड्यांतील फर्निचरला कमी लेखणारे दिसत होते. उपाहारगृहें तर एवढी टापटिपीची व तेथील सेवक स्त्री व पुरुष एवढे उत्साही, दिसत होते कीं, आपण जुन्या भारतीय दुनियेंत रहात नसून दुसऱ्या कोठल्या तरी दुनियेमध्यें आहोंत असेंच ५–१० वर्षांपूर्वी आलेल्या प्रवाशाला वाटावे. आणि त्या उपाहरगृहांत येणारे व जाणारे त्याचप्रमाणें तळमजल्यावरील विश्रांति स्थान येणाऱ्या व जाणाऱ्या किलबिल किलबिल करणाऱ्या स्त्री-पुरुषांकडे पहात असतांना सारा १८



अनुक्रमणिका

वर्षांचा इतिहास माझ्या डोळ्यांपुढें उभा राहिला. हिंदी स्त्री आतां स्वातंत्र्यापूर्वीची शालीन, विनयसंपन्न, मंद गतीची दिसत नव्हती. तिच्या पोषाखांत आतां साडीवर विजय मिळवून घट्ट विजार आलेली होती. व तिच्या वक्षस्थळाला झिरझिरीत कापडाचे-सुद्धां वजन वाटावे असें दिसत होते. केश-भूषा अजिंठा शैलीची मागें पडून आधुनिक ‘टोनी’ पद्धतीवर मुक्कामाला आली होती असें दिसत होते. आतां वेणी व अंबाडा या गोष्टी इतिहासजमा झाल्या आहेत. पाठीवर शेपटा सोडलेल्या कांहीं अज्ञान मुली अजूनहि दिसतात. पण ‘बॉब-कट्’चा प्रचार मोठ्या प्रमाणांत दिल्लींत, दिल्लीच्या शिक्षण केंद्रातून सहज जाणाऱ्याला दिसून येतो. आणि पुरुषांच्याबाबत आतां धोतराला धक्का मिळालेला दिसत आहे. नेहरूंच्या राज्यांत राजकीय प्रतिष्ठेचा पोषाख म्हणून तंग व चुडीदार पायजमा व शेरवाणी यांचा बोलबाला होता. आतां टेरेलिन व बुशशर्ट यांचे संवत्सर सुरू झाले आहे. त्या दिवशींचा संध्याकाळीं धोतर नेसलेला एकमेव हिंदी सज्जन म्हणजे प्रस्तुत लेखकच होता. आणि आजहि पुणें शहरांतून जेव्हां मी जातो तेव्हां क्वचित् २००–३०० लोकांमध्यें धोतर नेसलेला आढळून येतो. आणि जो आढळून येतो तो १०० टक्के साठी उलटलेला अगर व ग्रामीण भागांतील मध्यम वयांतील असतो. सारा पोषाखाचा दरबार आतां बदलून गेला आहे. पुणें शहरांतील जुनी शांतता, वागण्याचे गांभीर्य, भाषणांतील प्रौढता आतां भारत इतिहास संशोधन मंडळांतही दिसून येत नाहीं. दोन-तीन जुनी म्हातारी माणसे सोडली तर लग्न प्रसंगालासुद्धां डोक्यावर पागोटे घालणारी आढळून येत नाहीं. सारा जमाना बदलला आहे. पण याचे इतके वाईट वाटत नाहीं, जितके आधुनिक समाजांतील मन बदलले आहे त्याचे.

स्वातंत्र्यापूर्वी असा काळ होता कीं, लोकसेवा म्हणजे सेवाभावानेंच केली जात होती. एक तीव्र भावना परकी अंमल नाहींशी करण्याबाबत होती. व ते प्रामाणिक रीतीनें नाहींसें करण्यासाठीं जी किंमत आपण देऊं शकतो ती देऊं, पण एक उच्च धर्म, श्रेष्ठ धर्म मानला जात होता. लक्षावधी लोक आपण करीत असलेली जनसेवा म्हणजे गुंतवलेले भांडवल आहे असे मानत नव्हते. किंबहुना तशा तऱ्हेचा विचारसुद्धां त्यांच्या मनामध्यें येत नव्हता. याचा अर्थ असा नव्हे कीं, येथून तेथून सारी जनता स्वातंत्र्याच्या कल्पनेनें वेडावलेली होती; अगर धुंद झाली होती. तथापि समाजातील सामान्य स्त्री-पुरुष आपापले स्वकर्म करीत असले तरी त्यांच्या मनाच्या तळघरांत स्वातंत्र्य भावनेचा नंदादीप तेवत होता. त्याबद्दलची तळमळ त्यांच्या विचार शरीरामध्यें सळसळत होती. कांहीं धोरणानें त्याग करीत असत. त्यांत धोरण असले तरी ध्येय होते. स्वतःचा स्वार्थ तेथें नव्हता. जळकी चिमणी हातांत घेऊन ज्या अनंतानें आपले धैर्य अनंत असल्याचें शाबीत केले त्या तरुणापुढें आपण कोठें तरी सरपंच होऊ, कोठें तरी कधीं तरी आमदार, खासदार होऊं अशी कल्पनासुद्धां नव्हती, नव्हे येणेंच शक्य नव्हते. कापुरानें जळावयाचे आणि जळतांना सुगंध पसरावयाचा एवढंच त्यांच्या जीवनाचे तत्वज्ञान होते. वर्षानुवर्षे कारागृहांत जीवनाची वीणा शृखलांच्या आवाजाबरोबर लय साधून वाजवावयाची हेंच ज्यांनीं श्रेष्ठ भाग्य मानले त्यांच्यापुढें कोठलीहि ऐहिक उन्नतीची कल्पनाहि नव्हती. कल्पनाहि येणें शक्य नव्हते. कारण एकोणीसाव्या शतकांतील शेवटल्या पंचवीस वर्षांचे व विसाव्या शतकांतील पहिल्या चाळीस वर्षांचें वातावरण हे श्रेष्ठ, उन्नत व एका दृष्टीनें अध्यात्मिक स्वरूपाचे होते. त्या वातावरणांत देवाच्या जागीं देश स्थापन करून देवाचे फांसे कसेहि पडले तरी प्रयत्नाचा देव सोडणार नाहीं अशी प्रतिज्ञा घेतलेले अनेक लोक होते. समाजामध्यें नाना तऱ्हेचे वर्ग असतात. नाना विचाराचे वर्ग असतात. घरामध्यें दिवाणखाना, ग्रंथालय, ओसरी, पडवी, स्वैपाकघर पण त्याचबरोबर देवघरहि असावे लागते. त्याचप्रमाणें समाजामध्यें चिंतन मूल्याचा विचार करणारी, विवेकाची ज्योत अखंड प्रज्वलित ठेवणारा असाहि एक वर्ग असावा लागतो. दिव्याची वात वातावरणांत जळत असते पण वातावरणापासून अलिप्त असते. त्याचप्रमाणें साऱ्या भारतीय समाजांत व महाराष्ट्रीय समाजांत असा एक वर्ग होता, अल्प होता पण महान होता, ज्यानें ध्येय व आदर्श संरक्षणाचे व्रत घेतले होते. त्या व्रतार्थ देहदंड व जीवनदान देण्याचें ठरविलें होते. त्यांची प्रेरणा तशीच होती. वीर सावरकरांच्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे ती प्रेरणा व ती प्रतिज्ञा अंधतेनें घेतली गेली नव्हती. निसर्गाच्या शिकवणीनें इतिहासाच्या प्रकाशांत जे मार्ग मिळाले त्यांनीं हें घडून आले होते. त्यांतील त्या सर्व व्रतधाऱ्यांनीं घेतलेले व्रत हें दिव्य आहे, दाहक आहे याची जाणीव होती आणि ही जाणीव असून ते व्रत स्वीकारलेले होते. सोडतीचे तिकीट घ्यावे याप्रमाणें त्यांनीं जीवनाचा आदर्श घेतला नव्हता आणि म्हणून फलप्राप्ति झाली नाहीं किंवा होणार नाहीं याचा त्यांना खेद नव्हता. त्यागांत स्पर्धा होती जे दुर्बल होते त्याबद्दल सहिष्णुता होती. करीत असलेल्या पराक्रमाची जाणीव असून अहंकाराची दुर्गंधी त्याला नव्हती. व्यक्ति आपलें जीवन समाजाच्या जीवनांत पहात

युद्धबंदीसह ब्लॅक-आऊट झालाच पाहिजे

ब्लॅकमार्केटीयर



ब्लॅकआऊट गया मारे साला ब्लॅक मनीनो आधारज गयूं !



## मी पॅरीसला जाऊंच शकलो नसतो ह्या पंखांनी

**परमेश्वरी राडारानें विझलेली अलक्ष्य निरंजन विझणं उठवतात विस्कटून जन्मदुभंगत जाणारी मॅग्नेटिक लाट खगोलाचा खोल झोळ आणि मघोमघ विखुरलेली ओळ आतां बिनसूर्याची उगवते पहाट, सुकतो अंगकाठ मरणं आणि संभोगांनी ओला ठेवलेला, उघडतात तारांगणं**

**आता ही थेटवर नेट धरते अनाग्रही ओळ आवर्तक उठतो जन्मज्ञानाचा घुरळा विराट क्षणांच्या हवेंत हृदयांतून स्फुरतो उंच मुस्कुराहटीचा आनंदी भुईनळा मी अपंग डोळ्यांनी आणि राजी हातांनी खेचतो हीं व्हेनिशियन् ब्लाइंडस् लाटांची उघडून घेत प्रकाश**

**समुद्रतळांच्या भिरकावांत आणि खुल्या अवकाशांत जन्मसपाटीपासून उचलले जातात सगळे अनुभव भराभरा निर्मनुष्य होतात जिवाच्या मुंबया दडपलेले मोहोंजोदारो उघडतात थडगीं थेटचीं आणि काळा चष्मा लावून चालत येतं माझं गाडलेलं प्रेत पुन्हा जन्माच्या सोवळ्याओवळ्यांत स्नानाशिवाय.**

**—दिलीप पुरुषोत्तम चित्रे**

होती. होडीचा वल्हविणारा होडींतील सर्व यात्रेकरूंसाठीं वल्हवित होता हा श्रेष्ठ भाव त्यांत होता.

. . . आणि आतां माझ्या डोळ्या-समोर चाललेली नर-नारींची चालती बोलती चित्रें मला काय सांगत होती ? सारीं माणसें झपाटयानें कोणी तरी ढकलत आहेत अशा तऱ्हेनें पुढें जात होती. त्या द्रुत गतीचे चित्र भारतांत आतां सर्वत्र दिसत आहे. खेडे-गावांत मोटार आली त्या आधीं चहा आला, नंतर वर्तमानपत्र आलें. आणि तिघांनीं युगायुगांतील शांतता वरवाद करून टाकली आहे. जेथें तेथें आपले घोडे दामटावयाचे, इतरांना जुमानावयाचे नाहीं हे वातावरण सर्वत्र दिसून येत आहे. ही सर्व जनता कोठें चालली आहे? समुद्रांत ज्याप्रमाणें नौका दिशाहीन झाली म्हणजे इतस्ततः वाहतांना दिसते तसें आज भारतीय समाजाचें जीवन दिसत आहे. इतकी ध्येयशून्यता कशी आली ? इतका स्वार्थाचा बाजार कसा भरला ? सारा चरित्र्याचा सांठा भूमिगत कसा झाला ?

आज जसे जीवनामध्यें शुद्ध घृत आढळून येत नाहीं त्याचप्रमाणें आज विशुद्ध चारित्र्य सार्वजनिक जीवनांत व व्यक्तिगत जीव-नांतहि दुर्मिळ झाले आहे. आज तरुणांना ध्येयाची अशी प्रेरणा नाहीं. सामाजिक वंधन अगर सांस्कृतिक अनुशासन उरलेली नाहीं. सर्वत्र नैतिक विस्कळितपणा अणि पायापुरतें पाहाण्याची दृष्टी तेजीत आहे. जग कांहीं आहे, शेजारधर्म कांहीं आहे, समाजाची चिरंतन मूल्यें अशी कांहीं आहेत याचा पुरावा आतां दिसून येत नाहीं. वैवाहिक जीवन आतां हवें आहे, पण त्यांतील जवाव-दारी नको आहे. विद्येतील प्रतिष्ठा हवी आ पण त्यासाठीं करावा लागणारा प्रयास नको आहे. धन तर आयुष्याचे एकमेव ध्येय झाले आहे आणि त्यासाठीं कोठलाहि मार्ग आज प्रतिष्ठित मानला जाऊं लागला आहे. परसत्तेखालीं चारित्र्य अधिक होते आणि त्याच्याच प्रेरणेनें स्वातंत्र्याची भावना प्रज्वलित होत होती. आतां स्वातंत्र्य आले आणि चारित्र्य दृष्टीआड झाले आहे. राष्ट्रपति डॉ. राधाकृष्णन् म्हणतात कीं, देशाची परिस्थिति चारित्र्यहीनतेमुळें संकटांत आली आहे ही गोष्ट खरी आहे. हे कां व्हावे ? असा विचार करूं लागलो तेव्हां असें मनाला वाटूं लागले कीं, स्वातंत्र्य स्वस्तांत मिळालें, कृत्रिम क्रांतीनें मिळाले आणि जी गोष्ट विनाकष्ट मिळते तिची किंमत माणसाला कमी वाटते. अन्य देशांतून रक्तरंजित क्रांत्या झाल्या आणि दिव्यांतून ती राष्ट्रें वाहेर पडली, म्हणून स्वतंत्र झाली, म्हणून स्वातंत्र्याचें संरक्षण म्हणजे देहाचे संरक्षण असें प्रत्येक व्यक्तीला वाटते. आपण व राष्ट्र यामधील आपुल-कीची भावना (Sense of Belonging) आज भारतांत क्वचित्च आढळून येतो. आपल्या स्वार्थापलीकडे कांहीं आहे असें क्वचित् वाटते. माझा स्वार्थ म्हणजे समाजाचे हित हा मंत्र मंत्र्यापासून सामान्य जनापर्यंत प्रभावी ठरत आहे. असे कां व्हावे ? आणि भारत हें एक राष्ट्र आहे कीं ज्याच्या-साठीं जगावे व ज्याकरितां मरावे असें वाटणारे या राष्ट्रांत मोठ्या संख्येनें कां नसावेत याचाहि विचार मन करीतच होते. भारत हा भौगोलिक विचार एवढाच अनेक शतकें होता. त्याची शक्ति एक होती. पण साऱ्या भारतावर एक राज्य अगर सारा भारत म्हणजे एक राष्ट्र आधुनिक दृष्टीनें असा कधीं नव्हता. इंग्रजांनीं आपल्या अंमलाखालीं सारा भारत प्रथम आणला आणि या परराज्याविरुद्ध नाना-विध भाषा वोलणाऱ्या नानाविध धर्माचे आम्हीं एक झालो व त्या एकीतून जो भाव निर्माण झाला त्या भावाला आधुनिक दृष्टीनें थोडे राष्ट्रभावाचे स्वरुप आले. पण ही भावना अभावात्मक होती. (Negative) एका चौकटींत मग चित्र काढावयाचे होते व ते भावात्मक राष्ट्रवादाचे (Positive—Nationalism) ते स्वातंत्र्य प्राप्तीशिवाय शक्य नव्हते आणि स्वातंत्र्य प्राप्ती जी झाली, ज्या परिस्थितींत झाली त्यानें उराशीं वाळगलेली जी भावना तिला मोठी तड गेली. वांटणी करून आम्हीं ऐक्य साधले व तेंहि ऐक्य अभावा-त्मकच ठरले. एकराज्याची चौकट निर्माण झाली व कांहीं ऐतिहासिक कारणामुळें त्या एकराज्यांतसुद्धां घटक राज्यें निर्माण झाली. मध्यवर्ती निष्ठा म्हणजे भारताची

अनुक्रमणिका






निष्ठा प्रसंगीं घटकराज्य निष्ठेला विसंगत वाटूं लागली. साऱ्या राष्ट्रांची एक भाषा करणें शक्य नव्हतें. सारी घटकराज्यें विद्यमान होती ती मोडून एक करणें शक्य नव्हतें. जें होते त्यांतून कांहीं कमीजास्त करून निर्माण करावयाचें होतें. हा इतिहासाचा अनिवार्य संदेश होता. किंबहुना १८५८ सालापासून साऱ्या भारतांत मध्यवर्ती राज्यें व अनेक घटक राज्यें निर्माण होणार हे वातावरण हळुंहळूं उदित होत होते. म्हणून आमची घटना ही संयुक्त (Federal) हे निश्चित. म्हणून आमच्या निष्ठेंतहि थोडा सांस्कृतिक भाव येणार हेंहि निश्चित होते. आणि त्या दृष्टीन भारतीय नेतृत्वानें संविधान तयार केले. शासकीय चौकट तयार केली. आदर्श संविधानांत लेखनिष्ठ केले. तथापि लोकशाही राज्य म्हणजे अगर लोकशाही समाज म्हणजे निव्वळ संस्था नव्हेत. निव्वळ संविधान नव्हे. त्यांच्यामागें असणारी वृत्ती ही संस्थांचे व संविधानाचे स्वरूप ठरवित असते. आणि ती वृत्ती राष्ट्रवादाची असावी हें मान्य होतें. तथापि जे घडले त्यांत व ज्या परिस्थितींत घडलें त्यांत राष्ट्रवादाची रचना संघटित रीतीनें झाली नाहीं. मुलकी कायदा सुद्धां एक असा सर्वांसाठीं नाहीं. राज्यकारभाराची भाषा सर्वांसाठीं एक नाहीं. आणि सविधानांतील मंत्रापेक्षां तंत्रावर जास्त लक्ष दिल्यानें राज्यकारभार चालला. पण ते आदर्श दुर्लक्षित झाले आणि परिणामतः साऱ्या देशामध्यें आचरण व्यवस्था जी जुन्या मूल्यांवर होती ती कोसळली. नैवीन मूल्यांवरील व्यवस्था अंमलांत येऊ शकली नाहीं. समाजाची रचना श्रेष्ठांच्या आचरणावर आधारलेली होती ती तशीच चालूं आहे, पण ते श्रेष्ठ आतां नष्ट व कनिष्ट झाले आहेत. व्यापक वृद्धि दुर्मिळ झाली आहे. त्याग आतां हद्दपार झाला आहे. ज्याला जे मिळेल, नाहीं/ मिळाले, जसें मिळेल तें त्यानें ओरबाडावें. अन्यांचा विचार करू नये हा व्यवहारामधील प्रमुख दंडक झाला आहे. प्रमुख नितीमूल्य झाले आहे. आणि लोकशाहीच्या निवडणूक तंत्रामुळें वैयक्तिक दोष सद्गुण ठरूं पहात आहेत. आणि असा जगाचा अनुभव आहे कीं, लोकशाहीच्या पहिल्या प्रहरांत जे प्रामुख्यानें दिसून येते ते लोकशाहीचे दोषच. तथापि प्रस्तुत लेखकाच्या मतें ही परिस्थिति संक्रमण अवस्थेंतील आहे. आणि संपत्तीमुळें विषमता उत्पन्न होते आणि संपत्तीची प्राप्ती करतांना न्याय नीति विसरली जाते. यावर खरा बंदोबस्त म्हणजे समाजांतील संपत्ती व्यक्तीची राहतां कामा नये. हे संपत्तीचें स्वामित्व समाजाकडे असले पाहिजे. आणि तिचा उपयोग समाजांतील सर्वांना सामाजिक न्यायाच्या दृष्टीनें विवेकानें करण्याचा वाव सर्वांना मिळाला पाहिजे. आणि मी असा विचार करीत असतांनाच पुन्हां विमानाची वेळ झाली अशी घोषणा झाली आणि दरम्यानचें हे चित्र तसेंच मनामध्यें रेंगाळत राहिले. भविष्याकडे लक्ष गेले, आणि आजहि भविष्याकडेच लक्ष आहे. मात्र ते भविष्य निर्दयपणें, निष्ठुरपणें निश्चितपणें जे आंखले आहे ते अमलांत आणलें पाहिजे.

●●●

सकाळीं तिनें पुढाकार घेतला होता आणि मी नकार दिला होता. आतां मी पुढाकार घेत होतो आणि ती मला खेळवीत होती. प्रेयसीनं प्रियकराबरोवर वागावें तसें हें चाललें होतें. ह्या खोटेपणांतही मजा होती.

# ॲव्हेन्यूज ॲण्ड स्ट्रीटस्

— अच्युत बर्वे

खिडकीशीं उभा राहून मी मस्तपणें चिरुट चावीत होतो. मधूनच खाली पसरलेल्या लांवलचक रस्त्याकडे आणि त्यावर चाललेल्या धांवपळीकडे पहात होतो. गेल्या तीन आठवडयांत ह्या रस्त्यावरून मी अनेकवेळां आलो गेलो होतो. पण आता हेन्री हड्सन हॉटेलमघल्या सतराव्या मजल्यावरच्या माझ्या ह्या खोलीतून तोच रस्ता मला अपरिचित वाटत होता. रस्त्यापलीकडे सुपरमार्केट आहे हेहि आजच मला कळत होते. हे सगळेच मला नवीन वाटत होते. कारण इतक्या शांतपणे आजुबाजूला पहायला मी खोलींत कधींच टिकलो नव्हतो. सकाळीं मॅडीसन किंवा लेक्झींटन जाऊन ॲव्हेन्यूवर थडके तो संध्याकाळीं हॉटेलकडे परतत असे. पुन्हां लगेच मॅनहटन पहायला वाहेर पडत असे. गेले तीन आठवडे हे असे चालले होते. क्षणाची उसंत न घेतां न्यूयॉर्कमधल्या ह्या गतींत मी मिसळून गेलो होतो. वीकएंडसुद्धां मी राववीत होतो. वर्ल्ड फेअरकडे मोर्चा वळवीत होतो. चालून चालून पाय थकले आणि पाहून पाहून डोळे शिणले कीं, झुकांडया खात मी हॉटेलच्या एलेव्हेटरमध्यें शिरत होतो. काल रात्रीं खोलीवर आलो तेव्हां दोन वाजून गेले होते. पायाचे तुकडे पडले होते. डोळे मिटत होते. अंगावरचे कपडे आणि पायांतले वूट काढून टाकायचे सुद्धां त्राण राहिले नव्हते. त्याचवेळीं माझ्या लक्षांत आले कीं, अशी मस्ती फार दिवस चालणार नाहीं. शरीराला विश्रांतीची आवश्यकता आहे. तव्हांच मी ठरवून टाकले कीं, आतां उद्यां आराम करायचा. आपण कांहीं कुणाचे देणें लागत नाहीं. आपल्या मानेवर कांहीं कुणी खडा ठेवलेला नाहीं. चार गोष्टी कमी पहायला मिळाल्या तरी कांहीं हरकत नाहीं. त्यामुळें आज दहा वाजून गेले तरी मी खोलींत होतो. आळसावून खिडकीशीं उभा होतो. ब्रेकफास्टला चाट दिली होती. भूक कडकडली कीं, पोषाख करून खालीं उतरायचे असा विचार करीत होतो. एवढयांत लॅच की फिरवून कुणीतरी खोलीचा दरवाजा उघडीत आहे असें वाटलें. खिडकीपासून वाजूला होत मी पुढें झालो तेवढयांत दरवाजा किलकिला उघडला गेला आणि पुन्हां तावडतोव वंद झाला. खुर्चीवर टाकलेला गाऊन मी भराभर अंगावर चढवला आणि पुढें होऊन दरवाजा उघडला. कपडयांनीं भरलेली ट्रॉली माझ्या खोलीवरून पुढें जात होती. दरवाजांत मी दिसलो तेव्हां ट्रॉली थांवली आणि पाठोपाठ "Good Morning Sir" कानावर आले.

"Good Morning"

"I am Sorry."

"कशाकरतां ?"

"ह्या वेळीं रोज तुम्ही खोलीत नसता. आजही नसाल असं वाटलं."



"कांहीं हरकत नाही" असं म्हणत मी विचारलं, "खोली साफ करायची आहे काय ?"

"होय, पण मी जरावेळानें येईन. तुम्ही वाहेर गेल्यावर—"

"मग तुला दिवसभर थांवून रहावं लागेल."

"कां ?"

"कारण आज मी वाहेर जाणार नाहीं"

माझ्या वोलण्यावर ती क्षणभर घुटमळली. पण धीर करून म्हणाली,

"तुमची हरकत नसेल तर—"

"माझी मुळींच हरकत नाहीं"

"Thank you." ट्रॉलीवरून ती भराभर वाथ् टॉवेल, हॅंड टॉवेल्स, वेडशीटस् काढू लागली. मी आंत वळलो आणि खिडकीशेजारच्या खुर्चीवर येऊन वसलो तोंच ती आंत आली. तिच्याकडे लक्ष न देतां मी पेपर वाचूं लागलो आणि खोलीतले माझे अस्तित्व विसरून ती आपल्या कामाला लागली. टववाथ्मध्यें पाणी सोडल्याचे, कसली तरी उघडझांप केल्याचें असें तऱ्हेतऱ्हेचे आवाज कानावर येऊं लागले. ह्या आवाजांत तिच्या शीळेचा आवाज मिसळूं लागला तेव्हां मला आश्चर्य वाटलें. शीळ घालणारी वाई आजच माझ्या आढळांत येत होती. ह्या








कर्णमधुर शीळेचे शब्द पकडायचा मी प्रयत्न करीत होतो. कांहीं जमत नव्हते पण तिच्या आवाजाप्रमाणेंच तिची शीळ स्वच्छ आणि मोकळी होती. ऐकतां ऐकतां शीळ थांबली, खोलींतून येणारे इतर आवाजही थांबले आणि पाठोपाठ मी बसलो होतो त्या खोलींत ती आली. मला थोडे अवघडल्यासारखे वाटले. पण मी तसें दाखवलें नाहीं. उलट तिलाच विचारलें, "माझा अडथळा होतो काय ?" केवळ औपचारिकपणें हा प्रश्न विचारलेला होता. तिलाही ते ठाऊक असावे. कारण प्रश्नाचे उत्तर न देतां हंसल्यासारखे करून ती कामाला लागली. ठिकठिकाणी सांपडलेली माझ्या चिरूटाची राख ती साफ करूं लागली तेव्हां मला ओशाळल्यासारखे झाले. नकळत मी हातांतला चिरूट ॲश ट्रे मध्यें ठेवून दिला. पहातां पहातां टेबल साफ झाले. टेबलाशेजारीं पडलेले बीअरचे कॅन्स तिनें जमा केले. सगळ वेस्ट पेपर बास्केटमध्यें टाकले आणि आपला मोर्चा बेडकडे वळवला. बेडशीट तिनें वाजला केला, पिलोकेसीस काढून उशा मोकळ्या केल्या, ब्लॅंकेटवरचे कव्हर काढून घेतले आणि सगळें एकत्र करून ते बाहेर नेऊन ठेवले. परत येतांना तिच्या पाठोपाठ दरवाजा लागल्याचा आवाज आला आणि ती दचकली. वाजवीपेक्षां जास्त कुतुहलानें मी तिच्या हालचालींकडे पहात आहे हें माझ्या लक्षांत आले. पण तो मोह मला आवरतां येत नव्हता. कुणाची नजर बांधून ठेवील अशी तिची फिगर नव्हती कीं लंपटपणा करण्याचे कुणाच्या मनांत येईल अशी तिच्यांत किक्ही नव्हती. तरीपण मी तिच्याकडे पुन्हां पुन्हां पहात होतो. तिची हालचाल मोहक होती. तिच्यापाशीं नसले तरी तिच्या हालचालींत सौंदर्य होते. क्षणांत ती लवत होती, क्षणांत उभी रहात होती. क्षणांत ती पाठमोरी दिसत होती, क्षणांत सन्मुख होत होती. बेड पुढें ओढून त्यावर ती बेडशीट पसरूं लागली तेव्हां अगदीं अचानकपणें तिची माझी नजरानजर झाली. हाताची बोटें एकमेकांत गुंफली जावी तशी नजरेंत नजर मिसळली गेली. दुसऱ्याच क्षणीं मी सावध झालो आणि खिडकीवाटे बाहेर पाहूं लागलो. थोडावेळ कुणींच कांहीं बोलले नाहीं. एकमेकांकडे आम्हीं पाहिलेही नाहीं. ही शांतता आम्हां दोघांनाही असह्य होत होती. माझ्यापेक्षां तिला जास्त होत असावी. कारण माझें लक्ष वेधून घ्यावें म्हणून ती म्हणाली,

"Excuse me Sir..."

"Yes"

"तुम्हीं इंडियांतून आला काय ?"

"होय."

"इंडिया इथून किती दूर आहे ?








"खूप दूर आहे."

"तुम्हीं किती दिवसापूर्वी आलां ?"

"झाला महिनाभर."

ती प्रश्न विचारीत होती आणि मी उत्तरें देत होतो. एकीकडे तिचे काम चालूं होते. ती आतां काय विचारते त्याची मी वाट पहात होतो तोंच तिनें विचारले, "एकटेच आलांत ?"

"हो–"

"Are you married?"

"तुला काय वाटतं ?" माझा प्रश्न ऐकून ती लाजली. हातांतले काम थांबवीत ती उघड उघड माझ्याकडे पाहूं लागली. तिचेही बरोबर होते. माझ्याकडे नीट निरखून पाहिल्याशिवाय माझ्या प्रश्नाचें उत्तर कसें देतां येणार ! पण ती अशा तऱ्हेनें पहात होती कीं, जणुं कांहीं माझे लग्न झालेले असले तर त्याच्या खुणा माझ्या देहावर तिला दिसणार होत्या. हंसल्यासारखे करीत ती म्हणाली, "तुम्हीं दिसायला फार उमदे आहांत."

"हें माझ्या प्रश्नाचं उत्तर नव्हे".

"खरं आहे" स्वतःला सांवरून घेत घाईघाईत ती म्हणाली, "माझ्या बोलण्याचा अर्थ असा कीं, तुमच्या प्रश्नाचं उत्तर देणं कठीण आहे."

"Oh, I see!" हंसल्यासारखं करीत मी म्हटलं, "पण अंदाज करायला तर हरकत नाहीं."

"मग मला वाटतं तुमचं लग्न झालेलं नसावं."

मला खूष करण्याचा हा एक प्रयत्न असावा. बाई हा प्रकार मला नवीन नाहीं हें माझ्या नजरेवरून कुणालाही समजण्यासारखं होतं. मग हे वेड ती कशाकरतां पांघरीत होती ? कदाचित् तिला वाटलं तेच ती बोलली असेल. आणि मी त्याचा निराळा अर्थ लावीत असेन. कारण मला खूष करून माझ्याकडून थोडेच तिला कांहीं मिळवायचे होते ! माझं लग्न झालेलं आहे आणि मला दोन मुलं आहेत हें मी तिला सांगितलं तेव्हां तिनें विचारलं, "मग एकटेच कां आलेत ?" तिचा प्रश्न संयुक्तिक होता. पण मला अडचणींत टाकणारा होता. देश सोडतांना मलाच कोण यातायात करावी लागली होती हे तिला सांगून समजण्यासारखें नव्हते. प्रश्नानें प्रश्न उडवून लावावा म्हणून मी विचारलं,"What about you? Are you married?"

"I should say, yes or no."

"I didn't get you."

ती हंसली आणि म्हणाली, "लग्न झालेलं आहे पण मी नवऱ्यापाशीं रहात नाहीं."

"I am sorry. प्रश्न विचारून तुला दुखावण्याचा माझा हेतु नव्हता."

"तुम्हीं फार समजुतदार आहांत."

"Thank you."

थोड्या वेळापूर्वी मी उमदा असल्याचे तिनें सांगितले होते. आतां मी समजुतदार असल्याचे ती सांगत होती. हे असेंच चालूं राहिले तर माझे अनेक गुण मला समजण्याची शक्यता होती. मला बरें वाटत होते आणि हे चांगले चाललेले नाहीं हेंहि मला कळत होते. पण आतां माझ्या हातांत कांहीं राहिले नव्हते. तिचे कामहि संपत नव्हते. अजून माझा वेड पुरा झाला नव्हता. वेडवरच्या सुरकुत्या ती आतां साफ करीत होती. थोडावेळ कुणींच कांहीं बोलले नाहीं. ती आपले काम करीत राहिली. मी चिरूट शिलगावीत खुर्चीवर बसून राहिलो. मग एकदम ती म्हणाली, "रागावणार नसलात तर एक विचारते—"

बायका असा प्रस्ताव करतात तेव्हां त्यांना कांहींतरी भयंकर विचारायचे असते हे मला ठाऊक होते. पण अशावेळीं त्यांना तोडून टाकतां येत नाहीं. त्यामुळें मी म्हटलें, "विचार ना–"

"तुम्हांला एकटं रहायचा कंटाळा येत नाहीं?"

फार वेळ मागावर राहून एखाद्याला खिंडीत गाठणारा हा प्रश्न होता. वरकरणी साधेपणानें विचारलेला, पण अंतर्यामीं हेतु बाळगून केलेला ! अशा प्रश्नांची उत्तरें देणें कठीण असते. खरे सांगितले तर प्रश्न विचारणारी व्यक्ति दुखावली जाण्याचा संभव असतो. मला तिला दुखवायचे नव्हते आणि गुरफटायचेही नव्हते. त्यामुळें सावधपणें मी म्हटले,

"तुझा देश इतका चांगला आहे कीं, इथं कुणालाच कंटाळा येणार नाहीं"

"Thank you" पण हा औपचारिकपणा होता. माझ्या बोलण्यांत मी तिच्या देशाची स्तुति केली होती पण त्यामुळें ती खुलली नाहीं. माझ्या बोलण्यानें तिचा अपेक्षाभंग झाल्यासारखे दिसले पण ती हार खाणारी नव्हती. तावडतोब ती म्हणाली, "I don't think I made myself clear to you. मला असं विचारायचं होतं कीं, तुम्हांला एकट्याला... एकट्याला म्हणजे..." अडखळत तिनें एकदम

विचारले, "म्हणजे "Company शिवाय तुम्हांला कसं चैन पडतं ?"

प्रश्न स्पष्ट करण्याचा तिनें आव आणला होता. पण ते तिला जमले नव्हते. गोंधळ उडाला कीं, असेंच होते. विशेषत: आपल्या हेतूविषयीं आपण उघडे होत आहों आणि दुसरा त्याला कांहींच साद देत नाहीं हें लक्षांत आले कीं, असें फार होते. हंसल्यासारखे करीत मी म्हटले,

"Company नसायला काय झालं? माझे मित्र आहेत. ओळखीचे लोक आहेत."

सुरुंगाला वत्ती लागावी पण स्फोट होऊन धडाका उडूं नये तसें हे चालले होते. पण ती आतां अशा विचित्र मार्गावर आली होती कीं, तिला मागें वळतां येत नव्हते. मागें वळायला ती राजी नव्हती आणि पुढें जायला माझी खुषी नव्हती. सोक्ष-मोक्ष लावण्याच्या इरादानें तिनें विचारले, "Have you a girl Friend ?"

तिनें वापरलेला शब्द मोहक होता. पण मोठा फसवा होता. विवाहित पुरुषाला तशा अर्थानें मैत्रिण असूं शकत नाहीं ह्या संस्कृतींत मी वाढलेला होतो. खरें सांगून टाकावे म्हणून मी म्हटले, "माझी इथें कुणीच मैत्रिण नाहीं"

आश्चर्य वाटल्यासारखे दाखवीत तिनें विचारले, "असावी असं वाटत नाहीं ?"

"वाटतं."

"मग?"

कांहीं प्रश्न असें असतात कीं, त्यांचे उत्तर न देणें हें चांगले असते. तिचा प्रश्न त्यापैकींच होता. संगतीला कुणी असावे असें मला जरुर वाटत होते. पण क्षणाची सोबत करणारी मैत्रिण मला नको होती. माझ्या कोष्टकांत ते बसणारें नव्हते. वृत्तीला मानवणारे नव्हते. माझ्या गप्प राहण्याचा निराळा अर्थ लावीत तिनें विचारले, ""How come a strong man like you can stay alone?" आणि धिटाईनें ती माझ्याकडे पाहूं लागली. तिचा प्रश्न ऐकून मी गोंधळलो. काय बोलावे मला सुचेना. तिच्या ते लक्षांत आले असावे. माझ्या नजरेत नजर मिसळायचा प्रयत्न करीत तिनें बेडवर हात फिरवल्यासारखे केले आणि म्हटले, "Your bed is ready."

"Thank you."

माझ्याकडून कांहीच हालचाल होत नाहीं हे तिच्या लक्षांत आले तेंव्हां बेडपासून ती बाजूला झाली. माझ्या नादीं लागण्यांत अर्थ नाहीं हें तिच्या ध्यानांत आले असावे. उरलेले काम ती झपाझप आवरूं लागली. ती केव्हां निघून जाते त्याची मी वाट पहात होतो. ती लौकर जाईल तर बरे असें वाटूं लागले, तोंच अगदीं अनपेक्षितपणें ती माझ्या शेजारी येऊन उभी राहिली. ती आता माझी निर्भत्सना करणार ह्याविषयीं कांहीं शंका नव्हती. मी तिच्याकडे पाहूं लागलो तेव्हां ती म्हणाली, "Well, It's all set ..."

"Thank you."

"तुम्हाला आणखी कांहीं लागेल काय?" आणि माझ्यासारख्या अनभिज्ञ माणसाला हे सूचक बोलणें कळणार नाहीं असें वाटून कीं काय खांदे उडवल्यासारखे करीत ती म्हणाली, "Anything that you want..."

स्त्रीचे हे अगदीं नवें रूप मी आज पहात होतो. मनांत भरलेल्या पुरुषा-साठीं स्त्रिया जीव टाकतात हें मला ठाऊक होते. पण तरीही स्त्रिया कधीं मर्यादा सोडीत नाहींत. स्वतः प्रस्ताव करीत नाहींत, फार चतुराईनें वागतात. सूचक बोलतात आणि बोलतां बोलतां पुरुषाला अशा तऱ्हेनें गुरफटवतात कीं, वस्तुतः जे स्वतःला हवे असते ते त्याला मागायला भाग पाडतात. पण स्त्रियांविषयीच्या माझ्या ह्या कल्पनेला आज धक्का बसत होता. खांदे उडवून ती म्हणत होती, 'Anything that you want.'

"No, thank you.'

स्पष्ट शब्दांत मी तिला नकार दिला होता. पण त्याचे तिला कांहीं वाटले नाहीं. तिच्या चेहऱ्यावरची रेषाही हलली नाहीं. हॉटेलांत शेंकडो खोल्या होत्या आणि रोज शेंकडो टूरीस्ट जात येत होते. कदाचित् त्यामुळें माझ्या नकाराची तिला खंत वाटली नसावी. तोंडानें शीळ घालीत आणि शरीराला चमत्कारिक झोंके देत ती निघून गेली.

इतका वेळ दरवाजासमोर उभी असलेली ट्रॉली चालू झाल्याचा आवाज आला आणि मला सुटल्यासारखे वाटले. स्वतःशीच हंसत मी चिरूट जवळ केला. तिच्या निघून जाण्यावरोबर तिच्या विषयीचे विचार नाहींसे व्हायला हवे होते. पण तसें झालें नाहीं. चिरूट विझला तरी तंबाकूचा कडवट दर्प येत रहावा तसें ती निघून गेली तरी तिच्या विषयीचे विचार मनांत येत राहिले. मी चिरूट शिलगावला आणि धुराचे भपकाऱ्यावर भपकारे सोडून विझलेल्या चिरूटाचा कडवट दर्प मारून टाकला. खिडकीशीं येऊन उभा राहिलो आणि आतां दिवसभर काय काय करावयाचे त्याचा विचार करूं लागलो.

दिवसभर वणवण करून संध्याकाळीं मी हॉटेलवर आलो तेव्हां पुरता थकून गेलो होतो. रोज कामाच्या श्रमानं दमत होतो, आज मजेसाठीं केलेल्या भ्रमंतीनें थकलो होतो. मॅनहटनमध्यें जे जे पाहण्यासारखे राहिले होते ते ते ह्या वीकएंडला पाहून घ्यायचे अशा इरादानें मी फिरलो होतो. लिंकन सेंटर, रेडियो सिटी म्युझिक हॉल, एम्पायर स्टेट बिल्डिंग इत्यादि

[पृष्ठ १८० वर पहा]



## प्रश्न :

तुझ्या देवडीशी
अखेरी जेथवा
बांधोन माझे हे
थकलेले घोडे–

तेव्हा ओटयावर
(आत जाण्यापूर्वी)
करू मूलभूत
विवेचन थोडे

अंधाराचे डाग
लाख माझ्या अंगा
नसे मला त्याची
खंत अजिबात

(दिवस आकाशी
जाती ओघळून
देहावर पण
गोठतसे रात.)

प्रश्न सुकृताचा
नाही वा पापाचा
वटारून डोळे
बोल हवे तसे–

मूळ प्रश्न माझा
योजनेवाचून
गोंधळ हे भव्य
केलेस तू कसे?

—कुसुमाग्रज



**तो गांवात आला असं कळलं आणि ती अस्वस्थ झाली. ज्याचं तोंड ती कधींही पाहणार नव्हती तो भेटावा म्हणून तिचं मन आतुरलं. त्याचा फोन आल्यावर तर तें नाचूं लागलं....**

ला ल विटांनीं बांधलेल्या पक्क्या पाऊलवाटेवर गवताचे कोंब

★★

उगवले होते.

अलगद पावलांनीं मागें वळून पहात मुक्ता घरीं परतली. अंधार पडेपर्यंत वाट फुटेल तिकडे भटकली व कुठेंतरी जायचं म्हणून घरी आली. पाय थकून गेले होते तरी थांबायची इच्छा नव्हती. आणि घराचं दार दिसतांच सारं परकं भासू लागलं होतं.

घंटा वाजायच्या आधींच वहिनीनें दार उघडलं व काळजीनें म्हटलं,

"कुठें गेलां होतां वन्स ? कधीं गेलांत तेंहि कळलं नाहीं–"

चपला न काढतां ती व्हरांड्यातल्या वेताच्या खुर्चीवर विसावली. डोळे मिटून म्हणाली,

"बाब्बा कुठाय्–?"

"हे त्याला घेऊन पार्कवर गेले आहेत. कंटाळला अगदीं तो— सांसूबाईहि कथीच्या कीर्तनाला गेल्या आहेत.–"

स्वैंपाकघरांत लगबगीनें परतणाऱ्या वहिनीकडे ती डोळे किल-किले करून पाहूं लागली. वहिनी आपल्या संसारांत गढून गेली होती. आणि ती मात्र उपऱ्यासारखी दाराशी बसून राहिली. वहिनीचा हेवा करावा असं तिला वाटलं. तिच्याच वयाची वहिनी. तिच्या मागोमाग माधवचं लग्न झालं व वहिनी घरांत आली. ह्या आठ वर्षांत मूल नसून व माधव तापट असूनहि वहिनी सुखीसमाधानी झाली. आपल्याला असं जमलं नाहीं. आपला तर प्रेमविवाह ! घरचा विरोध मोडून आपण विवाह केला. अनेक अडचणी ओलांडून संसार थाटला. आमली कूसहि निवली. पण तरी अखेर सगळं घर मोडून टाकायचे धिंडवडे भोगावे लागले.

डोळे मोठे करून ती घरभर पाहूं लागली. हें घर आपलं नाहीं असं एकदम तीव्रतेनें वाटलं. तसं तिला स्वप्नांतहि वाटूं नये म्हणून सगळे तिला जपत. आईसारखी सावली धरे. वहिनी वंह-नको बघे. माधव पुस्तकं आणून देई, तिच्यावरोबर बुद्धिबळं










अनुक्रमणिका

खेळे. कॉलेजच्या मित्रांना सोडून मन्या तिच्याबरोबर सिनेमाला जाई. अन् तिच्या मुलाला तर सारे फुलासारखं झेलीत. भावाइतकाच तिचाहि घरावर हक्क. वहिनीइतका तिलाहि अधिकार. जणूं ही आठ वर्षं आयुष्यांत आलीच नाहींत. तिचं कधीं लग्न झालंच नाहीं. नरेशनें तिच्या जीवनांत, या घराण्यांत प्रवेश केलाच नाहीं...

तिला एकदम विचित्र झालं. त्याच्या नुसत्या आठवणीनें तिचं काळीज कडूशार होई. रोमारोमांत तिटकारा दाटे. त्या तिरीमिरींतच तिनें फारकत घेतली होती. कोर्टानें निकाल दिल्यावर नाक उडवीत तो गेला तें त्याचं शेवटचं दर्शन. आतां कधीं तो सत्ता गाजवूं शकणार नाहीं. आयुष्यांत डोकावूं शकणार नाहीं. वर्षभरांत तो कधीं दिसलाहि नाहीं. ती सुटली. स्वतःचं जीवन आखायला स्वतंत्र झाली. आईचा व भावंडांचा आधार असल्यावर तिला कशाचं भय ?

पण तिला स्वतःचंच भय वाटूं लागलं. परवां कुणीतरी म्हटलं कीं, तो गांवांत आला आहे. कांहीं न ऐकल्यासारखं तिनें केलं, पण तो इकडे कां आला आहे कळेना. त्याच्याबद्दलची चीडहि उसळून येईना. त्याच्याबद्दल द्वेष करायचं आतां कारण नव्हतं. पण निदान तिटकारा वाटावा, तसंच होईना. नकळत ती त्याचा विचार करूं लागली. अन् आपण त्याच्याबद्दल विचार करतो, त्याची आठवण काढतो, या जाणीवेनें ती भयभीत झाली.

एकदम तिला वाटलं कीं, तो गांवांत असला तर आपल्याला दिसेल. भेटेल. मग सारा वेळ ती खिडकींत डोकावूं लागली. घरापुढच्या बंगल्यापुढें हिंडूं लागली. फोनपाशीं घुटमळूं लागली. आपल्या वागण्याचं तिला वाईट वाटत होतं. पुन्हां पुन्हां ती स्वतःला आवरत होती. त्याच्याबद्दलचा अंगार फुलवीत होती. अन् परत सारं विसरून वेड्यासारखी त्याचीच आकृति शोधीत होती. ती प्रेमांत प्रथम पडली ती अशीच त्याला बोल लावीत. त्याला टाळीत...अधीरता असह्य झाली, तेव्हां ती उठली व गांवभर भटकत राहिली...लग्नापूर्वी ती थिएटरपाशी, रणस्तंभाजवळ, रेल्वेसाईडिंगमागे, कॉफी हॉसमध्यें त्याला चोरून भेटे. तीं सगळी संकेतस्थळं तिनें धुंडाळली. अन् अखेर थकून, रित्या मनानें परतली.

तिनें पुन्हां डोळे मिटले. व गळ्यावर हात ठेवले. आपण नरेशला शोधत हिंडलो ह्या कल्पनेनें ती कावरीबावरी झाली. आपण हें काय केलं—हें काय चालवलं आहे ? इतके धिडवडे निघाले, जाहीरपणें नातं तोडलं तरी त्या पुरुषाची आपण परत आठवण काढली..ओढ घेतली...

तिला वाटलं उठावं नि स्नान करावं. अंगदीं त्याच्या नांवानें आंघोळ करावी. आयुष्यांत उत्पात करणाऱ्या नवऱ्याच्या नांवानें. पण तिला बळ येईना. हातपाय कांपूं लागले. दातखीळ वाजूं लागली. बेभानपणें ती खुर्चींत कोसळली.

कीर्तनाहून परतलेली आई घाबरून तिच्याकडे धावली. 'काय झालं ग ?—काय झालं एकदम ?—असं काय करतेस—? सावध हो—इकडे बघ—" आई तिला कुशीत घेत म्हणाली. तिला वारा घालं लागली. डोक्यावर पाणी थपूं लागली.

हिस्टेरिया ! भानावर येत असतांना तिला तो शब्द आठवला. पण हा हिस्टेरिया कसा असेल ? सहा वर्षं संसारसुख भोगल्यावर ? एक मूल झाल्यावर ?

"काय होतंय ग ? म्यायलीस तूं ?"

"नाहीं ग—भीति कुणाची ?—"

"मग असं काय झालं एकदम? सारं सांग पाहूं—"

ती न बोलतां उठली व आईचा हात दूर करून आपल्याच नादांत आंत गेली. आपल्या मनांत जें उगवलं आहे तें आईला, कुणालाच उमगतां कामा नये. आई दचकेल. विरोध करेल. प्रेम करूं लागलों तेव्हां नव्हतं कां आईनें कोंडून ठेवलं?

ती आंतल्या खोलींत गेली व उशी कवटाळून पलंगावर उघड्या डोळ्यांनीं पडून राहिली.

★★

बाबाला पोटाशी घेऊन ती पलंगावर पडली होती. त्याला थोपटायचं विसरून खिडकींतून बाहेर पहात होती. टिपूर चांदणं पडलं होतं. शेजारच्या माधवच्या खोलींतून वहिनीचं हंसणं ऐकूं येत होतं. मन्याचा ट्रॅन्झिस्टर सुरूच होता. सगळ्यांच्या आयुष्यावर सुखाची साय आली होती. तीच एकटी आंतल्या




# —अरविंद गोखले

आंत ढवळून निघत होती.

"आई—झोप येत नाहीं तुला ?" डोळे मिटून शांत पडलेला बाबा एकदम मान वर करून म्हणाला.

ती दचकली. त्याच्याकडे टक लावून पाहूं लागली. किती गंभीर दिसत होता तो. किती प्रौढ, नरेशसारखा ! नरेशच्या रुपानें बाबा आपल्या पुढ्यांत आहे या कल्पनेनें ती चमकली. त्याला पोटाशीं ओढीत म्हणाली,

"तुलाच झोप येत नाहीं. मला वाटलं निजलास तू. झोप पाहूं लवकर....गाणं म्हणूं कां ?..."

"म्हण. किती दिवसांत गाणं म्हणून निजवलं नाहींस मला तूं—"

बाबाचा आवाज कापरा आला. तिला वाटलं, तो असंतुष्ट आहे. असमाधानी आहे. कदाचित् आपल्याप्रमाणें—तिनें त्याच्या कपाळावरचे केस मागें सारीत विचारलें,

"तुला पप्पांची आठवण येते का रे ?"

बाबानें एकदम उत्तर दिलं नाहीं. पप्पांचं नांव निघालं कीं, आईच्या कपाळाला आठ्या पडतात हें त्याला माहीत होतं. आजोळीं आल्यावर एकदां अपरात्री तो जागा झाला व पप्पांना







हाका मारीत रडत सुटला तेव्हां तिनें त्याला चपराक मारली होती व अंधारांत उभं केलं होतं. तें आठवून तो म्हणाला,

"मुळींच नाहीं. पप्पा वाईट आहेत. ते तुझ्याशी भांडले. घरातनं हाकललं—मलाहि म्हणाले चालता हो. पुन्हां कधीं तोंड पहाणार नाहीं त्यांचं—राक्षस आहेत पप्पा—"

तिनें तोंड वळवलं. वाटलं, त्याचा तोंडावर हात ठेवावा व म्हणावं, 'नको रे—असं बोलूं नकोस.' पण तिनें तोंड उघडलं नाहीं. सगळे म्हणतात, ती स्वतःच म्हणते तेंच बाबा बोलत होता. आगीची धगधग त्यालाहि लागली होती. आईबापांच्या भांडणांचा मुलाच्या कोवळचा मनावर केवढा विपरित परिणाम होत असेल—बाबासाठीं, निदान आपल्या बाबासाठीं असं नका हो वागूं—तिनें नरेशला एकदां विनवलं होतं—त्यानें हात उगारला तेव्हां तिनें बाबाला पुढें केला होता—तो 'आई—आई' म्हणून रडत होता तरी ती तावातावानें नवऱ्याशी वाद घालीत होती...

तिचा गळा नि डोळे भरून आले. सगळी व्यथा विसरण्याइतकी ती कांपऱ्या स्वरांत हलकेंच म्हणूं लागली—

अश्रूंचा विटाळ, नको नयनाला.
नको मनाला, हुरहूर—
हुरहुरीमुळें, नयनाला पूर
पुरांतच दूर, प्रभू जाई
दे दे तुझे बळ, दासी ही निर्बळ
तुझ्या हाती कळ, सारी माझी—

वळून तिनें पाहिलं तो बाबा गाढ झोपला होता. चंद्रप्रकाशांत त्याचा इवलासा चेहरा दृष्ट लावण्यासारखा दिसत होता.



ओढग्रस्त अन् तरीही आकर्षक. विचारा सारा वेळ माधवमामा, मन्यामामा करीत असतो. त्याला बापाची उणीव भासत असेल. त्याच्या वयाच्या मुलांनी वडिलांची संगत हवी असते. आईच्या पदरापासुन तुटत बापाचं बोट धरून चालण्याचं त्याचं हे वय! अन् ह्याच वेळेला वडील असून नसल्यासारखे झाले. कोर्टात ठरल्याप्रमाणें नरेशला मुलाला भेटायचा हक्क होता. पण साऱ्या वर्षात एकदा त्यानें चौकशी केली नाहीं कीं, भेट घ्यायचा प्रयत्न केला नाहीं.

मुलापासून हलकेंच दूर होत तिनें कुशी पालटली. बाबाला भेटण्याच्या निमित्तानें नरेश येईल अशी पूर्वी धास्ती वाटे. तो आला तर माधवबरोबर बाबाला घटकाभर धाडायचं तिनें योजून ठेवलं होतं. पण त्याचा चुकून निरोप, फोन, पत्र—कांहीं आलं नाहीं. आतां तिला वाटलं, नरेश एवढा कसा निष्ठूर झाला? बाबाला त्याचा लळा होता. बाबाला गोवर आला होता तेव्हां सारी रात्र नरेश जागत होता. एकदां...कितीतरी आठवणी एका-मागून एक येऊं लागल्या. निदान बाबासाठीं तरी—अन् मुलाची ज्याला ओढ नाहीं तो बायकोची, घटस्फोटित पत्नीची आठवण कशाला ठेवील?

कासावीस होऊन ती अंथरुणावरून उठली. दिवाणखान्यांत जाऊन फोनजवळ घुटमळली. व्हरांड्यांत जाऊन अंधारांत अदृश्य होणारा रस्ता पाहूं लागली. गहिरा स्नेह जमूनहि प्रेम-याचना करीना, तेव्हां ती अशी बेचैन होऊन बसे. कधीं तो भेटेल, कधीं त्याचं पत्र, फोन येईल, कशा रितीनें तो लग्नाचं वचन मागेल?...आज तशीच ती व्याकूळ झाली होती. तशीच...? त्या वेळेला ती अल्लड होती. कुमारी होती. नवी स्वप्नं पाहात होती. पुरुषाचा स्पर्श शोधत होती. सहजीवन जगायला आतुर होती. आतां त्यांतलं कांहीं उरलं नव्हतं. सगळं कुस्करलं गेलं होतं. स्वप्नांचा चक्काचूर झाला होता. संसार मोडून पडला होता. पुरुष स्पर्शाची शिसारी आली होती—एवढं सारं महाभारत घडलं आणि आता अकस्मात ती वाट पहात होती त्याच पुरुषाची! तशाच थरथरत्या काळजानें. तितक्याच अनिवार ओढीनें.

"कां ग उभी अशी अंधारांत—?" आई मागून येत म्हणाली व व्हरांड्यांत दिवा लावूं लागली.

आईचा आवाज व ट्यूबचा उजेड तिला भोवळ आणूं लागला. स्वतःला तिनें सावरलं व हसत म्हटलं,

"कांहीं नाहीं, झोप येईना म्हणून सहज आले—"

"कां नाहीं झोप येत? काल रात्रींहि तूं जागी होतीस बराच वेळ. आताशा बोलतहि नाहींस—कांहीं होतंय कां?—मला सांगायचं नाहीं असं तर नाहीं—?"

तिनें जोरानें मान हलवली. वाटलं, आईच्या खांद्यावर मान टाकावी. आईच्या आधारानेंच ती सगळें दुःख दैन्य सहन करूं शकली होती. एकदम भावनाविवश होऊन ती म्हणाली,

"कांहीं विशेष नाहीं ग ऽ—नरेश आलाय असं कळालं म्हणून अस्वस्थ वाटतंय—"

"आईनें तिचा हात धरून आंत घरांत नेलं. निजलेल्या बाबा-

अनुक्रमणिका

जवळ तिला बसवीत व तिच्या खांद्यावर थोपटीत आई म्हणाली, "त्यांत एवढं म्यायचं काय कारण ? तो कांही करूं शकणार नाहीं आतां. अगदी बाबाला बघायलो आला तरी त्याला कसं वाटेला लावायचं ते माधवनं ठरवलं आहे—तो प्रत्यक्ष समोर दिसला तरी डगमगूं नको—"

"तसं नव्हे ग, आई—"

"मला माहित आहे तूं धीराची आहेस. त्याचा द्वेष करत आहेस-- त्याने तुझी नाहीं नाहीं ती विटंबना केली—पण सारं विसर आतां—नव्या मनानं नवं आयुष्य घालवायचं ठरलंय ना— उद्यां तूं --"

तिला आईचं बोलणं ऐकूं आलं नाहीं. त्यानें केलेल्या विटंबनेच्या विशुद्ध क्लेशांत ती लपेटून गेली. त्याचं तंबाखू खाणं, भरमसाट खर्च करणं, आपल्या मैत्रिणीचा अपमान करणं, वासनेची विकृति दाखवणं—भांडणाचे सारे प्रसंग तिला स्मरूं लागले. वाटलं, आईच्या आधारानेंच त्याच्या बद्दलचा काळजातला विखार वाढूं दे !

तेवढ्यांत फोन खणखणला. आई तिला सोडून दिवाणखान्यांत गेली. तोवर माधव उठून फोन उचलूं लागला. ती अंथरुणाशी दचकून उभी राहिली. अशा अपरात्री कुणाचा फोन ? नरेशचा ? छे, तो फोन करायला कसा धजावेल ? कशाला तो भेट घेईल ?— तिची छाती धडधडूं लागली. 'हो—नाहीं' म्हणत माधवनें फोन खाली ठेवला. आईशी तो जरा वेळ बोलला. मग सारी सामसूम झाली.

तिची छाती धडधडतच राहिली. नरेशबद्दल फसफसून आलेला द्वेष विरून गेला. अन् त्याची आकृति स्पष्ट दिसूं लागली. अंधेऱ्या रस्त्यावर उभी राहिलेली—सार्वजनिक फोनवरून बोलणारी, खिडकीसमोरून खुणावणारी—

बाबाला सोडून व आईला चुकवून ती परत अंधेऱ्या उंबरठ्यावर उभी राहिली.

**

भल्या सकाळीच ती नेटकी वेषभूषा करून लगबगीनें निघाली.

किती तरी दिवसांनीं तिनें आवडीचं लिंबू रंगाचं पातळ नेसलं व डोक्यांत सोनटक्क्याची फुलं घातली. फार दिवसांनी तिला तजेलं, उत्साही, अनिवार वाटत होतं. माहेरी आल्यापासून प्रथमच ती पहांटे स्नान करून हसतमुखानें घराबाहेर पडायला सज्ज होत होती.

"सकाळींच कुठे जातां वन्स !" तिनें स्वतःचा चहा करून घेतला, पाणी तापवून घेतलं, तेव्हां वहिनीनें नवलीत होऊन विचारलं.

"जरा जाऊन येते. एक मैत्रिण आलीय माझी. दुपारी जाणार आहे ती—"

"कोणती मैत्रिण ? तिलाच इकडे बोलवायचं—" वहिनी म्हणाली.

तिला स्वतःशीच हसूं आलं. भावडी वहिनी. माधवला दाखवली नि लगेच पसंत पडली. गेली. मॅट्रीकच्या परीक्षेतून सुटली की संसारांत पडली. तिला तारुण्यांतल्या मैत्रीचे अर्थ काय कळणार ? प्रीतिच्या चोरवाटा काय उमगणार ! तिला वाटलं, वहिनीचे

खांदे धरावेत व तिच्या कानांत सांगावं कीं ती नरेशला भेटायला निघाले आहे.

पण तेवढयांत देवळांतून आई आलेली दिसली व तिनें घाईनें म्हाणीत कोंडून घेतलं. आई आपली लगवग, आपल्या डोळ्यातले भाव् पहातांच ओळखले सारं! पूर्वी आपण प्रेमांत पडलो् व नरेशला चोरून भेटूं लागलो तेव्हां आईपासून तें लपून राहूं शकलं नाहीं. तेव्हांचं ठीक होतं! आईनें अडवलं व आपला निर्धार पाहातांच रुकारहि दिला. आतां जर आईला कळालं; त्याच तरुणाकडे आपण चोरून चाललो आहोत हें समजलं तर......

ती स्वतःशी थरथरली. घराबाहेर पडणं क्षणकाल अशक्य वाटलं. वाटलं, जाऊं नये. आईला फसवून, आईची पांखर सोडून कशाला हें धाडस करायचं? कां? पूर्वी फसवलं ते ठीक होतं. तेव्हां नवतीची थरथर होती. प्रियेकराची साद होती. आतां काय–?अन् त्याच पुरुषासाठीं...

ती मन कठोर करायला यत्न करूं लागली. बंबाचा धूर डोळयांत जाऊं देत त्याच्याबद्दल हृदयातली अंगार फुलवूं लागली. पण तिला फोनवरचं कालचं संभापण परत कानावर आलं.

'सहज फोन केला. ठीक आहे ना सगळं........'?
'हो–'
"बाबा कसा आहे? माझी आठवण काढतो?"
'तुमची वाट पाहातो—येणार आहांत भेटायला?'
'सध्यां नाहीं. मी परत येईन तेव्हां–हवं तर तूंच भेट–काय?'
'मी भेटू?'....

आईचा डोळा चुकवून ती घाईनें घराबाहेर पडली. फोनवरचं थावरं, तुटक संभाषण सरलं व तिला थकवा लागला. अखेर त्याला आठवण आली, फोन करायचं सुचलं, सहज म्हणून बोलाबावसं वाटलं. तो आपल्याला विसरला नाहीं. आपला द्वेष करीत नाहीं. आपल्या भेटीसाठीं आतुर आहे...तिला सुचेनासं झालं. कधीं एकदां नरेश, आपला एके काळचा पती भेटतो असं झालं.

रेल्वे साईडिंगचा परिसर समोर येतांच तिची पावलं थवकूं लागली. ती जागा तिच्या पूर्ण परिचयाची होती. लग्नानंतर ती इकडे आली नव्हती. पण दहा एक वर्षांपूर्वी ती ह्या स्थळीं कित्येकदां त्याला चोरून भेटत असे. वाळूच्या ढीगावर बसून वाघिणी पाहात दोघं मूकपणें बसून राहात. दूरवर दिसणाऱ्या सिग्नलची हालचाल पाहात हातांत हात गुंफत. इथेच ती त्याला प्रथम म्हणाली होती कीं—


प्रकाशबंदी

"ब्लॅक आऊटचा दंड स्वर्गात देईन म्हणतो"

पण आता साइडिंगचं स्वरूप बरंचसं बदललं होतं. निवांत जागाहि नव्हती. शेडस्, फलाट, वाघिणी, मजूर, आरडा—छे, हे एकांताचं स्थळ नाहीं. प्रेमिकांनीं भेटावं, पुर्नमिलन व्हावं यासाठीं ही जागा योग्य नाहीं. तिला उगाचच अशुभ वाटलं व ती वळली.

तेवढयांत सिगरेट दूर टाकीत नरेश पुढें आला व म्हणाला,

"म्हटलं. येतेस कीं नाही---"

ती विलक्षण दचकली. ह्याच क्षणाची ती परवापासून सारखी वाट पाहात होती. हा क्षण टाळावा कीं, कवटाळावा या संभ्रमात ती सतत घोळत होती. अन् असा तो तिच्या समोर उभा होता. वर्षभराच्या दुराव्यानंतर. कोर्टात टाकलेल्या अखेरच्या दृष्टिक्षेपानंतर. त्याच्याकडे बघून हसावं की मान खाली वळवावी तें तिला समजेना. अधीरता, लज्जा, भीति, शल्य, तिटकारा—कुठलीच भावना स्पष्ट आकारीत होईना.

"किती खराब झाली आहेस!–ये, त्या इराण्याच्या हॉटेलांत जाऊं–बाहेरच्या बाजूला शेडमध्यें टेबलं मांडलीं आहेत. शांत आहे तिथे—"

ती मंतरल्यासारखी त्याच्या मागोमाग गेली.

आठ दहा वर्षांपूर्वी, ती अशीच त्याच्या तालावर, त्याच्या पावलावर तो म्हणेल तिथें जात असेल.

त्याच्या समोर ती बसली. टेबलावर कोपरं टेकवून कानशीलं दाबीत त्याच्याकडें टक लावून पाहूं लागली. तोच वाळला होता. कसा एकटा राहात असेल. कुठे जेवत असेल! त्याला सकाळीं उठतांच चहा लागतो. बाहेर निघतांना हातरुमाल सांपडत नाहीं. दांत कोरायला टांचणी घ्यायची वाईट खोड आहे——कोण जपणार त्याला आतां? कसं सांभाळत असेल तो सारं?–अपार काळजीनें व कणवेनें ती कासावीस झाली.

"इथें कधी आलांस?—कुठं उतरलास?"

"पंधरा एक दिवस झाले. एका दोस्ताकडं मुक्काम टाकलाय–आहे, असाच ओळखीचा—नोकरी शोधतोय सध्यां—"

"म्हंजे, ती सोडलीस नौकरी अखेर? कधींच सोडणार नाहीं म्हणाला होतांस—"

दोन महिन्यापूर्वीच दिली सोडून—काय करायचंय आतां—"

त्याच्या बोलण्यातली उद्वेग तिला उमगला. त्या नोकरीवरून अनेकदां त्यांची तिची भांडणं झाली होती. ती नौकरी सोडून त्यानें दुसरी चांगली नौकरी धरावी अशी तिची फार इच्छा होती. पण त्याला उमेदच नव्हती. महत्त्वाकांक्षाच नव्हती. आता ती दुरावल्यावर——तिला त्याची अधिकच ओढ वाटली.

"बाबा उंच झाला असेल ना——"

"हो—तुमची आठवण काढतो. एकदां वाटलं होतं. त्याला आणावं बरोबर म्हणून...तूं एकदां भेट ना त्याला. घरी ये-—"

"नको. तुझ्या आईच्या घरी नको—" तो ताडकन् म्हणाला.






अनुक्रमणिका

आईवर, माधववर त्याचा फार राग होता. भावांच्या जीवावर ती शेफारली आहे असं त्याचं प्रथमपासून मत होतं.

ती कांहीं बोलली नाहीं. त्याच्यासारखंच मूकपणें चहा घेत राहिली. त्यानें आपल्याला कां बोलावलं ? सहज भेटायला ? बेकारीतले क्षण घालवायला ? पैसे मागायला ?—त्याच्या मनांत आपल्याबद्दल कांहींच कवळीक नाहीं काय ?—अन् आपण तरी कां आलो? इतकं धाडस कां केलं ? कुणी आपल्या दोघांना एकत्र पाहिलं तर ? आपल्याला काय हवंय ? केवळ कुतूहल—कीं पहिल्या प्रीतीच्या साक्षात्काराचा पगडा—?

तिला कांहीं सुचेना. सांडणारा चहा अर्धवट सोडून तिनें रुमालानें तोंड पुसलं. मानेवरचा घाम टिपला. मग त्याच वळकट पंजे, पोलो कॉलर मधून डोकावणारे छातीवरचे केस, कानाजवळचीं ताजी जखम, लालसर डोळ्यातली चमक—एकेक ओळखीच्या खुणा निरखूं लागली.

तेवढ्यांत त्यानें डावा पंजा पुढें केला व तिचे दोन्हीं हात पकडले. दाबले. ती नकळत पुढें झुकली. तो परिचित, पुरुषी उग्र गंध तिच्या रोमारोमांत घुसला व तिला भोवळ आल्यासारखं झालं——

* *

वस्त्रहीन अवस्थेत ती पारोशा अंथरुणांत पडली होती.

त्या अनोळख्या खोलींत वेड्या वाकड्या सावल्या भरल्या होत्या. बाहेर वारा अगदीं पडला होता. सूर्य पूर्ण बुडाला होता. सारं निवत होतं. विझत होतं. आणि ती शुद्धबुद्ध हरपल्यासारखी पडली होती.

ऐन उन्हांत तिनें घर सोडलं. अंगावरच्या वस्त्रभूषणांनी ती माहेरचे पाश तोडून निघाली. दहा बारा वर्षांपूर्वी ती अशीच घरांतून गेली होती. पळून. पहाटेची. प्रियकराकडे. आता भर दुपारची ती उघडपणें आपल्या पूर्वीच्या पतीकडें चालली होती—तेव्हां एका देवळाच्या ओवरीवर—आता एका स्नेह्याच्या भाडोत्री खोलींत—

"तूं काय मांडलंयस हे?—" नरेशचे सतरांदां फोन येऊं लागले तेव्हां माधव म्हणाला, "कुणाचे फोन येतात ! कुणाची आठवण काढीत बसतेस सारा वेळ ?——"

"सांगितलं ना ! नरेशची. तो आलाय इथे. मला भेटला दोनतीनदां— त्याची नौकरी सुटलीय—तो पार बदललाय—"

"तूं खोड्यांत सांपडते आहेस. त्याला पैसे हवे असतील. तुझा फायदा घ्यायचा असेल— सावध हो ताई——"

ती कांहीं बोलली नाहीं. माधव काय म्हणणार तें तिला पाठ होतं. तिच्या वैवाहिक जीवनाची त्याला खडान् खडा माहिती होती. म्हणून तर घटस्फोटाचा खटला नीट उभा करतां आला. माधवचा आधार घेऊन तिनें नरेशपासून फारकत घेतली; अन् आता अकस्मात ती माधवला टाळून———

"त्यानें तुझी भेट घ्यायचा यत्न केला तर ठार करीन त्याला..." मन्या संतापून ओरडला.

दोन्हीं भावांशी शत्रुत्व पत्करीत तिनें नरेशकडे जायचं ठरवलं. कायमच. आधी एकटं जाऊन सर्व ठरवायचं. अन् मग बाबाला घेऊन कायमचं जायचं !

[ पृष्ठ १९० वर पहा ]





अनुक्रमणिका



# 'माझ्या कांतिसौंदर्याचं श्रेय लक्सलाच!'

**–शर्मिला टागोर**

*आपलीहि कांति शर्मिला टागोर हिच्या कांतीइतकीच महत्त्वाची...आपल्याहि कांतीची निगा तशीच राखायला हवी!*

सौंदर्यवती शर्मिला म्हणते, 'सतेज, निर्व्यंग कांति ही स्त्रीला मोठ्या अभिमानाची गोष्ट वाटत असते. म्हणूनच मी म्हणते, आपल्यालाहि आपल्या कांतीबद्दल माझ्या इतकंच महत्त्व वाटत असणार. आपणहि माझ्याचप्रमाणं लक्स वापरा. माझ्या रोजच्या सौंदर्यनिगेत त्याला महत्त्वाचं स्थान आहे. लक्सचा मृदुमृदुल फेस किती सौम्य... आणि किती मधुर सुवासिक! आपल्याहि सौंदर्यसाधनेसाठीं लक्सचाच उपयोग करा!




शुभ्र व इंद्रधनुष्याच्या चार रंगांत

**लक्स टॉयलेट साबण** सिनेतारकांचा शुद्ध सौम्य सौंदर्यसाबण

लिंटास—LTS. 191-140 MA

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन




परदेशांत आणि परदेशच्या 'वारी'तही आतां नाविन्य राहिलें नाहीं. अखेर नाविन्य असते माणसांत. त्याच्या जगाकडे पाहण्याच्या दृष्टींत–म्हणजे स्वतःतच ! मराठींतले कांहीं अग्रगण्य लेखक विदेशीं जाऊन आले. त्यांनाही 'स्त्रिया' भेटल्या. त्यांची 'ओळख' पटली. त्यांतून कांहींतरी 'अविस्मरणीय'ही गवसलें. त्याला 'दीपावली' ने आवाहन केलें. आणि सुरांना साथ मिळाली. शब्दांना प्रतिसाद मिळाला–त्यांतून साकारली "मला परदेशांत भेटलेली अविस्मरणीय स्त्री" [तुम्हांलाही अविस्मरणीय वाटेल अशीच.]

- अरविंद गोखले
- रमेश मंत्री
- अनंत काणेकर
- अच्युत बर्वे
- जयवन्त दळवी
- वसंत देशमुख
- सदानन्द रेगे
- दिलीप चित्रे
- शंकर सारडा



अनुक्रमणिका

# मार्जोरी वेट्झर

सान फ्रान्सिस्कोला **सुझान ग्रानिस** नें भारतीय साध्व्यांच्या कहाण्या फिक्या केल्या आणि **मार्जोरी वेट्झरनें** कसलीहि आसक्ति वा आशंका न बाळगतां **'स्थितप्रज्ञे'**चा निर्भर स्नेह दिला

**आपली** लाल कॅडिलॅक एका निवान्त कोपऱ्याशी थांबवून ती क्षणकाल मुकाटयानें बसून राहिली. मग शेजारी वळून तिनें माझे हात आपल्या हातांत घेतले. 'आपली ही अखेरची भेट. अगदीं अखेरची. जसे अकस्मात आपण भेटलो असे आता कायमचे दूरावत आहोत. मला नाही वाटत आपण पुन्हां अशा रीतीनें आपण भेटूं. जरी तूं या देशांत परत येऊं शकलास तरी– तर मग तूं इथेंच उतर नि जा. निरोपाचा सोहळा नको अगदीं–'असं कांहींसं म्हणाली. नेमके शब्द आठवत नाहींत. नजरेतलं सारं स्मरत नाहीं. निरोपाचे सोपस्कार करायचे नव्हते म्हणून तिनें मला वाटेतच सोडलं व ती पळाली. मी आंतडं तुटल्यासारखं बघत राहिलो नि मग सावकाशपणें जड पावलं टाकीत चालूं लागलो. लॅनार्क कौंटीतल्या त्या खेडयाच्या ग्रे हाऊंड बस स्टेजपाशी आलो. मार्जोरी पुन्हां दिसणार नाहीं, भेटणार नाहीं. पत्रहि नक्की लिहीणार नाहीं. सहा आठ महिन्याची आगळी मैत्री. अचानक जुळली तशी अपेक्षितपणे सरली या विचारानें परतीचा प्रवास सुरूं केला.

* * * *

सुमारें सात आठ वर्षांपूर्वी मी अमेरिकेस विद्याभ्यासासाठीं व देश पाहाण्यासाठीं गेलो होतो. सात आठ वर्षं ! जितके दिवस लोटतात तितक्या आठवणी शिळ्या होतात. ओळखी विसरल्या जातात. सारं अस्पष्ट होत जातं. स्वप्न वाटतं. ज्या व्यक्तीच्या सहवासांत कांहीं क्षण काढले, भेटींनी मन उजळून गेलं, त्यांना निरोप देणं प्रथम जीवावर येतं. मग पत्रं लिहिण्याचा कंटाळा येतो. चेहेरे अस्पष्ट होत जातात. नांवहि धड आठवत नाहींत. वर्षभर राहून फक्त मूठभर माणसं स्मृतीत तरळतात.

परदेशच्या प्रवासांत स्त्रिया बऱ्याच व वारंवार भेटतात. बस तिकीटं, सिनेमाची तिकीटं देणाऱ्या मुली, ग्रंथपाल, विक्रेत्या –सगळ्या ठिकाणीं स्त्रियां. त्याहि मोकळेपणी वागणाऱ्या. आपण स्त्री आहोंत हे विसरायला लावणाऱ्या व स्त्री आहोंत या बळावर हटकणाऱ्या. कुणाच्या घरीं पाहुणा म्हणून गेलं तर गृहिणीच सारं आदरातिथ्य करते. भारतीय मनाला हे प्रथम विचित्र वाटतं. एवढया स्त्रिया भेटतात, बोलतात, मैत्री करतात हे नवलाचं वाटतं. प्रत्येक बाई अविस्मरणीय वाटते. मग संवयीनें, सहवासानें नाविन्य कमी होतं. ओळखी विस्तारतात. निवडकपणें कांहीं मैत्रिणी होतात. अविस्मरणीय व्यक्तींची यादी आकुंचित होत जाते.

नाहीं म्हटलं तरी सात आठ जणीं अशा भेटल्या कीं, त्यांची स्मृती दीर्घकाळ मनांत तरळत राहील. जातांना आयलंडच्या कोभ बंदराला बोट लागली व अनेक आयरीश निर्वासित प्रवाशांबरोबर नोएल कॉस्वां बोटींत आली. योगायोगानें डेकवरच ओळख झाली. केबिन्स समोरासमोर व जेवणाचे टेबलहि एकत्र. आम्हां चार पांच मित्रांच्या टोळक्यांत नोएल एकदम मिसळून गेली. देशत्यागाचं दुःख व अनोळखी जगांत नशीब काढण्याचं धाडस–पण साऱ्या समस्या लपवून त्या आयरीश मुलीनें आठ दिवस मजेत काढून स्वतंत्र, मनस्वी स्त्रीचा एक नमुना दाखवला. . . युनिव्हर्सिटी कॅम्पसवर पहिल्याच दिवशीं मी 'होम सिक' झालो व एका सहकारी जेवणघरांत उदासपणें जेवत बसलों–तेव्हां रोझिलीन ऑस्टोव्हस्की नांवाच्या पोलीश विद्यार्थिनीनें आपण होऊन माझी चवकशी केली मला माणसांत आणलं. दुसऱ्या दिवशीं पुन्हां कधीं ती दिसली नाहीं. तिचा प्रियकर दुसऱ्या विश्वविद्यालयांत होता तिकडे रॉझ निघून गेली. तिचा पुढें प्रेमभंग झाला व ती परत वर्षानें आमच्या विद्यालयांत आली. आली व सहज मला एका हॉटेलांत भेटली. बोलतां बोलतां माझ्या लक्षांत आलं कीं, माझ्या इथल्या मुक्कामांतल्या













अनुक्रमणिका

पहिल्या दिवशीं ती भेटली आणि आज वर्षानें परत दिसली तों माझा इथला अखेरचा दिवस ! किती चमत्कारिक योगायोग. . . सान फ्रान्सिस्कोला सतत चार दिवस माझ्या सहवासांत राहून सुझान ग्रानिसनें मला फ्रिस्कोचं अन्तर्बाह्य जीवन दाखवलंच, पण आपल्या आचरणानें भारतीय साध्व्यांच्या कहाण्या फिक्या केल्या. अमेरिकेतील अनुभवावरून एकुलती एक कथा संपूर्णपणें लिहिल्या-सारखी दिली. . . .सेंट लुई जवळच्या ज्या दोन भगिनीशीं मी वत्तीस तेहत्तीस सालीं पत्रमैत्री जोडली त्या सुझी व आयलीन, दोघी प्रत्यक्ष भेटल्या. एकमेकांची संपूर्ण माहिती होती. फक्त भेट नव्हती. अन् मी त्यांच्या घरीं राहून आलो. एका जुन्या, तुटक, बंद पडलेल्या पत्रव्यवहारावर झालेल्या मैत्रीला एकदम तजेलं, गहिरं स्वरूप आलं. . . अमेरिका सोडतांना. . . .

पण ह्या योगायोगानें भेटलेल्या व काळजांत आपलं व्यक्तिमत्व ठसवून गेलेल्या ज्या कांहीं स्त्रिया स्मरतात त्यांत मार्जोरी वेट्झरला अग्रमान दिला पाहिजे. साधी, सरळ, सोज्वळ—पण त्या प्रौढ, विवाहित स्त्रीनें माझे तेथील कितीतरी क्षण सुखाचे केले. एक भावबंधनिर्माण केला. कसलीहि आसक्ति वा आशंका न वाळगतां मला निर्भर स्नेह दिला.

★ ★ ★

[१]

तुम्हा-आम्हांला भेटलेली अविस्मरणीय स्त्री

पोटार्थिका

('व्यवसायि'का)

कशास बाई भिडविशी डोळे
खोल तुझे गाल
रात्रींच्या "सौद्यां"त उद्यांचा
असे उषःकाल

परदेशांतून आलेल्या विद्यार्थ्यांना अमेरिकन आयुष्याशीं परिचय व्हावा म्हणून दर विक-एण्डला आजुबाजूच्या गांवांतील कुटुंबांतून राहायला वोलावणीं येत. ह्या संधीचा फायदा घेऊन मी निरनिराळ्या कुटुंबांत राहून येई. वहुतेक घरं चांगलीं. घरच्यासारखी वागवायची. पण डिसेंबरच्या एका विक एण्डला एक अगदीं वेगळंच कुटुंब भेटलं.

एका शुक्रवारीं संध्याकाळीं मॅडिसनपासून शंभर एक मैल दूर असलेल्या लॅनार्क गांवीं आम्हीं दहा पंधरा विद्यार्थी गेलो. भारतीय, आफ्रिकी, ऑस्ट्रेलियन. तिथल्या चर्चच्या व्हरांड्यांत कॉफीपान करीत कुठला विद्यार्थी कुठल्या कुटुंबांत राहायला जायचा यावर चर्चा चालू होती. मी एका बाजूला बसलो होतो. ह्या विक एण्डला खोलीवरच राहून अभ्यास उरकायला हवा होता, निदान अभ्यासाचं एखादं पुस्तक तरी बरोबर आणायला हवं होतं, असा विचार करीत रस्त्याकडें पहात होतो.

तेवढ्यांत एक लाल कॅडिलॅक यवकली व पस्तीशींतली, पिवळा झगा पेहरलेली एक स्त्री उतरली. परदेशी विद्यार्थ्यांना पाहुणे बोलावण्याची कल्पना तिला नवीन होती. गांवांत असा पहिलाच कार्यक्रम होत होता पण तिला त्याचा पत्ताच नव्हता. ह्या आदर्श, आगळ्या कार्यक्रमांत सहभागी व्हायलाच हवं. विद्यार्थी कमी असले नि् पाहुणचार घेण्यास तयार असणारी कुटुंबं जास्त असलीं म्हणून काय झालं ? तिच्या वाटचाला एकजण यायलाच हवा. गांवासाठीं तिनें इतकं केलंय. तिच्ना वशीला, अधिकार अगदींच नाहीं काय ?

ती आवेगानं आंत आली. तिला गांवांत चांगलाच मान असावा. कारण ती आंत येतांच व्हरांड्यातल्या गप्पा बंद पडल्या. गांवकरी तिच्या भोंवती गोळा झाले. कार्यक्रमाची रूपरेषा ऐकत असतांना तिची नजर माझ्याकडे वळली व ती एकदम म्हणाली,

"ही इज माय गेस्ट फॉर दि विक एण्ड— हाय, आय ॲम मार्ज बेट्झर—" पुढं होऊन तिनें हंसत माझ्याशी हस्तांदोलन केलं.

मग पांचच मिनिटांत मी मिसेस् वेट्झरसह निघालो.

गांवाच्या एका बाजूला तिचं पांढऱ्या रंगाचं, सभोंवार हिरवीगार लॉन्स असलेलं टुमदार घर होतं. दुमजली. खेरीज छोटं तळघर. दाराशींच तिची पांचएक वर्षाची छोकरी नवी दुचाकी चालविण्याच्या नादांत गर्क झाली होती.

"कॉनी—हे वघ कोण आलंय आपल्या-कडें—" आम्ही मोटर ठेवून दाराशी येतांच मार्ज मुलीला म्हणाली. सायकल सोडून कॉनी माझ्याकडे डोळे फाडून वघूं लागली. साम्य नव्हतं, पण एकदम मला माझ्या मुलीची आठवण आली !

घरांतली मांडणी नमुनेदार होती. दिवाणखान्यांत कोचं, रेडियो, रंगीन टेलिव्हीजन, छोटं ग्रंथालय, कपाटावर पुतळे, फोटोंचे आलवम. तळघरांत धुलाई यंत्र व पूल गेमचं टेवल. मुलांच्या छोट्या खोल्या, सुसज्ज स्वयंपाकघर. श्रीयुत वेट्झरांचा फर्निचरचा व्यवसाय होता ते कामावर गेले होते. मोठा पीटर वॉलगेम खेळायला व मधला वॉबी वर्तमानपत्रं टाकायला गेला होता.

शय्यागृहाजवळच कॉनीची छोटी खोली होती. तिचा छोटा पलंग, कोपऱ्यांत बाहुलीचा खेळांतला पलंग. भिंतीवर रंगीत वालचित्रं. "कॉनी, तुझी खोली पाहुण्यांना द्यायची का ?" आम्ही तिच्या खोलीशी येतांच मार्जोरी म्हणाली.

कॉनीनें एकदम संमती दिली अन् मार्जोरीला विस्मय वाटला. "कॉनी आपल्या वस्तू कुणाला देत नाहीं. खोलीत तर मैत्रिणींनाहि येऊं देत नाहीं...." ती पुटपुटली व माझी बॅग कॉनीच्या कॉटवर ठेवत म्हणाली, "ह्याला आविन म्हणायचं हं. . . काय ?"

"एल्वीन—" एक दोन दांत पडलेल्या कॉनीनें कसावसा उच्चार केला.

मी कपडे वदलून व तोंड धुवून खाली आलो तेव्हां मार्जोरीनें कॉफी व कुकीज् दिवाणखान्यांत आणून ठेवल्या होत्या. थोडंसं इकडचं तिकडचं बोलणं झाल्यावर ती म्हणाली,

अनुक्रमणिका

"दहा वर्षं ह्या खेड्यांत राहून मी अगदीं उबून गेले आहे. पहिलीं वीस बावीस वर्षं शिकागोला गेलीं. जगभर भटकायचीं स्वप्नं पाहिलीं अन् आतां इथें अडकून पडलेय्. आमच्या संसारांत प्रॉब्लेम्स् नाहींत कीं मी सायकोपॅथ नाही. पण मला एकदम साऱ्याचा शीण आलाय. आयुष्यावर पुटं उठली आहेत. गेले चार सहा दिवस तर मी कधीं नाहीं इतकी अवस्थ होते. कांहीं तरी घडावं असं क्षणा क्षणाला वाटत होतं. अन् आज तूं भेटलास. इथें रहायला आलास. देवानें धाडावं तसा ! तर मग तुझ्याबद्दल सारं सांग मला. तुझ्याबद्दल, तुझ्या बायको मुलांबद्दल, गांवांबद्दल, देशाबद्दल, धर्मांबद्दल—मुख्य म्हणजे तुमच्या धर्मातल्या पुनर्जन्माच्या कल्पनेबद्दल. खरच, पुनर्जन्म असतो कां रे ?"

★ ★ ★

मार्जोरी बेट्झरला पुनर्जन्माच्या कल्पनेचं विलक्षण आकर्षण होतं. स्वतः ती इतर अनेक अमेरिकन गृहिणींप्रमाणें चर्चचं कांहीं ना कांहीं काम करीत असे. गांवच्या बॅप्टीस्ट चर्चची ती एक आधार-स्तंभ होती. परंतु कुठेतरी तिनें पुनर्जन्माबद्दल कांहींतरी वाचलं होतं. अन् का कुणांस ठाऊक, माझ्या दोन दिवसांच्या मुक्कामांत ती त्या विषयावर बरेचदां बोलत राहिली.

शुक्रवारे संध्याकाळ पासून रविवार संध्याकाळपर्यंत मी स्वतःच्या घरांत राहावं असा त्या कुटुंबांत वावरलो. मार्जची व माझी नीट ओळख होईपर्यंत श्रीयुत बेट्झरहि आले. गृहस्थ उमदा वाटला. एकाच वेळीं अबोल अन् आनंदी. पीटर व बॉबीहि जेवणाचे वेळेपर्यंत आले. कॉनी तर सारा वेळ भोंवतीं भोंवती होती. दोन दिवस मार्जनें मला नाना पदार्थ खायला करून घातले व माझ्याकडून पुऱ्या कशा करायच्या तें शिकून घेतलं. बेट्झरनें वेळोवेळीं घेतलेल्या फिल्मस् दाखवल्या. कॉनीच्या शाळेंत आम्ही गेलो. जवळच्या जेन्सव्हीलला जाऊन पार्कर पेन्सचा कारखाना पाहिला. अपरात्रींपर्यंत गप्पा मारल्या.

विक-एण्ड संपला, पण निरोप घेतांना नेहमींसारखं कायमचा निरोप घेत आहोंत असं वाटलं नाहीं. मला व मार्जलाहि. वाटलं कीं, घरातलाच कुणी कॉलेजला शिकायला चालला आहे. लवकरच व वारंवार भेटी गांठी होणार आहेत.

खरोखरीच, पुढील सहा महिन्यांत आमच्या सहज अगर मुद्दाम भेटी गांठी होत गेल्या. मी परतल्यावर दोनच दिवसांनीं एका रात्री कॉनीचा फोन आला. एकदां कॅम्पस्वर श्रीयुत बेट्झर अचानक भेटला. लंचला थांबला. लॅनार्क वरून पुढें फ्री पोर्टला सहलीला जातांना मी तासभर त्यांच्या घरी थांबलो. एकदां ते सारं कुटुंब मॅडिसनला युनिव्हर्सिटी पाहायला म्हणून आलं. कॉनीच्या वाढदिवसाला मी एका बुधवारी संध्याकाळी जाऊन आलो.

एकदां एकाएकी माझी दाढ ठणकूं लागली. इथले दंत वैद्य भयानकरीत्या तुमचा खिसा कापतात असं ऐकलेलं, म्हणून मार्जला फोन करून मॅडीसनच्या एका दंतवैद्याची ओळख मिळविली. त्या डॉक्टरनें दहा मिनिटांत दाढ भरून माझं दुखणं संपवलं. मीं त्या आनंदात सिनेमाला गेलो व रात्रीचा उशीरानें खोलीवर परतलो. दुसरे दिवशीं मार्ज शंभर मैल मोटर हाकीत मॅडीसनला आली. माझी डॉक्टरची भेट झाली कां, मला बरं वाटतंय कीं नाहीं—कांहींच कळवलं नव्हतं मी. तिनें फोन केला, पण मी घरी नव्हतो.



अनुक्रमणिका

काळजी करीतच ती आली हे पाहून मी शहारून गेलो.

• थिसीस लिहायला मला एकांत हवा होता म्हणून मी एक आठवडा वेट्झरांच्या घरी राहिलो. न्याहारी घेऊन मी वर, कॉनीच्या खोलीत जाई तों संध्याकाळी पांचाला बाहेर येई. लंचहि वरच येई. संध्याकाळीं मात्र मार्जोरी माझी पुस्तकं कुलुपांत टाकी. स्नान करून भरपूर जेवण, जरासं मद्यपान, दूरवर भटकणं, दिवा जाळत गप्पा मारणं---

★ ★ ★

ह्या घरानें मला आपलं कां मानलं व ह्या स्त्रीनें मला अशी मैत्री कां दिली ह्याचा मला कधींच उलगडा झाला नाहीं. त्यांच्या नात्यातले, त्यांचे स्नेही, त्यांचे शेजारी भेटले. त्यांनाहि माझ्या वेट्झर घराण्याशी जडलेल्या दोस्तीचा अचंबा वाटला असावा अशी माझी कल्पना झाली.

• पुनर्जन्माच्या विभ्रमांतून मार्जोरीनें कांहीं कल्पना करून घेतली. असेल कां ? ती एखाद्या विशिष्ट मूडमध्यें अडकली असेल कां ? अत्यंत एकाकी, अडगळींतल्यासारखं तिला वाटत असेल काय ? आयुष्याच्या उभारीची अखेर होत असतांना एखादी आगळी दोस्ती व्हावी असं तिला वाटलं असेल कांय ? ख्रिस्ती धर्माचा मजवर प्रभाव पाडावा असे चर्चचं काम करतांना तिला वाटलं नसेल ना ? आयुष्यांत प्रथमच ती एका लेखकाला भेटत होती म्हणून तर तिला कांहीं वेगळं वाटत असावं ? वयांत येणाऱ्या पीटरबद्दल, घर सोडूं पाहणाऱ्या बॉबीबद्दल, स्थितप्रज्ञ नवऱ्याबद्दल मोकळेपणी बोलायला तिनें माझी योजना केली असावी काय ? कीं इतक्या गुंतलेल्या व वाहत्या आयुष्यांत एखादा निर्भर स्नेह जुळवावा अशी लालसा तिला झाली असेल ?




हजार वेळा सांगतो ऽऽ बायानो मी लूप विकत नाहीं.

तिचं रूप आणि तिचा संसार, तसं पाहिलं तर, चारचौघां अमेरिकन बायांसारखा होता. व्यक्तिमत्वांत खिळवून ठेवणारं असं खास कांहीं नव्हतं. पण तिच्या आदरातिथ्यानें मी भारावून गेलों. तिच्या मुलीनें मला लळा लावला. अचानक ती आली व नेमकं मला निवडून घेऊन गेली, म्हणून मला चुटपुट लागली. पुनर्जन्म, साहित्य, विद्यालयीन जीवन इथपासून तों बर्फाचा वर्षाव होतांना मनांत येणारे विचार, दंतवैद्याच्या खुर्चीवर बसतांना डोळ्यांपुढें दिसणाऱ्या आकृत्या इथपर्यंत अनेक बाबतींतले तिचे वेगळे विचार मला आकर्षक वाटले. आयुष्यांतलं कांहींतरी हातांतून सुटलंय, सारं सरळसूत व एकेरी होतंय, ह्यानें ती कावरी बावरी झाली होती; स्वतःचा संभ्रम व समस्या लपवून माझ्या सहवासानें व स्नेहानें ती कांहींतरी निराळं मिळवूं पाहात होती, हें मला दिसत होतं. नि म्हणून मी गुरफटून घेत होतो. संसारांत अडकून पडलेली ती व घरादारापासून दूर आलेला मी यांत कांहींतरी जवळीक होती व तें अपूर्व असं कांहींतरी आम्ही जतन करीत होतों. तेंहि तात्पुरतं आहे हें स्वतःला पटवून देत !

पण तात्पुरतं आहे हे एकमेकांना अखेर सांगणं भाग होत. मॅडीसनचा माझा मुक्काम संपल्यावर मी एक दिवस लॅनार्कला राहायला गेलो. वेट्झरांच्या बरोबर दिवस मजेत घालविला. वर्षभरांत मी अनेक कुटुंबांत राहिलो होतो. अनेक स्नेही जमवले होते. पण मुद्दाम भेटून जावें असं हेच एकमेव ठिकाण होतं. कॉनीला भेटी दिल्या व मार्जनें केलेल्या पुऱ्या खाल्ल्या. वेटझरनें खूपसे फोटो काढले. मुलांनीं आमची बोलणीं टेप केली.

"हिंदुस्थानांत गेलो कीं. . . " मी मार्जेरीला सांगूं लागलों.

'पत्र पाठवूं नको— त्यांत कांहीं अर्थ नसतो. पत्र व्यवहार धांपा टाकीत चालू ठेवायचा, उगाच आठवणी उगाळायच्या. जसा अचानक आलास, तसाच जा. माझ्या आयुष्यांत अगदीं उजाड मनःस्थिती तुझ्या मैत्रीची थोडी मदत झाली. . . . "

"मी विशेष काय केलं ? तूंच माझं इथलं जीवन सुसह्य केलंस. मला घरची आठवण आणून दिली नाहींस—"

ती कांहीं बोलली नाहीं. मला तिच्या आयुष्यांतून बाद करायला ती मनाला शिकवीत होती. वेट्झरनें आम्हां दोघांचा फोटो काढला त्यांतहि ती मख्खपणें उभी राहिली. मग मुकाट्यानं मला स्टेजवर सोडण्यासाठीं तिनें गाडी काढली. •

. . . . ब्लाईंड डेटिंग करतांना तिला वेट्झर भेटला व तिनें तडकाफडकी लग्न केलं— एका अटीतटीच्या वादविवादानंतर तिनें बॅप्टीस्ट चर्चचा स्वीकार केला—कॉनीचा जन्म होतांच तिनें आपलं मृत्युपत्र केलं, वर्षभर चार चार तास खपून तिनें कादंबरी लिहिली व कुणाला वाचायला न देतां एकेक दिवस एकेक पान फाडीत जाळून टाकली....सारा समृद्ध संसार सोडून अलास्काला जायला एकदां ती निघाली, पण जिन्यांत पाय घसरगळल्यानें उंबरठा ओलांडूं शकली नाहीं.. एका विचित्र मनःस्थितीत एका भारतीयाशी तिनें स्नेह जुळविला व वेळ येतांच ती अलग झाली.. . . .

आज आठ वर्षांत तिचं पत्र नाहीं. माझ्या पत्रांना उत्तरं नाहींत. माझा एक स्नेही तिला भेटून आला. त्याचं आगतस्वागत केलं, आमचे फोटो दाखवले, टेप ऐकवले, पण मला निरोप नाहीं. पीटरच्या लग्नाचं निमंत्रणहि नाहीं. मनाचा कौल मानला. आमच्या मैत्रीला, मला विसरायचं स्वतःला शिकवलं.

मला मात्र सारंच अविस्मरणीय वाटतं !

—अरविंद गोखले






अनुक्रमणिका

# योजनगंधा

लंडनच्या विमानतळावर उतरलो आणि पातळांतल्या त्या 'योजनगंधे'नें माझें लक्ष वेधून घेतले.




मी लंडनच्या एअर टर्मिनलवर आलो आणि माझें लक्ष कुणी वेधून घेतले असेल तर ते पातळांतल्या बाईनें. इटाली, स्वित्झलंड, बेल्जम अशा ठिकठिकाणीं गेल्या पंधरावीस दिवसांत मी हिंडलो होतो पण कुणी पातळातली आढळली नव्हती. त्यामळें एअर टर्मिनलवरच्या बाईकडे , पाहून उगाचच बर वाटले. उगाचच अशाकरतां कीं, तिचा माझा कांहीं लागाबांधा नव्हता कीं, ओळख होण्याचीहि शक्यता नव्हती. वाटलेले कुतुहल दडपून टाकीत मी इन्क्वा-यरी बूथकडे गेलो. हॉटेलची चौकशी करणार तोंच माझ्या नांवाची अनाऊंसमट कानावर आली. बूथपासून मी बाजूला झालो तोंच मघाची ती बाई माझ्या दिशने चालत पुढे आली. जवळ येत तिने विचारले, "आपणच अच्युत बर्वे काय ?"

"हो. पण आपण ?"

"मी मिसेस वासीफ. शहीन वासीफ" हातातल्या पर्समधून पत्र काढून ते तिने माझ्या हातांत दिले आणि म्हटलें, "वाचा म्हणजे उलगडा होईल."

माझ्या कथातून घडते तसें हे घडत होते. . . . .

मी परदेश प्रवासासाठीं निघण्यापूर्वी चार आठ दिवस आधीं ओबेराय नांवाच्या माझ्या एका सहकाऱ्याने आर्किटेक्ट वासीफ यांचं आणि माझी ओळख करून दिली होती. वासीफ हे नेहमी लंडनला असतात पण काहीं कामासाठीं ते दोनचार महिने परत आले होते. ते भेटले त्याच्या थोडा वेळच आधीं माझ्या प्रवासाची आयटेनरी नक्की झाली होती. सहज म्हणून आयटे-नरीची एक प्रत त्यांनीं मागून घेतली होती. आपल्या मिसेस्ला पत्र लिहून त्यांनीं मी ब्रसेल्सवरून लंडनला कुठच्या तारखेला येणार आहे, कुठच्या फ्लाईटनें येणार आहे हे सारे कळवले होते आणि मला घरीं घेऊन जाण्याबद्दल तिला विनंती केली होती.

पत्र वाचून झाले तेव्हां तिनें चक्क मराठींत विचारले, "झाला उलगडा ?"

"झाला. पण आपण इतकं चांगलं मराठी कसं बोलता ?"

"कां ?"

"वासीफ म्हणजे—" मला काय म्हणावयाचं होतं ते लक्षांत येऊन तिनें विचारले, "मीही उर्दूंतच बोललं पाहिजे असा तुमचा आग्रह आहे काय ?"

"नाही नाहीं" आणि आम्ही दोघंही मोकळेपणानं हंसलो.

टॅक्सीच्या दिशनें चालता चालता तिने दिलगीरीच्या सुरांत विचारलं, "माझ्यामुळं





अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



तुम्हाला फार सावकाश चालावं लागतं काय ?" तिचा प्रश्न माझ्या लक्षांत आला नाहीं आणि मी गोंधळून तिच्याकडे पाहूं लागलों. खुलासा करीत ती म्हणाली, "गेले कांहीं दिवस मी आजारी होते. पाय अधू झाले आहेत. भराभर चालता येत नाहीं."

"काहीं हरकत नाहीं." तेवढ्यांत आम्ही टॅक्सींत बसलों. ती आजारी असूनही माझ्यासाठीं एअर टर्मिनलवर आली आणि माझी वाट पहात ताटकळत उभी राहिली हें पाहून मी भारावून गेलो. ती आजारी असतांना माझ्यामुळें तिला त्रास व्हावा हें मला प्रशस्त वाटेना. मी तसें म्हटलें तव्हां तिने विचारले, "मी माझ्या दुखण्याचा उल्लेख केला ही चूक झाली काय ?"

भावनाप्रधान होऊन बायका असे प्रश्न विचारतात आणि पुरुषाला नामोहरम करतात. नेहमींसारखेच हे चालले होते. मी गप्प बसून राहिलो.

कार्स्टन हिलवरची तिची जागा प्रशस्त होती. घर फार चांगल्या तऱ्हेनें मांडलेले होते. त्याचें मला विशेष कांहीं वाटलें नाहीं. आर्किटेक्टच्या घरातली मांडणी चांगली असणारच असें मी गृहीत धरून चाललो होतो. पण माझें लक्ष वेधून घेतले ते भिंतीवरच्या इंप्रेशनीस्ट स्टाईलनें काढलेल्या चित्रांनी ! चित्रांकडे पहात मी म्हटलें, "आर्टीस्ट फार चांगला दिसतो. हें चित्र तर फारच चांगलें आहे."

"थँक यू"

"म्हणजे—"

"हो."

ती आर्टीस्ट आहे हें मला नव्यानेंच कळत होतें. तिने केलेल्या पेंटींग्जमधली वर्षाकाठीं सात आठ तरी लंडनसारख्या ठिकाणीं विकली जात होती. पण प्रश्न विचारून माहिती काढून घेतल्याशिवाय ती आपल्या कलेविषयीं कांहीं बोलत नव्हती. फ्लॅटमधल्या खोल्या मला दाखवता दाखवता आम्हीं एका खोलीपाशीं आलो तेव्हां ती म्हणाली, "आता आठ दिवस ही तुमची खोली."

"थँक यू."

"आधीं मी काय सांगते ते ऐका तर खरं." ती सांगू लागली, "इथं थंडी फार असते. एकसारखा पाऊस झिमझीमत असतो. थंडीनें कुडकुडलेत किंवा पावसांत भिजलेत तर इथें निभाव लागणार नाहीं. कांहींही करा पण आजारी पडूं नका. आजारी पडण्यासारखा आपल्या लोकांना इथें शाप नाहीं."

[२]

तुम्हा-आम्हांला भेटलेली अविस्मरणीय स्त्री



**पारदर्शिका**
**(प्रदर्शिका)**

**ढळला रे ढळला बघ सखया**
**पदर तिचा मुद्दाम लिलया**
**आतां कशाचे काम जगीं या**
**जाहले वस्त्र 'शोकेस' परि**

आजारी न पडतां लंडनमधले माझे दिवस मजेंत चालले होते. सकाळीं मी तिच्याबरोबर बाहेर पडे. ज्या ठिकाणीं माझी अपॉईंटमेंट असे त्या ठिकाणीं ती मला टॅक्सीनें सोडो आणि मग ट्रीटमेंटसाठीं हॉस्पिटलमध्यें जाई. काम आटपून संध्याकाळीं मी घरीं आलों कीं, लंडन दाखवायला ती मला बाहेर घेऊन जाई. कधीं आम्ही बाहेर जेवत असूं तर कधीं ती मुद्दाम मला आपल्या तऱ्हेनें पदार्थ करून खायला घालो. माहिती दिल्याचा किंवा मला शिकवण्याचा आव न आणतां, कुठच्या वेळीं कुठचें ड्रींक घ्यायचें, कुठच्या वेळीं कसे वागायचे किंवा फ्रेंच आणि इटालीयन शब्दांचा बरोबर उच्चार कसा करायचा हे सारें तिनेंच मला शिकविलें. कुठचा कोण मी ! पण किती आपुलकीने ती मला वागवीत होती ! मनात आले कीं, पूर्वजन्मींचा कांहीं ऋणानुबंध असल्याशिवाय हे होणें नाहीं. लंडनमध्यें जे जे तिला दाखवता येणें शक्य होते ते ते तिने मला दाखवले होते. बोलता बोलता ती म्हणाली, "आज अली येणार आहेत."

"अली कोण ?"

"आहेत बासीफचे मित्र. त्यांना मी मुद्दामच बोलावलं आहे."

"कशाकरतां ?"

"ते तुम्हाला घेऊन एका 'शो'ला जातील."

"तुम्ही नाहीं येणार ?"

हंसल्यासारखं करीत ती म्हणाली, "नाहीं."

नाहीं म्हणतांना ती कां हंसली होती आणि माझ्याबरोबर येण्यासाठीं तिने अलीची योजना कां केली होती ते शो सुरू झाल्यावर माझ्या लक्षांत आले. तिच्या हुशारीचे कौतुक करीतच मी स्ट्रीपटीज पाहून घरीं परतलो होतो.

लंडनचा मुक्काम आटपून मी दुसऱ्या दिवशीं सकाळीं न्यूयॉर्कला जायला निघणार होतो. माझी सूटकेस मी भोवरीत होतो. माझा टेरीलीनचा शर्ट दिसला नाहीं म्हणून मी शोधाशोध करीत होतो. तोंच इस्त्री केलेला शर्ट तिने माझ्या हातांत आणून दिला. मी चमकून विचारलं, "हा कुणी धुतला ?"

"मी धुतला."

"कां ?"

"कारण असं कांहीं तुम्हांला जमत नाहीं हे माझ्या लक्षांत आलं." काय बोलावे मला सुचेना. मी तिला कांहीं विचारणार तोंच तिने म्हटले, "तुम्ही रागावणार नसलांत तर मी तुम्हांला कांहीं विचारणार आहे."

"तो तुमचा अधिकार आहे."

हंसल्यासारखं करीत तिने विचारलं, "तुमच्यापाशीं पुरेसं एक्सचेंज आहे काय?"

"भरपूर आहे. शिवाय ह्या आठवड्याभरांत तुमच्या कृपेने मीं बरेच पौंड शिल्लक टाकले आहेत."









अनुक्रमणिका

"चेष्टा राहूं दे. न्यूयॉर्कमधें तुमचा वराच खर्च होईल. तुमची रहाणी ही अशी ! शिवाय तुम्हांला अजून परत फिरायचं आहे. पॅरीस, फ्रॅंकफर्ट करायचें आहे."

"तरीही माझे मला पुरेल एवढें एक्स-चेंज आहे."

"पण मिसेस वर्वेना आणि तुमच्या मुलींना कांहीं घेऊन जाल कीं नाहीं ?"

"त्याची मात्र वानवा आहे. पण त्याची मला विशेप काळजी नाहीं. माझी वायको समजंस आहं ?

ती पुन्हा हंसली आणि तिने विचारले, "माझं ऐकाल ?"

"ऐकेन."

"मी देते ते पौंड वरोवर घ्या."

"घ्यायला हरकत नाहीं. पण फेडू कसे ?"

"तिकडे गेल्यावर वासीफ भेटतील तेव्हां त्याना रुपये द्या." आणि पौंडांच्या नोटा तिने माझ्या स्वाधीन केल्या.

रात्री दिवाणखान्यांत टी. व्ही. समोर आम्हीं वसलो होतो. येऊं घातलेल्या निवडणुकीचा प्रचार चालू होता. पण त्यांत आम्हा दोघांनाही स्वारस्य नव्हते. आमच्या गप्पा चालू होत्या. गप्पाच्या ओघांत मी तिच्या आजारीपणाविपयीं विचारले. ती सांगत होती, "वासीफ गेले आणि महिन्याभरांतच मी आजारी पडले. एक दिवस सकाळीं जागी झाले तो पाय लुळे पडलेले. थंडगार. ब्रह्मांड आठवलं. मी अशी एकटी ! पण धीर सोडला नाहीं. डॉक्टरना फोन केला. पंधरा दिवस बिछान्यावर पडून होते. दिवस कसा तरी रेटीत होते. पण रात्र खायला उठे. नाहीं नाहीं ते विचार मनांत येत. दहा पंधरा दिवसांनीं हिंडू फिरूं लागले. पण आज दोन महिने झाले तरी नशिवीची हॉस्पिटलची वारी चुकली नाहीं."

"मग तुम्हीं वासीफना कळवलंत कीं नाहीं. ?"

"कळवलं. पण मी मजेंत आहे, सुखात आहे म्हणून कळवलं."

"कां ?"

"कारण आज पांच वर्पांनीं ते तिकडे गेले आहेत. तेही कांहीं महत्वाच्या घरगुती कामासाठीं. माझ्या आजारपणाचं त्यांना कळवलं असतं तर मिळेल त्या फ्लाईटनें ते इथं आले असते. कामधंदा सोडून. आणि ते मला आवडलं नसतं." ती सांगत होती. आणि मी ऐकत होतों. ऐकतां ऐकतां, मिलानोमध्ये माझ्या नाकातून कुठें रक्त आलें आणि माझी कशी घावरगुंडी उडाली होती त्याची आठवण झाली आणि मनांत आले कीं, ही वाई धीराची खरीच ! तिच्याकडे पहात मी म्हटलं, "आता वासीफ भेटले कीं मी त्याना सांगेन."

"मेहरवानी करून तसं कांहीं करूं नका. स्वतःच्या आजारपणाविपयीं हळवेपणाने आपण जास्त वोललो असं वाटून कीं काय ती म्हणाली, "झोंपा आतां. उद्यां सकाळीं तुम्हाला लौकर उठायचं आहे."

सकाळचा चहा घेत, आम्ही वसलों होतों. पण नेहमींप्रमाणें ती आज वोलत नव्हती. मी काय झाले म्हणून विचारले तेव्हां ती म्हणाली, "जरा वेळाने तुम्ही निघून जाल. पुन्हा मी एकटी. ह्या एवढ्या मोठ्या घरांत मी एकटीच्या एकटी."

एकाकीपणाचं दुःख काय असते ते मी समजूं शकत होतो. पण तिचा मूड वदलावा म्हणून मी म्हटलं, "एकटी न राहाणं तुमच्या हातांत आहे."

"कसं ?"

"आता वासीफ आले कीं त्यांना विचारा"

माझ्या वोलण्याचा उलगडा होऊन तिनें म्हटलें, "तुम्हाला वाटतं तितकं ते सोपं नाहीं. मूलवाळ झालं तर हा फ्लॅट सोडून आम्हाला दुसरीकडे जावं लागेल."

"कां ?"

"कारण मालकाची तशी अट आहे."

दुःखाच्या तरी काय एकेक परी असतात !

मी नको म्हणत असताही एअर टर्मिनलवर ती मला पोचवायला आली. निघायचा क्षण जवळ आला तेव्हां ती म्हणाली, "एक वचन द्या."

"दिलं."

"वासीफ भेटले तरी माझ्या आजारपणाचं त्यांना कांहीं सांगायचं नाहीं."

"कठीण आहे."

"तुम्ही शब्द दिला आहे."

एअर-पोर्टकडे मला घेऊन जाणाऱ्या वसची अनाऊंसमेंट होत होती. मी घाई-घाईंत तिचा निरोप घेत म्हटलं, "एक विचारलं तर सांगाल ?"

"सांगेन."

"शहीन ह्या नांवाचा काय अर्थ ?"

"तो तुम्ही शोधून काढा." हात हलवीत ती हंसली.

न कळताच शहीन ह्या नांवाचा अर्थ मला जाणवला होता.

—अच्युत बर्वे



नकोरे ऽऽ दगडू भत्ता वाढवूं नमन करतो ! ("नकोरे कृष्णा रंग फेकूं" या चालीवर)

**अजूनही ती कदाचित खिडकीतून रिकाम्या नजरेनं बाहेर पहात असेल आणि एखादी बाबागाडी पाहिल्यावर स्वतःशींच एखाद्या 'मनस्विनी'प्रमाणें म्हणत असेल, 'मला असलं मूल हवं आहे.'**





# आस्ची

**आस्ची** अकादमींत कशासाठीं आली होती कुणास ठाऊक ? तिचं अभ्यासाकडे मुळींसुद्धां लक्ष नव्हतं.

नॉर्वेच्या अगदीं दक्षिणेला मंडाल नांवाचं एक छोटंसं गांव आहे. तिथली ही मुलगी. एक वर्ष तिनं लंडनला काढलं होतं, म्हणून त्यांतल्या त्यांत तिला चांगलं इंग्रजी येत होतं. अकादमींत आल्यावर पहिल्याच दिवशीं आस्चीची नि माझी गट्टी जमली ती या एकाच कारणामुळें. बाकीच्या मुलांशीं बोलायचं म्हणजे नॉर्वेजियनमधून बोलायला हवं अन् तितकं नॉर्वेजियन मला अद्याप येत नव्हतं.

अकादमी उघडली नि विद्यार्थी कॉलेजांत आले. पहिला तास संपल्यावर मधली तासाभराची सुटी सुरूं झाली. तेवढ्या अवधींत अनेक मुलांनीं आपापल्या गर्लफ्रेंडची निवड करून टाकली. आतां सहा महिन्यांच्या अवधींत यांतून अनेक प्रकरणं उद्भवायचीं होतीं. मी परदेशी म्हणून त्या भानगडींत पडणं शक्य नव्हतं. पण मला आश्चर्य वाटलं तें आस्चीसारख्या मुलीला कुणीच बॉय फ्रेंड मिळूं नये याचं. दिसायला सुंदर नसली तरी शंभरांत उठून दिसेल अशी ती होती. अन् तशी होतीहि ती तल्लख. आस्ची वर्गांत नसली तर चुकल्या चुकल्यासारखं वाटायचं. पण कुठं तरी कांहीं तरी बिनसलं होतं.

त्या तासाभराच्या सुटींत आम्हीं गांवांत फेरफटका करायला निघालों. रस्त्यावर आल्याबरोबर आस्चीनं माझ्या हातांत हात घातला. हा असला प्रकार कधीं आयुष्यांत झाला नव्हता. अशा परिस्थितीत कसं वागायचं हें मला कळत नव्हतं. तिच्या दृष्टीनं अर्थात्‌च ही अगदीं क्षुल्लक बाब होती. या प्रकारानं मी कांहींसा बावरून गेलों आहे हें तिच्या लक्ष्यांत यायला वेळ लागला नाहीं.

'घाबरलात मला ?'

'छट्, कोण म्हणतं. घाबरायचं कशाला तुला ?'

'मग असा काय बावरल्यासारखा भ्याला आहेस ?' यावर मी नुसताच हंसलों.

'हंसायला काय झालं ? सांग ना ?'

'आस्ची, खरं सांगूं ? आमच्या देशांत मुली मुलांच्या हातांत हात घालून चालत नाहींत !

'मग काय करतात त्या ?'

'त्या आपलं अंतर राखून राखून मुलांबरोबर चालत असतात.'

'भारीच चमत्कारिक दिसतोय तुमचा देश !'

'चमत्कारिक म्हण नाहींतर अडाणी म्हण. पण आहे खरं असं.'

'आलं पाहिजे एकदां तुझ्या देशांत ?'

'ये, ना. अवश्य ये.'

सगळचा मुलींना मुलांचे हात धरून चालायला नाहीं लावलं तर नांवाची आस्ची नाहीं मी.'

'जरूर प्रयत्न करून पहा.'

'हो, पण एवढे पैसे कुणाजवळ आहेत ?'

'तुझे वडील इन्कमटॅक्स ऑफिसर आहेत ना ?'

'असले म्हणून काय झालं ?'

'तुमचा देश म्हणजे अमेरिकेखालोखाल श्रीमंत असलेला देश. तशांत तुझे वडील ऑफिसर. . . .'

'आमच्या देशांत वयांत आलेलीं मुलं आई-वडिलांवर अवलंबून रहात नाहींत.'

'मग इथं शिकायला कशी आलीस तूं ?'

'माझ्या स्वतःच्या पैशांवर.'

'कुठून आणलेस ?'

'लंडनला नोकरीला होतें ना मी वर्षभर ?'

'मग तशीच आणखी नोकरी कर नि ये इंडियांत.' चालतां चालतां ती मला अधिकच बिलगली. पण या खेपेला मात्र मी गड-बडलों नाहीं.

ती बोलायचं म्हणून बोलत होती, तिचं लक्ष तिकडे नव्हतं हें सारखं मला जाणवत होतं.

असेच बोलत बोलत आम्हीं पुढं गेलों. वाटेंत एक डिपार्टमेंट स्टोअर लागलं. त्याच्या दाराशीं तीन चार बाबा गाड्या उभ्या होत्या अन् त्यांत अक्षरशः गाजरा-सारखी लालबुंद अन् गुटगुटीत अशीं मुलं खेळत होती. त्यांच्या आया त्यांना तिथंच सोडून आंत खरेदीसाठीं गेल्या होत्या.

माझा हात सोडून आस्ची एकदम पुढं झाली अन् एका मुलाला तिनं उचलून घेतलं. क्षणभर ती त्याचे नुसते पापे घेत राहिली. मग बोबड्या नॉर्वेजि-यनमध्यें ती त्याच्याशीं कांहींतरी बोलली. तें मूल मग खुदकन् हंसलं अन् आस्चीहि अगदीं तशीच निर्व्याज हंसली.

'सदॉऽऽ, मला असलं मूल हवं आहे रे !'

पुन्हां माझ्या अंगाला दरदरून घाम फुटला. पण कसं बसं स्वतःला सांवरीत मी म्हटलं, "मग हेंच घेऊन जा ना !"

'म्हणाच आहेग. त्याची आई येईल कीं पाठोपाठ वडगा घेऊन."

'मग डिपार्टमेंट स्टोअरमध्यें मिळतात का पहा.'

खोट्या रागानं तिनं माझ्याकडे पाहिलं. त्या मुलाचा आणखी एक पापा घेऊन तिनं त्याला अलगद गाडींत ठेवलं नि जातां जातां त्याचा पुन्हां एकदां गालगुच्चा घेत ती म्हणाली, 'मॉडाऽऽ वाऽऽय्. . वाय्. . .'

पुढें एक रेस्तारॉं लागलं.

'आस्ची, कांहीं घ्यायचं काय ?'

'पण पैसे शाळेंतच विसरलें आहे.'

'त्यांत काय आहे ? मी देतों तुझे पैसे.'

'अंहं, या देशांत असं चालत नाहीं. प्रत्येकाचा खर्च प्रत्येकानं करायचा असतो.'

'ठीक आहे, मग माझे पैसे तूं नंतर परत कर.'

'तसं चालेल. एका कॉफीपुरते मला उसने दे तूं.'

कॉफी पितां पितां मी पैसे देण्याच्या विषयावरून मी तिच्याशीं खूप वाद घातला.

'तुम्हीं लोक एवढे सुधारलेले म्हण-वतां, नि असं काय वागतां चमत्कारिक ?'

'यांत चमत्कारिक काय आहे ? कां म्हणून तूं माझ्या कॉफीचे पैसे द्यावेस ?'

'मला वाटतं म्हणून.'

'पण मला तसं वाटत नाहीं त्याचं काय ?'

'तुझ्याकडे कॉफीपुरतेहि पैसे नाहींत म्हणून मी थोडेच देतो आहे ?'

'तें कांहीं नाहीं. प्रत्येकाचे पैसे प्रत्येकानं खर्च केले पाहिजेत.'

'यांत कांहीं गंमत नाहीं बघ, आस्ची.'

'नसली तर नसूं दे. पण तुझे पैसे मी परत करणारच.'

'अन् मी नाहीं परत घेतले तर ?'

'तर तुझी माझी गट्टी फूऽऽ'

अन् पुन्हां एकदां मनापासून हंसली.

कॉफी पिऊन झाल्यावर थोड्या वेळांत ती म्हणाली,

'मला आणखी थोडे पैसे दे.'

'कशाला ?'

'तें तूं कोण विचारणार ?'

'मग देत नाहीं जा. मी काय दुकान काढलंय् की काय कर्ज द्यायला ?'

'दे नॉ रेऽऽ. . मला सिगारेटस् घ्याय-च्यातन्.'

अशी गंमत जंमत करीत आम्हीं तासा भरांत कॉलेजांत परत आलों.

कॉलेजच्या बाहेर आस्ची इतकीं गड-बड करायची कीं सर्वांना अगदीं नकोसं होऊन जायचं. कुणाची टोपीच लपवून ठेव. कुणाच्या टॉप कोटाचा लिलाव जाहीर कर. एखाद्या प्रोफेसराची नक्कल कर. तिचं सारखं कांहींना कांहीं चाल-

[३]

तुम्ह-आम्हांला भेटलेली अवि-मरणीय स्त्री




काढ सखे खिशांतील
तुझे रांधण्याचे हात
पहिल्या ग तारखेला
दिन अजुनी ग सात

लेलं असायचं. पण यांपैकीं कशांतच तिचं मन नाहीं, हें मात्र बारकाईनं पहाणा-ऱ्याच्या लक्ष्यांत आल्याशिवाय रहात नसे.

वर्गांत मात्र ती अगदीं मख्खासारखी बसून असायची. अन् सारखी खिडकींतून बाहेर पहात रहायची. बाकीच्या मुली लेक्चर चालू असतांना निदान कांहींतरी विणीत असायच्या पण आस्ची तेंहि करा-यची नाहीं.

एक दिवस आर्ट ॲप्रिसिएशनचा तास चालू होता. मध्यें लेक्चर संपत आलं तशी प्रोफेसरांनीं विचारलं, 'कुणाला कांहीं विचारायचं आहे ?'

त्याबरोबर भराभर हात वर झाले. आस्वी मात्र तशीच बसून होती.

प्रोफेसरांनीं आस्वीकडे पाहिलं नि विचारलं,

'आस्वी, तुला कांहींच विचारायचं नाहीं ?'

'नाहीं.'

'खरंच तुझ्या मनांत कांहीं प्रश्न निर्माण झालेले नाहींत?'

त्याबरोबर आस्वी एकदम उठून उभी राहिली नि म्हणाली, 'एक विचारूं ?'

'एकच का ? हवे तेवढे विचार.'

'तुम्हीं हें सगळं चुकीचं शिकवीत आहांत असं नाहीं वाटत तुम्हांला ?'

'तें कसं काय ?'

'हा तास आहे चित्रांचं रसग्रहण करायचा. पण तुमच्या व्याख्यानांत त्यासंबंधीं एकहि शब्द नव्हता. नुसता वेगवेगळ्या पंथांचा अभ्यास करून चित्रांचं रसग्रहण थोडंच करतां येणार आहे? चित्रांचं काय पहायचं असतं ते आम्हांला सांगा. चित्र पाहून आनंद कां होतो तें आम्हांला समजावून द्या. . . .'

खूप वादावादी झाली. तो दिवस वर्गात फारसं न बोलणाऱ्या आस्वीनें गाजवला अन् त्या प्रोफेसरांनींहि पुढच्या खेपेपासून आपल्या व्याख्यानांना योग्य दिशा दिली.

आस्वी तशी हुषार होती, पण तिचं लक्षच लागत नव्हतं कशाकडे त्याला कोण काय करणार ?

एक दिवस मी तिला स्पष्टच विचारलं,

'तुला अभ्यास करायचा नाहीं तर आली आहेस तरी कशाला तूं इथं ?'

'दुसरा कांहीं उद्योग नव्हता म्हणून.'

'असं कसं होईल ?'

'कां नाहीं ?'

'तरी पण--'

'खरं सांगूं ? माझ्या आईवडलांना मी एक प्रॉब्लेम होऊन बसली आहे. माझं वागणं चारचौघां मुलांपेक्षां कितीतरी वेगळं आहे. आजवर अनेक मुलांबरोबर ती राजरोस हिंडली आहे. तसं केल्याशिवाय मला करमतच नाहीं. जेवढा थिल्लरपणा करतां येईल तेवढा मी करून घेतला आहे. . . .'

'याचा नि तुझ्या इथं येण्याचा काय संबंध ?'

'त्यामुळं गांवांत प्रत्येकजण माझ्याकडे बोट दाखवतो. आतां तिथंच कुणाशीं लग्न करून स्थिर व्हावं म्हटलं तर तेंहि शक्य नाहीं. माझं कशांतच लक्ष लागत नाहीसं झालं होतं, म्हणून वडील म्हणाले निदान सहा महिने तरी लिलेहायेरला जा.'

भंवतालच्या माणसांच्या कल्पनेप्रमाणें जगायला ती कबूल नव्हती अन् त्यांच्याविरुद्ध उघडपणें बंड पुकारून उठण्याइतकीहि तिच्यांत ताकद नव्हती.

शाळेंत नसली तर ती गांवांतल्या एका विशिष्ट रेस्तॉरॉमध्यें जाऊन बसत असे. तिथं अनेक तरुणांशीं तिच्या ओळखी झाल्या. त्यांच्याबरोबर गप्पा मारीत ती तिथं तासन्तास बसलेली असे. लिलेहायेरपासून जवळच लष्कराचें एक शिक्षणकेंद्र होत. तिथलेहि अनेक कॅडेट्स् आस्वीबरोबर दिसत. रविवारी त्यांच्यापैकीं एकाबरोबर ती सिनेमाला गेली तर जाई. नाहीं तर पहावं तेव्हा ती त्या रेस्तॉरॉमध्येंच असायची.

एक दिवस रात्रीं अकरा साडे अकरा वाजतां मी एका पार्टीहून घरीं परत जात होतों तों वाटेंत आस्वी भेटली. क्षणभर मी तिला ओळखलं नाहीं नि तिनं मला ओळखलं नाहीं. तिच्याशीं बोलायला लागल्यावर माझ्या लक्षांत आलं कीं, ती चिक्कार प्याली आहे. तशीच टॅक्सी बोलावली नि तिला म्हटलं, 'आस्वी, चल मी तुला घरापर्यंत सोडतो.'

क्षणभर ती तशीच गांगरलेल्या अवस्थेंत माझ्याकडे पहात उभी राहिली.

टॅक्सींत बसतांक्षणींच तिनं माझ्या खांद्यावर डोकं टेकलं नि एखाद्या लहान मुलासारखं ती रडूं लागली.

तिच्याशीं बोलण्याच्या अवस्थेंत त्या वेळीं ती नव्हती. तरीहि मी तिला विचारलं, 'आस्वी, हे सगळं चाललंय् काय ?'

कशीबशी ती उत्तरली, 'तें मला कळतं तर कशाला हवं होतं ? खरंच, कशाला हवं होतं ?'

या प्रसंगानंतर फारसे दिवस गेले नसतील. पण या खेपेला मात्र आस्वीनं अगदीं कमाल करून सोडली. कॉलेज सकाळीं आठाला सुरू होई. पण त्याही वेळीं आस्वी वर्गात आली ती बारेमाप पिऊनच. वर्ग सुरू झाल्यावर दहाएक मिनिटं ती डेस्कवर डोकं ठेवून बसली होती. अन् मग ती एकदम उठून उभी राहिली नि मोठ्यामोठ्यानं हंसूं लागली. आजुबाजूला दोनचार मुली होत्या त्यांना गुदगुल्या करूं लागली. अन् चाललंय् काय हें शिक्षकांच्या लक्षांत यायच्या आधींच आपल्या खुर्चीवरची गादी खिडकीबाहेर भिरकावून देऊन ती तडक वर्गाबाहेर निघून गेली.

या प्रकाराची अर्थातच् पुढें योग्य ती चौकशी झाली नि आस्वीलाच समज देऊन सोडून देण्यांत आलं.

या नंतर कॉलेजांत नि गांवांत आस्वीखेरीज दुसरा विषय नव्हता. गांवांतील एका वर्तमानपत्रानं तर चक्क तिचा नि तिच्या दोस्तांचा रेस्तॉरॉमध्यें बसलेला फोटोहि प्रसिद्ध करण्यास कमी केलं नव्हतं पण तिला याचं कांहीं सोयरं सुतक नव्हतं. आपला फोटो असलेलं वर्तमानपत्राचं कात्रण तिनं आपणहून विद्यार्थ्यांसाठीं खास असा एक नोटीसबोर्ड होता त्यावर आणून लावलं !

मधल्या काळांत मी तिच्याशीं बोलायचं सोडूनच दिलं होतं.

एक दिवस मी लायब्ररींत बसलों होतों तिथं ती आली नि म्हणाली, 'मला एक सिगरेट हवीय्.'

मी कांहींच बोललों नाहीं.











'सदॉ, ऐकलंस का ? मला एक—'

मी सिगारेटचं पाकीट तिच्यापुढं सरकवलं.

'अँड लाईट आल्सो.'

मी चकार शब्द न बोलतां काडी शिलगावली.

बराच वेळ ती माझ्याच शेजारच्या खुर्चीवर बसली होती. हातांतली सिगारेट संपल्यावर तिनं एक दोन मासिकं चाळल्यासारखी केली नि माझ्याकडे न पहातांच तिनं विचारलं, 'म्हणजे तूंहि माझ्याशीं बोलायचं नाहीं असं ठरविलंय्स तर !'

मी कांहींच बोललों नाहीं.

'ठीक आहे. नाहीं बोलायचं तर नको बोलूंस.'

ती उठली नि तरातरा निघून गेली.

त्यानंतर चारपांच दिवस ती कॉलेजांतच आली नाहीं. तिच्या रूमगेटपाशीं चौकशी केली तेव्हां कळलं कीं, तिला हॉस्पिटलांत ठेवलं आहे.

संध्याकाळीं कॉलेज सुटल्यावर हॉस्पिटलांत गेलों. मी आलेला तिनं पाहिलं नि मुद्दामच डोक्यावरून पांघरूण ओढून घेतलं.

बराच वेळ मी आपला तसाच बसून होतों.

मग पांघरूणांतून डोकं काढून तिनं हळूंचकन् माझ्याकडे पाहिलं नि क्षणभर हंसल्यासारखं करून ती एकदम गंभीर झाली.

'कसं वाटतंय् आतां, आस्त्री ?'

उत्तर नाहीं.

'आतां बरं वाटतंय् ना ?'

हूं नाही कीं चूं नाहीं.

'आस्त्री—'

'आतां कां ? बोलणार नव्हतास ना माझ्याशीं ?'

मीं तिच्याकडे थोड्या रागानं पाहिल्यासारखं केलं, त्याबरोबर ती एवढ्या मोठमोठ्यानं हंसूं लागली कीं, आजुबाजूच्या खाटेवरचे रोगी नि त्यांना भेटायला आलेली माणसं या साऱ्यांच्याच नजरा आपणाकडे लागून राहिल्या.

'माझ्यासाठीं कांहींच आणलं नाहींस कां ?'

'काय आणायचं ?'

'अरे, हॉस्पिटलांत भेटायला यावं तर फुलंबिलं आणावीत'—

'असं होय ? बरं, पुढच्या खेपेला आणीन.'

'म्हणजे मी काय इथंच कायमची राहीं म्हणतोस कीं काय ? छट्, तें नाहीं आपल्यानं व्हायचं. अरे, अजून माझं लग्न व्हायचंय्. सगळा संसार व्हायचाय्—'

'या हॉस्पिटलांतल्या एखाद्या डॉक्टरशीं लग्न करून टाक ना मग !'

यावर ती नुसतं 'हूं' म्हणाली नि स्वतःशींच मनमोकळेपणानं हंसली.

त्याच आठवड्यांत तिला हॉस्पिटलांतून घरीं जाऊं देण्यांत आलं.

आस्त्री पुन्हां कॉलेजांत येऊं लागली.

पण कॉलेज सुटल्यावर ती आतां त्या रेस्तॉरांमध्यें जात नसे. अनेक वेळां ती हॉस्पिटलच्या बाजूला जातांना दिसे.

म्हणजे खरोखरच ही एखाद्या डॉक्टरच्या प्रेमांत पडलीय् कीं काय ?

खरोखरच म्हणजे काय ? खरोखरच खरं म्हणजे तोच तिच्या प्रेमांत पडला होता.

कुणाहि मुलीला आस्चीच्या या भाग्याचा हेवा करावा असा तो मुलगा होता.

अखेर आस्ची माणसांत आली हें पाहून मला बरं वाटलं.

आतां या दोघांचं लग्न होणार हें आम्हीं गृहितच धरून चाललों होतों.

आस्ची मोठ्या खुषींत होतीच होती. अलीकडे ती मोठी प्रसन्न दिसत होती. नियमित स्विमींगला जायची. नियमित स्केटिंग करायची.

एक दिवस काय झालं ? स्केटिंग करतांना ती घसरून पडली. पडली ती इतक्या जोरांत कीं, तिच्या उजव्या मनगटाचं हाडच फ्रॅक्चर झालं.

आस्ची पुन्हां हॉस्पिटलांत—

पण मोठ्या मजेंत होती. या खेपेला मात्र मी तिच्यासाठीं फुलं घेऊन जायला विसरलों नाहीं.

त्या फुलांचा वास घेऊन तिनं तीं नर्सपाशीं दिलीं नि ती माझ्याकडे पहात म्हणाली, 'सदाँ, मी ग्योर्गशीं लग्न करणार आहे. सांग ना रे होईल का माझं लग्न ?' अन् बोलतां बोलतां तिनं आपला उजवा हात पुढें करायचा प्रयत्न केला.

मी म्हटलं, 'बायकांचा डावा हात पहायचा असतो.' मग बसल्या जागेवरूनच मी किलकिली नजर करून तिचा हात पाहिल्यासारखं केलं नि ठोकून दिलं, 'आस्ची, या वर्षी तुझं लग्न होणारच.'

हें ऐकून तिला बरं वाटलं.

हात बरा झाल्यावर ती कॉलेजमध्यें आली तेव्हां मी तिला म्हटलं, 'आतां पुन्हां केव्हां जाणार आहेस हॉस्पिटलमध्यें ?' तेव्हां दांत ओठ दाबून तिनं केवढ्या जोरानं माझ्या पाठींत गुद्दा मारला होता.

दोन चार दिवसांनीं ती कॉलेजला जातांना वाटेंतच भेटली.

'शनिवारीं रात्रीं काय करणार आहेस तूं ?'

'कां, ग ?'

'तुला सवड असली तर माझ्या घरीं येशील ?'

'कशाला ?'

'ये तर खरा, मग सांगेन.'

अं ऽहं, आत्तां सांग.'

'पार्टी आहे.'

'कसली ? हात बरा झाल्याची ?'

'छट्'.

'मग ?'

'ओळख.'

'सोप्पं आहे.'

'सांग ना मग ?'

'एंगेजमेंट अनाऊन्स करणार असशील.'

'छान. कसं ओळखलंस तूं ?'

'तुझ्या हातावर लिहिलेलं आहे.'

'खरंच.'

'नाहीं, खोटं.'

'मग येशील ना ?'

'अलबत्'

शनिवारीं ठरल्यावेळीं आस्चीच्या घरीं गेलों. आपली छोटीशीच खोली तिनं छान सजवली होती. टेबलांवर मद्याच्या बाटल्या, फ्लावरपॉट्स्, केक्सच्या प्लेटस्, सगळं कांहीं अगदीं छान रचून ठेवलं होतं. भिंतीवर माझीं पेंटिंग्ज होतीं. हळूं हळूं तिचे मित्र नि मैत्रिणी येऊं लागल्या. गप्पांना रंग चढूं लागला. आस्ची नव्या नवरीसारखी सजली होती. आजच्या इतकी खुषींत अर्थातच ती कधीं दिसली नव्हती. आज तिचा वाङ्‌निश्चय होता. फ्लर्ट म्हणून उभ्या गांवांत कुप्रसिद्ध असलेली आस्ची आणखी थोड्याच दिवसांत आपल्या संसाराला लागणार होती. शीड नसलेली होडी अखेर योग्य दिशेला चालूं लागली होती.

पण तास झाला, दोन तास झाले तरी नव्या मुलाचाच पत्ता नव्हता. आम्हीं सगळे काळजींतच पडलों. आस्ची वर लँडलेडीकडे गेली. तिनं त्याच्या घरीं फोन केला, पण तो तिथं नव्हता. हॉस्पिटलांतहि नव्हता. अनेक ठिकाणीं फोन करून तिनं चौकशी केली, पण कांहीं उपयोग झाला नाहीं.

आम्हीं सर्वजण मोठ्या विचित्र पेंचप्रसंगांत सांपडलों होतों. आस्चीच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा वहात होत्या.

काय झालं असेल ? एखादी इमर्जन्सी केस तर आली नसेल ? पण तसं असतं तर तो हॉस्पिटलांत कसा नाहीं ? येतांना वाटेंत कांहीं अपघात विपघात ? पण तसं असतं तर पोलीसस्टेशनकडे कशी कांहींच बातमी नाहीं ?

दहा....अकरा....बारा...अखेर एकाचा टोला पडला.

थांबायचं तरी किती वेळ ? पार्टीचा तर फज्जाच उडाला होता. उगळा थाटमाट तसाच जागच्या जागीं होता.

अखेर आस्चीला कसाबसा धीर देण्याचा प्रयत्न करून आम्हीं तिचा निरोप घेतला. तिची एक मैत्रीण मात्र सोबतीला तिच्यापाशींच राहिली. आस्ची अवाक् होऊन एखाद्या पुतळ्यासारखी बसून होती. तिची नजर थिजली होती. चेहरा पांढराफटफटीत पडला होता.

आस्चीची मैत्रीण आम्हांला निरोप द्यायला दारापाशीं आली. तिनं दार उघडलं तर बाहेरच्या कडीला एक पाकीट लावलेलं होतं. तिनं झटकन् तें पाकीट उचलून घेतलं. वर लिहिलं होतं: To my darling Aschie—from Georg. क्षणभर ती विचारांत पडली. हें पत्र असंच्या असंच आस्चीला द्यावं कीं, आधीं

(पृष्ठ ७४ वर पहा)

अनुक्रमणिका

ती पॅरिसची 'मुक्ता' मला इंग्लंडला एका गाडींत भेटली. तिनें असामान्य स्नेह दिला. निरोप घेतांना मी तिचा पत्ता मागितला. तिनें लिहिले,

Bernie Shreymond
Paris XI



# बर्नी श्रेमाँ

या विषयावर लिहिणं सोपं नाहीं. म्हणजे परदेशांत मला कोणीच अविस्मरणीय स्त्री भेटली नाहीं, असे नव्हे. पण अनेक भेटल्या. किंवहुना, एकंदरीत स्त्री हा प्रकारच थोडाबहुत अविस्मरणीय आहे. मला परदेशांत भेटलेल्या कांहीं स्त्रियांविषयीं मी पूर्वी कुठें ना कुठें लिहिलें आहे. एकीबद्दल अजून लिहिलं नव्हतं. तें आज लिहीत आहे.

डिसेंबरचा महिना होता. लंडन शहरांत खूपच थंडी होती. पाऊस झिरपत होता. अधून मधून बर्फ पडत होतं. नाताळच्या जल्लोशाला अजून पंधरावीस दिवस अवकाश होता. अशा समयीं मला 'ब्रिटिश कौन्सिल' या सरकारी सांस्कृतिक संस्थेचं एक पत्र आलं. १२ डिसेंबरला सायंकाळीं 'राऊंड टेबल' या संस्थेनं कांहीं परराष्ट्रीय विद्यार्थ्यांना पार्टीला बोलावलं आहे. त्या पार्टीला जायला तुम्हाला आवडेल कां ?' मी लगेच 'होय' म्हणून कळवलं. दोन दिवसांतच मला बुलविचच्या 'राऊंड टेबल'कडून आग्रहाचं निमंत्रण आलं. त्यांत लंडनच्या कोणत्या ठिकाणावरून किती वाजतां आगगाडी निघते आणि ती त्या गांवीं केव्हां पोहोंचते याचा तपशील दिलेलं परिपत्रक होतं. त्यांत 'राऊंड टेबल'ची थोडी माहिती आणि त्या ठिकाणची दिशाहि दिली होती. शिवाय स्टेशनवर आम्हाला उतरून घ्यायला कोणीतरी येईल असं म्हटलं होतं.

संध्याकाळीं पांचला व्हिक्टोरिया स्टेशनवरून गाडी सुटणार होती. मी पंधरा मिनिटं आधीं गेलों. मी असा विचार केला कीं, माझ्या प्रमाणंच लंडनमधल्या आणखी पंचवीस तीस विद्यार्थ्यांना अशींच निमंत्रणं गेलीं असणार. हे विद्यार्थी मात्र गाडीला असणार. त्यांत सहाजिकच कांहीं मुलीहि असणार. मग अशी एखादी मुलगी हेरून तिच्याशीं ओळख काढायला काय हरकत आहे—म्हणजे माझ्या हरकतीचा प्रश्न नव्हताच. पण तीचीहि हरकत असणार नाहीं. परदेशांत असं चालतंच. अर्ध्या पाऊण तासाचा प्रवास होता. त्यांत तेवढीच चांगली संगत मिळेल, म्हणून मी प्लॅटफॉर्मवर एका टोकापासून चालूं लागलों. त्याच गांवीं त्याच कार्यक्रमाला जाणारी मुलगी शोधणें कठीण नव्हतें. कारण अशी मुलगी त्या स्थलकालाच्या सूचना देणारें परिपत्रक वाचीत बसली असण्याची सहजच शक्यता होती.

मी दोन डब्यांचें निरीक्षण करून तिसऱ्या डब्याकडे पाहातों तोंच बंद कांचेच्या मागें अशी एक तरुणी दिसली. ती तेंच परिपत्रक न्याहाळीत होती. मी क्षणभर थांबलों. पातळ अंगकाठीची, लांबट चेहऱ्याची ती सुस्वरुप युवती खास आपल्याच मार्गानें येणार अशी माझी खात्री झाली. मी त्याच डब्यांत शिरलों आणि तिच्या समोरच्या बाकावर खिडकीजवळ बसलों. अंगावरचा ओव्हरकोट काढून मी वरच्या जाळीवर ठेवला आणि खिशांतले परिपत्रक काढलें. ती माझ्याकडेच पाहात होती. पण ती आपल्या गांवची आहे अशी खात्री असूनहि आपण त्या गांवचे नाहीं असा भास मी निर्माण करीत होतों. ती त्या डब्यांत नाहींच असें भासवून मी परिपत्रक वाचूं लागलों.

तेवढ्यांत तीच म्हणाली, "माफ करा, पण आपण ब्रिटिश कौन्सिल तर्फे बुलविचला' जात आहांत काय ?"

'मी म्हटले, "होय. आपणहि—"

"होय. मीहि त्याच कार्यक्रमाला चाललें आहे. आपण एकाच डब्यांत यावं हा किती छान योगायोग आहे, नाहीं ?"

त्या 'योगायोगा'मागचे माझे परिश्रम तिला समजून सांगण्याच्या उपद्व्यापांत मी पडलों नाहीं. पण वरकरणीं मी म्हटलें, "मी मोठा भाग्यवान खराच. तुमचा देश ?"

"मी फ्रान्सची. पॅरिसहून इथं आलें. मी इंग्रजी भाषेचा अभ्यासक्रम पूर्ण करतें आहे. तुम्हीं ?"

मी माझा देश, वृत्तव्यवसायाचा वर्ग यांची त्रोटक माहिती दिली. नांवहि सांगितलं. तिचं नांव अगदीच अनपेक्षित, कधीं न ऐकलेलं. असं होतं – वनिए श्रेयमांद. ती खूप बोलकी होती आणि अतिशय हुषार होती. तिचा मनमोकळेपणा कोणालाहि भुरळ घालणारा होता. परिचय झाल्यापासून पांच सात मिनिटांतच ती म्हणाली, "तुम्हीं तिकडे कशाला बसलात ? इथें या ना माझ्याजवळ. एकदां गाडी सुरू झाली कीं, आपल्याला एकमेकांचं बोलणं ऐकूं यायचं नाहीं."

मी पडत्या फळाची आज्ञा घेतली. गाडी सुरू झाली. वनिए बोलतच होती. लंडनची हवा, ब्रिटिशांचा घुमेपणा, फ्रेंच लोकांचा घडवडीत स्वभाव, लंडन शहराचा अंतर्बाह्य काळपटपणा, पॅरिसचं आल्हाददायक उघडेपण, अशा अनेक विषयांवर ती बोलत होती. फ्रेंच स्त्रियांच्याबद्दल बोलतांना ती म्हणाली, "फ्रान्सच्या आणि विशेषतः पॅरिसच्या स्त्रियांच्या बद्दल जगांत खूपच गैरसमज आहेत. पॅरिस म्हटलं कीं, त्यांना नाईट क्लब आठवतात. पण फ्रेंच स्त्रिया तशा कांहीं नसतात हं. आतां हेंच पाहा ना. आम्हा फ्रेंच लोकांपैकीं बहुतेकजण रोमन कॅथॉलिक आहेत. आणि कॅथलिक्स हे नीतिनियमां-बद्दल विशेष दक्ष आहेत, हें तरी तुम्हाला मान्य आहे ना ?"

फ्रेंच स्त्रियांची नीतिदक्षता मी मोठ्या नाइलाजानें मान्य केली.

अशा गप्पा वाढतां वाढतां स्टेशन आलं आणि आम्ही दोघंहि लगबगीनें आपआपले ओव्हरकोट सांवरीत खालीं उतरलों. सुरु-वातीची चार मिनिटं गोंधळाचीच गेली. त्यावेळीं पावणेसहाचा सुमार असला, तरी लंडनच्या हिशेवानं अंधार केव्हांच पडला होता. स्टेशनवरच्या विरळ दिव्यांच्या अस्पष्ट उजेडांत आम्हाला उतरून घ्यायला आलेले लोक आम्हांला दिसत नव्हते. अनेक उतारू उतरले होते. त्यांतून त्या सायंकाळच्या कार्यक्रमाचे उतारू ओळखणें कठीण होतें. पण थोड्याच वेळांत इतर उतारू स्टेशन बाहेर गेले आणि उरले फक्त विद्यार्थी, विद्यार्थिनी आणि आम्हांला उतरून घ्यायला आलेले 'राऊंड टेबल'चे प्रतिनिधि. हळू हळू एकमेकांची ओळख पटली. त्या कार्यक्रमाला चांगले तीस पस्तीस विद्यार्थी-विद्यार्थिनी आल्या होत्या. वीस एक विद्यार्थी, बाकीच्या मुली. आम्ही सर्वजण स्टेशनच्या वेटिंगरूममध्यें जमलों. थंडी 'मी' म्हणत होती. आम्ही ओव्हरकोट अंगाभोंवतीं घट्ट लपेटलेले होते. श्रेयमांद माझ्याजवळच होती. सर्वांनीं आपली ओळख करून दिली. निदान पंधरा तरी

**रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग**

(तुकावाणी एकदम खूप)

रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग।
काव्यांत यमक जोडताना॥
पाडताना काव्य फार होती कष्ट।
जोडूं ट ला ट आणि री ला री॥
कवि म्हणे काळ्या शाईच्या बळे।
कागदाचें काळें केले तोंड॥



देशाचे आम्ही विद्यार्थी होतों. इटली, फ्रान्स, हॉलंड, पोर्तुगाल, भारत, पाकिस्तान, घाना, वेस्ट इंडीज, द. आफ्रिका, सिलोन, ग्रीस, असे अनेक.

पार्टीचं ठिकाण जवळच होतं. आम्ही सारीजण चालतच निघालों. आतां बर्फ हळुं हळुं पडायला लागलं होतं. कापसाचे बारीक गोळे तरंगत यावेत, तसं तें वाऱ्यानं वहात अंगावर, रस्त्यावर, झाडांवर, घरावर स्थिरावत होतं. रस्त्यानं जातां जातां वनिएनं आपण होऊन माझा हात हातांत घेतला आणि अनेक वर्षांच्या निकटच्या मैत्रिणी-सारखी ती माझ्याबरोबर चालूं लागली. तें छोटं, टुमदार, शांत गांव तिला आवडलं असं ती सांगत होती नि मी तिच्याशीं सहमत होत होतों.

पार्टीचा बेत एका शाळेच्या प्रशस्त सभागृहांत ठेवला होता. त्या इमारतींत शिरल्यावर खूप उबदार नि बरं वाटलं. तिथं 'राउंड टेबल'चे दहा बारा सभासद आमचं स्वागत करायला हजर होते. आम्ही आमचे ओव्हरकोट काढले आणि त्यांच्याशीं हस्तांदोलन करून, आमची ओळख करून दिली. सभागृहांत गेल्याबरोबर आधीं अध्यक्षांनीं आपली ओळख करून दिली आणि सँडविच, केक्स्, गरम कॉफी यांचा अल्पोपहार दिला. तो चालू असतांना आम्ही विद्यार्थी, विद्यार्थिनी, यजमान एकमेकांत मिसळून ओळखी करून देत होतों. मग खेळ सुरू झाले. कांहीं खेळांत पार्टनर लागत. वनिए माझी पार्टनर होती.

कसला तरी बसचा खेळ होता. बसमधल्या बाकाप्रमाणं दोन दोन अशा खुर्च्या मांडल्या होत्या. एक पुरुष नि एक स्त्री यांनीं बसायचं. जागेपेक्षां उतारू अधिक. कुणी उतरलं कीं, पटकन ती रिकामी जागा दुसऱ्या जोडप्यानं पकडायची. म्युझिकल चेअर्ससारखाच. पण या खेळांत दोघांनीं एकदम धांवायला हवं होतं. असेच आणखीं खेळ झाले. मग नृत्य झालं. त्यांतहि ती माझी भागीदार होती. पुनः खाणं-पिणं झालं. यावेळीं मद्य देण्यांत आलं. आम्ही खेळानं नि नृत्यानं दमून गेल्यावर रुचीनं तें सेवन केलं. वनिए नृत्यांत अगदीं दंग होऊन जायची. तिची अंगकाठी मोहक, पण पातळ. तिला टँगो सारख्या नृत्यांत अगदीं द्रुतगतीनं हालचाली करतां येत. तिच्या बरोबर गति ठेवतांना माझी दमछाक होई. पण ती प्रेमळ उत्तेजन देई. कधीं आपली गति कमी करी. 'स्लो वॉल्ट्झ'सारख्या नृत्यांत अगदीं जवळ

येई, ती निःसंकोचपण, कुठलीहि भीड न धरतां आणि मर्यादा न सोडतां. कांहीं कांहीं स्त्रियांना हें कसब साधलेलं असतं. पुरुषाशीं अगदीं मनमोकळेपणानं वागायचं नि तरीहि स्वैरपणाचा वास लागूं द्यायचा नाहीं. तशी ती होती. शेवटल्या नृत्याच्या वेळीं दिवे मंद केले गेले. तेव्हां तर ती मला म्हणाली, "गो अहेड. किस् मी." लाजूं नका, माझं चुंबन घ्या असा आग्रह एखाद्या सुंदर ललनेनं धरल्यावर आपल्यासारखे आज्ञाधारक पुरुष तरी आणखी काय बोलणार ? तिथं शब्द संपून सारा मुक्याचा व्यवहार सुरू होतो.

रात्रीं अकरापर्यंत, नृत्य, गायन, खेळ असा जल्लोश चालला होता. एवढा वेळ कसा गेला हें कळलंहि-नाहीं. ओठावर अजून लिप्स्टिक रंगाळली नसती, तर तें सारं स्वप्नांतच पाहिलं असं वाटलं असतं. रेडिओग्रॅमवरचं संगीत संपलं, नृत्याची लय थांबली, दिवे स्पष्ट होऊं लागले आणि टाळ्यांच्या कडकडाटांत पार्टी संपल्याची दवंडी दिली गेली. उभयपक्षीं आभार प्रदर्शन झालं आणि बर्निएला हाताला धरून मी इतर सर्वांच्या बरोबर स्टेशनकडे जाण्यासाठीं म्हणून शाळेच्या इमारतीबाहेर पडलों.

बाहेर पडलों तों काय, अगदीं स्वर्गातच पाऊल ठेवल्यासारखं वाटलं. शिशिरांत अतिशय दुर्मिळ असणारा चंद्र आकाशांत चमकत होता. सारं गांव झोंपलं होतं. मध्यापासून हळु हळु अवतरणाऱ्या वर्फानं सारा आसमंत पांढरा शुभ्र केला होता. रस्त्यावर पायघड्या घातल्यासारखा मऊ मऊ वर्फ पसरला होता. झाडांवरून पांढऱ्या वर्फाचे लपके अधून मधून पडत. रस्त्यावर एकहि माणूस दिसत नव्हता कीं. वाहन दिसत नव्हतं. नवीन वसवलेल्या गांवांत आम्ही पहिलेच रहिवासी जातों आहोंत असं आम्हाला त्यावेळीं वाटलं. त्या दृश्यांत एक प्रकारची धुंदी होती. ती आम्ही आकंठ प्यालों होतों. चंद्रावर उतरणाऱ्या पहिल्या मानवाला काय वाटेल, याचा थोडासा अनुभव त्यावेळीं आम्हाला येत होता. समोर चंद्र होता, वर्फाच्या पायघड्या होत्या, अंगांत वारुणी आणि रग होती– हातांत एक प्रमत्त ललना होती. माणसाला आणखी काय हवं असतं ?

रात्रीं साडेअकराला लंडनला जाणारी आगगाडी त्यावर वर्फाचे ढीग घेऊन हळू हळू आली. आम्ही कडाडणाऱ्या थंडींतून तिच्या उबदार पोटांत शिरलों. माझ्या शेजारी बर्निए अगदी खेटून बसली होती. पण आमच्या डब्यांत नव्यानेंच ओळखीचे झालेले आणखी दोन-तीन विद्यार्थी नि दोन मुलीं होत्या. त्यामुळं आम्हा दोघांना वेगळ्या किंवा खाजगी गप्पा मारतां आल्या नाहींत. तरी आम्हीं सर्वांनीं मिळून हंसत खेळत तो लहानसा प्रवास मजेत केला.

व्हिक्टोरिया स्टेशनवर आम्हीं उतरलों. मी आणि बर्निएनं बाकी सर्वांचा निरोप घेतला. अवघ्या तीन चार तासांत आमची इतकी गाढ मैत्री झाली होती कीं, एक दोन तपांची मैत्री असलेल्या स्त्री-पुरुषांनाहि आमचा हेवा वाटावा.

मी तिला म्हटलं, "अग, तुझा लंडनमधला पत्ता दे ना. पुनः जरूर भेटूं या आपण."

"नाहीं" ती निश्चयानं म्हणाली, "मी पत्ता देणार नाहीं. पुनः भेटायचंहि नाहीं."

मला तिनं धक्काच दिला. इतक्या परिचयानंतर वारंवार भेटणं, फिरायला जाणं, सिनेमाला जाणं हें परदेशांत साहजिक असतं. मी विचारलं, "कां ?"

ती म्हणाली, "तुम्ही गैरसमज करून घेऊं नका. तुमची संगत मला आवडते. पण ही एका संध्याकाळचीच गंमत समजा."

"पण कां ?"

"आतां मात्र ती गंभीर होण्याऐवजीं हंसली. मोठ्या माणसांचे प्रश्न लहान मुलांना समजून सांगणं अवघड असतं, असा भाव तिच्या चेहऱ्यावर होता. ती म्हणाली, "कां म्हणजे काय ? मला लंडनमधले मित्र नि भावनांची गुंतागुंत वाढवायची नाहीं, एवढं एक कारण पुरेसं नाहीं कां ? आजची एक संध्याकाळ मजेत घालवायची एवढाच माझा उद्देश होता. तो तुमच्यामुळं अपेक्षेबाहेर यशस्वी झाला. मी तुमची त्याबद्दल खरोखरच कृतज्ञ आहे. पण बस्, त्यापुढं मला जायचं नाहीं. स्त्रीमुळं जो आनंद मिळतो, तो तेवढ्या पुरताच ठेवावा, हें पुरुषांना कळावं, हें त्यांच्याहि फायद्याचं नाहीं कां ?"

तिचं म्हणणं खरं होतं. मग मी मुळीच ओढून धरलं नाहीं. तिच्या सुसंगतीबद्दल मी तिचे मनःपूर्वक आभार मानले. मग मी तिला म्हटलं, "तुझा लंडनचा पत्ता राहूं दे. पण पॅरिसचा तर देशील ?"

ती हंसून म्हणाली, "हो देईन. पण त्या पत्त्यावर मला तिथं शोधून काढण्याचं काम तुमचं !"

मी रुकार दिला. माझी डायरी नि पेन पुढं केलं. तिनं पत्ता लिहिला: तिच्या अक्षरांतला तोच पत्ता खालीं देत आहे.

Bernie Shreymond Paris XI

तो पाहिल्यावर तिचा खोडकरपणा माझ्या चटकन् लक्षात आला. मीहि हंसून म्हटलं, "हात्तिच्या ! इतका स्पष्ट पत्ता असल्यावर मी तुला सहज शोधून काढीन !" त्या तटपुंज्या पत्त्यावर तिला भेटणं सर्वस्वी अशक्य होतें हें आम्ही दोघांनीहि ओळखलें होतें. मग ती घड्याळाकडे पहात म्हणाली, "बरं, आतां मला गेलं पाहिजे." तिनं पुढें केलेला हात मी हातांत घेतला. हस्तांदोलन केलं. पण तीच म्हणाली, "तुम्हाला निरोपच घ्यायचा, तर तुम्ही माझ्या गालाचं चुंबन घेऊं शकतां." मी आज्ञापालन केलं. मग ती स्टेशनमधून बससाठीं गेली. अगदीं प्रसन्नपणें, कसलाहि कडवटपणा मनांत न ठेवतां.

मला वाटलं, ती म्हणत होती, त्यांत बरंच तात्पर्य आहे. जगांत अनेक स्त्रिया असतात. अनेक प्रकारच्या असतात. त्यांच्या सुखाच्या कल्पना वेगळ्या असतात. पुरुषांनीं आपल्याच सुखाच्या कल्पना त्यांच्यावर कां लादाव्यात ? जी स्त्री मनमोकळेपणानं आपल्याशीं मैत्री करूं इच्छिते, तिला पुरुषाच्या जवळिकींत अखेर-पर्यंत जायचं आहे, असं तरी पुरुषांनीं कां गृहित धरावं ? कांहीं सुखं कुठं संपतात हें ओळखायला शिकलं पाहिजे आणि तीं संपल्यावर चटकन् त्यांचा हव्यास सोडायलाहि शिकलं पाहिजे. आपल्या अपेक्षेचं अनावश्यक शेंपूट त्यांना लावीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. प्रत्येक स्त्री हें एक काव्य आहे. कांहीं काव्य एकदोन ओळींत संपतील, तर कांहीं दीर्घकाव्य असतील.

कधीं तरी कुठे तरी वाचलेल्या ओळी मला आठवतात,

There are many relations between a man and a woman.

स्त्री आणि पुरुष-यांच्यांत अनेक प्रकारचे संबंध असतात. आपला प्रकार कोणता आणि तो कुठं संपतो हें जाणण्याचं चातुर्य ज्याचं त्यानं दाखवावं.

त्या विलक्षण रात्रीं मला कांहीं तास अनुपम आनंद देणाऱ्या त्या पॅरिसच्या परीचं हस्ताक्षर माझ्या वहींत अद्याप आहे. पण मला वाटतं, त्यापेक्षां बरंच अधिक ती मला देऊन गेली आहे.

–रमेश मंत्री



अनुक्रमणिका

सत्तर वर्षांचा जोडीदार
प्रवासाला गेलाय् त्यामुळें
माझी मोठी-पंचाइत झालीय्,
मी पटकन मेले तर
कुणी कळवायला तर पाहिजे—
शिवाय माझी ही चिमणी
बाळें.....

# ओसरीत




**कोण्या** एकेकाळीं एका आटपाट नगरांत एक म्हातारी रहात होती अशी सुरुवात बरी वाटते. पण वर्तमान काळांत न्यूयॉर्क शहरांत एक म्हातारी रहात होती अशी सुरुवात मनाला खटकते. न्यूयॉर्कसारखें जगांतलें संपन्न, सर्वांत मोठें आणि अत्याधुनिक शहर. या वेड लावणाऱ्या नगरींत एक म्हातारी रहात होती हें कसेंसेंच वाटतें. पण त्याला काय कुणाचा इलाज ? मरेपर्यंत जगायचें म्हटलें कीं, म्हातारा असणार, आणि म्हातारी तर असणारच !

वास्तविक चांगल्या तरण्याताठ्या सोडून म्हातारीवर नज़र ठेवायला माझें अजून तसें वय झालेलें नाहीं. तरीहि या म्हातारीकडे माझें लक्ष गेलें. इतकेंच नव्हे, तर आतां मला तिला (तिला मला नव्हे!) विसरणें सुद्धां कठीण आहे.

तसें पहातां तिच्याकडे मुळांत माझें लक्ष गेलेंहि नसतें. न्यूयॉर्कच्या गजबजलेल्या रस्त्यांत पावलोंपावलीं किती तरी तऱ्हेचीं माणसें दिसतात. लहान मुलें, तरुण-तरुणी, म्हातारे-म्हाताऱ्या सुद्धां ! पण ही म्हातारी मनांत ठसून राहिली.

माझ्या हॉटेलकडे जायच्या रस्त्यावर एका मोठ्या इमारतींतल्या तळमजल्यावरील खोलींत ती रहात होती. रस्त्याकडील खिडकींत ती खुर्चीवर बसलेली असायची. केवढी जख्खड म्हातारी! नव्वदीच्या आसपास! (बोलून चालून म्हातारीच, फार तर आठ दहा वर्षं इथं तिथं!) खिडकींत तिचा चेहराच तेवढा दिसायचा. तो पहिल्या प्रथम मला दिसला तेव्हां पूर्वीं कधीं तरी वाचलेल्या इंग्रजी कवितेंतल्या दोन ओळी मनांत आल्या—

Her eyes are gleaming fish
Caught in her nervous face,
as if in a net.

ती मनांत ठसायला कवितेच्या या ओळी सुद्धां कारणीभूत झाल्या असतील. पण ती खास लक्षांत भरायला आणखी एक कारण झालें असावें. न्यूयॉर्क शहरांत ती रहात होती. पण तेथील गजबजलेल्या वस्तीचा, भरगच्च रस्त्यांचा तिला कसलाहि लागाबांधा नव्हता. खिडकींत टांगलेल्या तारेच्या एका पिंजऱ्यांत इवल्याशा रंगीबेरंगी चिमण्या होत्या. त्या चिटुकल्या चिमण्यांकडे एकाग्रतेनें बघत ती त्यांना आपल्या थरथरत्या हातांनीं दाणे घालत होती. हाताच्या पिशव्या लोंबत होत्या. हात थरथरत होता. तरी चिमटींत एकेक दाणा धरून ती हात वर करत होती. पक्षीणीनेंच चोंचींत दाणा धरल्यासारखी. आणि त्या सगळ्या चिमण्या आपल्या चिमुकल्या चोंची उघडून धडपडत होत्या. तिचा हात थरथरत असल्यामुळें दाणा नेमका कुणाच्या चोंचींत पडेल अशी शक्यता नव्हती. दाणा खालीं पडत होता.





अनुक्रमणिका

आणि चिमण्या त्यावर तुटून पडत होत्या. तें पहातां पहातां ती हंसत होती. जणुं ती हंसावी म्हणून, तिला वार्धक्याचा विसर पडावा म्हणून त्या चिमण्या नाचत होत्या !

तें सारें दृश्यच मला मोठें गंमतीचे वाटले. फूटपाथ आणि ती इमारत यांच्या मघोमध उम्या लोखंडी सळयांचें कुंपण होतें. त्या सळया धरून मी क्षणभर तिथं उभा राहिलो. पण तिचें लक्ष चिमण्यांवरच होतें. तें माझ्याकडे असावें अशी अर्थातच माझी अपेक्षा नव्हती. मी आणखी थोडा वेळ तिथें तसाच उभा राहिलो असतो. पण न्यूयॉर्कच्या रस्त्यावरील त्या गडवडींत असें उभे रहाणें मला सुद्धां अपराधीपणाचें वाटले. शिवाय कशी कोण जाणें, त्याच वेळीं मनांत एक कल्पना आली. जुन्या प्रेमकथांतल्या नायकासारखा खिडकीबाहेर मी गिटार छेडीत उभा आहे, आणि खिडकींत.......असो ! त्या दिवशीं तरी मी हातरुमालानें तोंड पुसत पळ काढला.

रात्रीं परत हॉटेलकडे वळलो तेव्हां सुद्धां तेंच दृश्य. दुसरे दिवशीं तेंच. तिसऱ्या दिवशींहि तेंच !

एकदां तें दृश्य बघत उभा होतो. आणि एकदम तिचे माझ्याकडे लक्ष गेले. मी तिला टक लावून पहातो आहे हें तिच्या लक्षांत आले. तिनें माझ्याकडे पहातांच मी क्षणभर बावरलो. पण क्षणभरच !— असेल परस्त्री ! पण म्हातारी आहे ! मग मला धीर आला. तेवढयांत ती हंसली (अर्थात हा प्रेमांत पाडण्याचा डाव नव्हता !) मीहि हंसलो. पण तेवढेंच !

दुसरे दिवशीं रविवार होता. कांहीं काम नव्हते. आंघोळ करून आणि न्याहारी खाऊन ताजातवाना झालो. आणि त्या म्हातारीकडे निघालो. पण त्यासाठीं ताजातवाना झालो. नव्हतो म्हातारी तशीच खिडकींत बसली होती. मी कुंपणाच्या सळया हातांत धरल्या आणि उभा राहिलो. तिचें लक्ष नव्हते. मी त्या चिमण्या बाळांच्या सुकुमार पंखांवरून हळुवार हात फिरवीत होती. मग थोडासा खोकला. पण छे ! तीच जणुं पंख लावून उडत होती. तेवढयांत तिचें लक्ष गेले. ती हंसली. अभिवादनासाठीं तिनें मान हालवली.

"कम् ऑन् माय सन्—"

सन् ! हिचा सन् व्हायला म्हणजे साठी तरी उलटायला हवी.

तरी सुद्धां आंत गेलो.

फक्त दोन खोल्या होत्या. एक बसायची दुसरी स्वैपाकाची. बसायच्या खोलींत दैन्य होतें. तें त्या श्रीमंतींत बुडलेल्या शहरांत चमत्कारिक वाटले.

[४]

तुम्हा-आम्हांला भेटलेली अविस्मरणीय स्त्री



**चित्र-चंद्रिका**
**किंवा**
**निर्लज्जिका**

**मुळीं नाहीं ग मुळीं नाहीं**
**आम्हांला लाजच बाई**
**कीर्ति दाटली चोहींकडे**
**घटस्फोट शत झाले गडे**

खोलींत पाय ठेवतांच तिनें हस्तांदोलन केले. हात बर्फासारखे गार होते. मी कांहीं तरी औपचारिक बोललो. काय नेमकें तें आतां आठवत नाहीं. पण ती एकदम रागीट चेहरा करून गंभीर आवाजांत म्हणाली,

"कांहीं बोलण्याची आवश्यकता नाहीं. आय् डोण्ट लिसन् टू एनीवन्. मी कुणाचंहि ऐकून घेत नाहीं !"

हें ती कुणाला सांगते आहे तें कळेना. पण खोलींत आणखी कुणी नव्हतें. मी खोलींत पाय ठेवतांच तिनें माझी अशी संभावना करावी याचें नवल वाटलें.

"बिकॉज आय् ॲम डेफ् ! मी ठार बहिरी आहे !"

ती एकदम बांध फुटल्यासारखी खो खो हंसली.

वयाच्या नव्वदाव्या वर्षी या कॅथरीननें हा अभिनय आणि हा विनोद करावा याचेंच मला मोठें कौतुक वाटलें.

मग तिनें एक मोठा काळा फळा माझ्यापुढें ठेवला. आणि हाती खडू देऊन मला जवळ जवळ लेखी परीक्षेलाच बसवलें. मी लिहायचें आणि तिनें बोलायचें. तशांत माझें हस्ताक्षर ! त्यामुळें आमचा संवाद रंगेल अशी शक्यता नव्हती. पण आलेल्या अनोळखी पाहुण्यांना साधारणपणें काय विचारायचे असते याची तिला संवयीनें कल्पना असावी. कारण ती एकतर्फी बडबड करीत स्वतःची बरीचशी माहिती देत होती. मी फक्त 'आय् सी-' हें 'अस्सें !' या धर्तीवर म्हणत होतो. पण पुढें तेंहि उपडी घड्यावर पडते आहे हें लक्षांत येतांच मी फक्त मुंडी हालवूं लागलो. तिचीहि मुंडी हालतच होती. पण माझी वर खालीं ! तिची दुशीकडे !

"मी तीन महायुद्धें पाहिलीं आहेत !" असें ती गुर्मीनें म्हणाली. पण इथें तिच्या स्मृतीनें दगा दिला असावा. तिनें दोनच महायुद्धें पाहिलीं असावींत ! तिसरें कुठलें ! (कीं १७७४ मधलें अमेरिकेचें स्वातंत्र्ययुद्ध सुद्धां तिनें पाहिले होते ?)

ती अविवाहित होती. तिला लग्न करायचे होते. तशी ती तरुणपणीं सुंदर दिसली असावी. पण लग्न मात्र झाले नाहीं.

"कां?" मी प्रश्न विचारला.

मी तिला असे एकेक शब्दाचेच प्रश्न विचारीत होतो. कारण मोठे प्रश्न विचारायचे म्हणजे लिहायचें कोणी ? लिहायलाहि तशी हरकत नव्हती. पण अक्षर लागलें नाहीं कीं, ती म्हणायची, "वॉट इज इट्? प्लीज राइट इट अगेन-" जणुं कांहीं मास्तरीणच ! (तिच्या संगतींत असे आठ दिवस जाते तर कदाचित माझें हस्ताक्षर सुधारतें !) त्यामुळें तरुणपणीं ती मास्तरीण होती कीं काय असा मला संशय आला. पण तो चुकला: तिनें निरनिराळ्या सरकारी कचेऱ्यांत कारकुनी

अनुक्रमणिका














अनुक्रमणिका

क़ेली होती, आणि त्याच पेन्शनीवर आतां जगत होती.

"कान जाऊनहि . . . . ." नोकरी केली असें मला लिहायचें होतें. पण पुढें लिहावेंच लागलें नाहीं. मला काय विचारायचें होतें तीं तिच्या आधींच लक्षांत आले.

"कान अलिकडे गेले. पेन्शन घेतल्यावर. पेन्शन घ्यायला कान लागत नाहींत. हात पुरेत ! बाकी आतां कानानें ऐकूं येत नाहीं हेंच चांगलें नाहीं तरी अलिकडे गजबजाट फार वाढला होता. तो आतां मी मुळींच ऐकत नाहीं" असें म्हणून ती गंभीर चेहऱ्यानें माझ्याकडे पहात राहिली. अर्थात् मी हंसलों. मी हंसावें म्हणूनच ती गंभीर झाली होती. ही तिची संवयच असावी. विनोद करायचा आणि ऐकणारा हंसेपर्यंत आपण गंभीर रहायचें. ऐकणारा हंसला कीं ती मोठ्यानें हंसायची. आपण किती मोठ्यानें हंसलों हें तिला कळत नसल्यामुळें ती खूप मोठ्यानें हंसायची.

"सबंध दिवस खिडकींत बसवते कसें ?"

"कारकुनी ! कारकुनींत आपण आणखी निराळें काय करतो?" ती पुनः गंभीर झाली.

"लग्न केले नाहीं म्हणून आतां वाईट वाटते?"

"नाहीं. उलट बरें वाटते."

"कां ?"

"कारण आतां मी बहुधा विधवाच झाले असते. इथें पुरुष लवकर मरतात. आणि मी तर खूप जगलें आहे. वय फार झाले आहे ?"

तरुणीला वय विचारूं नये म्हणतात. पण म्हातारीला ? तेवढ्यांत तीच म्हणाली, "माझें वय विचारूं नकोस. तरुणीला वय विचारायचे नसते." ती गंभीर होतांच मी हंसलों. तीहि हंसली.

"तरी सुद्धां जोडीदार हा . . . . ."

"ओऽऽ! तसा मला जोडीदार आहे."

"कोण?"

"वयानें लहान आहे. सत्तर वर्षांचा जोडीदार . . ."

"कोण ?"

"मिस् आल्बर्ट !"

"कुठं गेली आहे ?"

"भटकतेय. तिला प्रवास आवडतो. शिकागोला गेलीय."

"कां ?"

"गंमत म्हणून ! पण माझी अडचण होते."

"होणारच ! जेवण करायचे म्हणजे . ."

"जेवण ? हं ! माझें जेवण मी करतें."

"मग ?"

"कधीं पटकन रात्रीं मेले तर लोकांना कळवायला तर पाहिजे !"

इथें मात्र मी खरोखर गंभीर झालो. पण ती मात्र तशीच हंसली. आतां मरणाचा विचार तिला भिववीत नसावा. ती म्हणाली, "माझ्या खोलींत जोडीदार हवा तो एवढ्याचसाठीं. शिवाय माझीं ही चिमणी बाळें आहेत ना ? त्यांची सोय करायला पाहिजे कुणी तरी . . . ."

इथें मात्र ती गंभीर झाली. खरोखरच गंभीर झाली. मुळींच हंसली नाहीं.

तें पाहून मी थरथरलों. डोळ्यांत पाणी येते कीं काय अशी भीति वाटली.

एवढीच भेट ! कुठली कोण म्हातारी ! पण कुठें तरी धागा जुळला.

सुबत्ता दुथडी वाहत असली तरी ती भोगणारीं इंद्रियें थकलीं कीं सारें संपलें. मग कुत्रा सुद्धां हाल खाणार नाहीं. सगळीकडे वार्धक्याची हीच एक शोकांतिका ! आणि तरीहि वार्धक्य टाळणें कुणाला शक्य नस पण हिचा विशेष म्हणजे हीतें. म्हातारी या वयांत विनोद करून हंसत होती आणि हंसवीत होती.

ती भेटल्याला आतां खूप दिवस झाले. शक्यता आहे, ती कदाचित देवाघरींहि गेली असेल. पण ती माझ्या मनांत मात्र घर करून आहे. तिची आठवण झाली कीं मला माझ्या वार्धक्याचा विचार येतो आणि वार्धक्याचा विचार आला कीं मनांत तिचा विचार येतो. मग मीच थरथरत्या हातानें चिमणीच्या चोंचींत दाणा टाकतो आहे असे दृश्य दिसूं लागते.

असो ! म्हातारपण यायचें असेल तरा तें येईलच ! पण अशावेळीं त्या म्हाताऱ्या कॅथरीनचा खेळकरपणा तरी देवानें द्यावा ! म्हणजे तेवढेंच म्हातारपण सुसह्य !

**—जयवंत दळवी**

---

[ पृष्ठ ६६ वरून —आस्ची ]

आंत काय मजकूर आहे तें पाहून द्यावं ? ग्योर्ग येऊन तरी कधीं गेला ?

शिष्टाचाराला सोडून होणार असलं तर त्या परिस्थितींत आंधीं आंत काय मजकूर आहे तें पाहूनच, देण्यासारखं असेलं तर पत्र आस्चीला आत्तां दाखवावं, नपेक्षां एक दोन दिवस थांबूनच तें तिच्या स्वाधीन करावं, असं सर्वानुमतें ठरलं.

आस्चीच्या मैत्रिणीनं कांपऱ्या हातांनीं पाकीट उघडलं. नि आंतून एक फिकट-निळा कागद काढला. त्याच्याखालीं टांचणींत लावलेलं वर्तमान पत्राचं एक कात्रण होतं. आस्ची रेस्तरांमध्यें ऊप्करांतील त्या तरुण मुलाबरोबर गप्पा मारीत असतांना कुणी तरी काढलेलं एक छायाचित्र कांहीं दिवसांपूर्वीं वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालं होतं. त्या फोटोचं नि सोबतच्या मजकुराचं तें कात्रण होतं.

ग्योर्गनं पत्रांत एकदोनच वाक्य लिहिलीं होतीं. प्रिय आस्ची, आज मी येऊं शकत नाहीं. याबद्दल क्षमा कर. याचं कारण काय असेल याची कल्पना तुला सोबतच्या कात्रणावरून येईलच. तूं मला हें सर्व सांगायला हवं होतंस—'

या साऱ्याचा अर्थ उघड होता. ग्योर्गला आस्चीशी लग्न करायचं नव्हतं—"

मी परत यायला निघालों तेव्हां आस्ची मुद्दाम ऑस्लोला आली.. माझं विमान भल्या पहांटे सुटणार होतं, तरीहि ती विमानतळावर उपस्थित होती. विमानांत बसायला जातांना तिनं आवेगानं मला मिठी मारली नि माझ्या कपाळाचं चुंबन घेतलं. माझ्यासाठीं तिनं एक छोटीशी भेट आणली होती. चिनी मातीच्या एक गोल बशीवर एक नॉर्वेजियन युगल लोकनृत्य करीत असल्याचं चित्र त्यावर होतं अन् चित्राच्या खालीं अक्षरं होतीं: NORGE.

परत आल्यापासून या क्षणापर्यंत आस्चीला मी कितीं पत्रं घातलीं असतील. पण त्यांतल्या एकाचंहि तिनं कधीं उत्तर पाठविलं नाहीं. दोन वर्षांपूर्वीं आलेल्या एका मित्राच्या पत्रांत तिचा उल्लेख होता. आस्चीनं एका बोटीवरच्या खलाशाशीं लग्न केलं होतं अन् तिनं स्वतःहि त्याच बोटीवर नोकरी धरली होती....

परवां आणखी एका पत्रांत तिचा उल्लेख होता. आस्चीनं घटस्फोट घेतला आहे. अन् आतां ती ऑस्लोंत कसलीतरी नोकरी करीत दिवस काढीत आहे...

आस्ची——

मन थाऱ्यावर नसलेली एक विचित्र मुलगी अजूनहि ती खिडकींतून रिकाम्या नजरेनं बाहेर पहात बसत असेल अन् कधीं कधीं एखादी बाबागाडी पाहिल्यावर स्वतःशींच म्हणत असेल: मला असलं मूल हवं आहे...

**—सदानन्द रेगे**









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



**चाळिशी उलटलेली, पण इस्पितळांतही 'कविता' जगविणारी व्हेरा क्लीमेंट 'तुला भारावून टाकणारे डोळे लाभले आहेत' म्हणणारी मेरियल आणि मग भेटलेली मार्गारेट ........**



[१]

**वयाच्या** बावीसाव्या वर्षी स्त्री म्हणजे काय तर फक्त स्वतःची अव्यक्त राहिलेली इच्छा. तिची प्रतिमा उभी होते ध्यास, असत्य आणि कल्पनेतून. चटका लावून गेलेले कोणाचे डोळे, कोणाचं हेतु-पुरस्सर मोहवणारं स्मित, कोणाचा गूढ वाटलेला चेहरा, कोणाची उभार वक्षस्थळं, कोणाचे पार्थिव नितंब, कोणाची चाल. . . कोणाचे शब्द आणि त्यांतून स्वतःच्याच कल्पनेचे मनसोक्त ध्वनि. वयाच्या बावीसाव्या वर्षी स्त्री म्हणजे काय हें मला कळणंच अवघड होतं.

आणि तरीहि, वयाच्या बावीसाव्या वर्षी; मला वय असं नव्हतं: जे सुरकुत्यांनीं मोजता येईल, सुखदुःखांनीं मोजता येईल, अनुभवांनीं मोजता येईल, निष्कर्षांनीं मोजता येईल.

स्त्रीच्या शरीराचा पहिला अनुभव मला चवदा-पंधराव्या वर्षी प्रथम, ओझरता, अधुरा आला. विशी उलटण्यापूर्वीच मी पुष्कळ अनुभवी होतो. आणि तरीहि, स्पर्शामधल्या गच्च एकांतिक अनुभवा-बरोबरच कुठे तरी एखादा स्पर्शातीत संकेत आणि खूण मी शोधत होतो. एकविसाव्या वर्षी मी लग्न केलं, ते आंतल्या आंत परिपक्व झाल्यावरच. आणि स्वतःच्या पायांवर, धडपडत कां होईनां, उभा राहिलो. लौकिक अर्थानें ज्याला ढोबळपणें प्रेम म्हणून म्हणतात त्याची तीन सप्तकं मी तेव्हांच फिरलो होतो. अंगापलिकडे कुठेंतरी मी नांगर टाकला होता. असं करतांना, चरित्रावरची कांही टरफलं गळली. प्रेम केल्यामुळें मी सडा झालो, सडेतोड झालो, अतिरेकी झालो, एकाकी झालो आणि पूर्वीपेक्षां विस्तारलोहि.

'नुक्तं वयांत आल्यावरच्या पहिल्याच कांहीं दिवसांत आयुष्यांतला पहिला अध्यात्मिक संघर्षाचा काळ येतो. आपल्या शरीराची वाढ झालेली असते आणि मन मोकळ्या मातीसारखं रिकामं आणि उत्सुक पसरलेलं असतं. आणि अटळ, अमानुष नियतीला अनुसरून आपण स्त्री-पुरुषांचा विचार करायला लागतो.

ह्यांतून मीहि गेलो. तोंवर माझा स्वभाव अंतर्मुख, तुसडा आणि अलिप्त होता. मी अत्यंत संवेदनाक्षम होतो, भावडा होतो, भावना-प्रधान होतो पण जगाला स्पर्श करताना प्रथम जो थरकाप उडतो, तो माझा उडत होता.

मग मी उत्कटपणें प्रेम केलं. म्हणजे काय तें मला अजून नीटसं सांगता येत नाहीं; पण मी विकासलो.

ह्यातल्या सगळ्या स्पष्ट आणि अस्पष्ट गोष्टींची मिळून माझ्या चरित्राची दंतकथा उत्पन्न होते. तिच्या केंद्राशीं खरं जे घडलं तेच आहे. पण त्याभोंवतीं घडलेल्याहून सघन अनुभवांचे कठीण, पार्थिव थर आहेत. तिथें कल्पिताच्या आणि घटनांच्या, ऐंद्रिय सत्यांच्या आणि व्यक्तिगत अध्यात्माच्या, सीमा सरमिसळून गेलेल्या आहेत. सतत ढासळणारं, कोसळणारं, पुन्हां पुन्हां उभारून येणारं अस्तित्व, त्यांतल्या घटना-पुनर्घटना, त्यांतली त्रिकाळ एकांता-भोंवती घातलेली वर्तुळं, एकेका संवेदनेच्या सुईवर उभे राहिलेलं समग्र पूर्वायुष्य, असं सहज वर्णन करून सांगतां येणार नाहीं. सहसा सहज दिसते ती फक्त एकेका घटनेची वळलेली पाठ. एवढंच.

आणि आता मी परदेशांत भेटलेल्या अविस्मरणीय स्त्रीबद्दल बोलतोय ? कोणाबद्दल ? कोणा एका स्त्रीबद्दल ? अनेक जणींबद्दल? कीं स्वतःबद्दलच ?

[२]

केंव्हांतरी एक दिवस सत्य, संपूर्ण सत्य, आणि फक्त सत्यच मांगावं लागेल. त्या अगोदरच ही सर्वांगांनी कल्लोळणारी जाणीव मोकळी करायला हवी.

लग्नानंतर पांचच महिन्यांनीं मी अचानक इथिओपियाला गेलों. त्या अगोदरचे पांच महिने एका चमत्कारिक ओढगस्तींत गेले. माझी फ्री प्रेसमधली नोकरी लग्नापूर्वीच थोडे दिवस सुटली होती. रुईया कॉलेजांत पार्ट् टाईम टयूटर म्हणून जे एकशें पंधरा रुपये मिळत होते तेवढीच मिळकत. मिळकत अपुरी असतांना लग्न करून मी जणुं काय आमचा दोघांचाहि भार कुटुंबावर टाकला होता असं सर्वांनाच वाटत होतं. एक प्रकारच्या निःशब्द उपरोधाच्या धारेखालीं मी ते पांच महिने काढले. घरीं परत येतांना मला नेहमीं शरम आणि खंत वाटत असायची. इथिओपियाला नसतो गेलों तरी मी दुसरीकडे कुठेतरी गेलोंच असतो. कुठेंहि जाऊन राहायची माझ्या मनाची तयारी झालेली होती. मुळांत मला युरोपांत जाऊन राहायचं होतं. तिथें विजूला आणि मला चित्रं काढता आली असती, लिहिता आलं असतं, कांहींतरी मिळवता आलं असतं आणि अनामिक, त्रयस्थ, वर्षानुवर्षं राहता आलं असतं. आणि मग हे अचानक जाणं झालं.

गेलो ते आम्हीं दोघेंच. नोव्हेंबरमधल्या एका मध्यरात्रीं. काळोखांत झेप घेतलेल्या एका विमानांतून. लग्नानंतर प्रथमच एकटे, आणि सर्वस्वी अनोळखी देशांत.

[३]

माझ्या आयुष्यांतला पहिला, सर्वस्वी माझा, घडणीचा काळ खरा हा.

आदिसअबाबांतले आमचे पहिले पंधरा दिवस आठवतात. इतिगे नांवाच्या एका जुनाट, मोठ्या हॉटेलांत हे पंधरा दिवस आम्ही काढले. भयंकर थंडी, रात्री तपमान शून्याच्या आसपास. फारशा ओळखी नाहींत. कुठें जावं, कसं जावं ठाऊक नाहीं. जे ओळखीचे झालेले लोक त्यांच्यावद्दल कोणताच मानसिक विश्वास उत्पन्न झालेला नाहीं. संध्याकाळीं आम्ही शहराच्या शॉपिंग् सेंटरमध्यें–पिआझ्झांत फेरी टाकून आलों कीं खोलींत येऊन बसायचो. विजूला येण्याअगोदरच दिवस गेलेले होते. तिची प्रकृति विशेष चांगली नव्हती. तिला उत्साह खूप होता पण थकवा लवकरं यायचा. ते पंधरा दिवस एखाद्या अनपेक्षित, अकल्पित, हनीमूनसारखे गेले. एका अनोळखी खंडांतल्या इतिगे हॉटेलच्या दुसमजल्यावरच्या एका जुनाट अनोळखी पठारावरल्या अनोळखी शहरांत, पुष्कळ फर्निश् केलेल्या खोलींत, आम्हीं एकमेकांना पुन्हां ओळखलं.

[४]

ह्याच पंधरा दिवसांत हळू हळू माझ्या पहिल्या वहिल्या ओळखी झाल्या: डॉमिनिक्, ग्रॅहॅम, टायर, एरिक्, एनियू, ठाकूर शर्मा,

[५]

तुम्हा-आम्हांला भेटलेली अविस्मरणीय स्त्री

**मुंबापोर**

**म्याळेल्या जणुं गर्दभवतिच्या**
**शेपटास बांधावे शिप्तार**
**मुंबापोर ही तशीच जाई**
**चुकवित नजरा फार भयंकर**

सबरवाल. . . ह्यांतल्या ग्रॅहॅम् इंग्लिश आणि एनियू इथिओपियन. बाकी सगळे भारतीय.

एनियू हा एरिकचा मित्र. तो इथिओपियन सिक्युरिटी पोलिसांत लेफ्टनंट होता. एरिक् आमच्या अगोदर आलेला एक शिक्षक. आल्यानंतर पहिल्याच आठवड्यांत आदिसअबाबाचं नाईट लाईफ पहावं असा बूट निघाला. एरिक् आणि एनियू हे गाईड्स्. मी, शर्मा आणि सबरवाल आणि ठाकूर, ह्या सवाऱ्या.

विजू मला म्हणाली–जा की, बघून ये.

त्या रात्रीं आम्ही वाळवंट म्हणून ओळखल्या जाणाऱ्या वस्तींतल्या प्रत्येक नृत्यालयाला, बारला, ब्रॅथेलला भेट दिली.

तेथला रिवाज असा होता कीं, नाचता नाचता मुलगी निवडायची आणि मग शय्यागारांतल्या एखाद्या केबिनमध्यें जायचं. सबरवाल आणि शर्मा पहिल्याच ठिकाणीं चळचळा कापायला लागले. हिरव्या आणि लाल–अनैसर्गिक–दिव्यांच्या प्रकाशांत त्या उफाड अंगाच्या काळ्या, नीटस चेहऱ्यांच्या इथिओपियन मुली आमच्या-जवळ येऊन आम्हाला खुणावत होत्या. विचित्र अॅम्हारिक गाण्यांच्या जलद लयी, सिगरेटचा वाढता धूर, व्हिस्की-सोड्याची कडवटसर मिरमिरणारी चव, नाचणारांचे तर्र चेहरे आणि तारवटलेले डोळे आणि त्या मुलींची सुरेख, काळीभोर, यांत्रिक शरीरं, झग्यांचे फुगे. मला किळसहि वाटली नाहीं किंवा आकर्षणहि जे दिसत होतं, ते सामोरं होतं. मी कंटाळलो नव्हतो. जागत्या कुतूहलाने मी सगळं पहात होतो.

तुफान पिऊन, तर्र होऊन, पहाटे तीनच्या सुमाराला आम्ही परतलो.

विजू हॉटेलच्या लाऊंजमध्येंच बसून माझी वाट पहात होती. आतां हे सगळं लहानपणच्या एखाद्या आठवणीसारखं वाटतं. पण, स्त्रीचा केव्हांहि विचार करतांना मला तो मॅड नाच, तो धूर, तो तांबडा हिरवा प्रकाश, तो व्हिस्की-सोडा, ती नाचणारी काळी शरीरं, ते फुगीर झगे, ते रेखीव पाय, नेहमीं आठवतात. जसा जिवंतपणा आठवताना क्वचित् एखादा असाध्य, दुर्बोध प्रासंगिक रोग आठवावा तसं. . .





अनुक्रमणिका

कारण सत्य, संपूर्ण सत्य, फक्त सत्य कुठेतरी लेण्यांमधल्या अंधुक प्रकाशांतल्या कठोर दगडांतल्या कोमल स्मितापासून आणि नुकत्या उचललेल्या उजव्या पायाच्या अंगठ्यापासून थेट ह्या ब्रॉथेलमधल्या केबिन्समधल्या फेसाळ, केसाळ अंधारापर्यंत आणि त्यांच्याहि पार आहे, एवढं मला कळलंय्.

[५]

आम्हीं असेल्ला गांवाला रहायला गेलों, तेव्हां तियल्या स्वीडिश् मिशनमधल्या डॉक्टर निष्ट्रुमची ओळख झाली. डॉक्टरचं वय साठीच्या आसपास होतं, आणि त्याची बायको पन्नाशी उलटलेली. मिसेस् निष्ट्रम तरुणपणीं अतिशय सुंदर दिसत असणार. तिचा चेहरा अतिशय रेखीव होता. व्हीनस–टाईप म्हणून ज्याचं ज्योतिषी वर्णन करतात तसा. तिचा चेहरा मोठा होता. नाक पातळ आणि सरळ. दोन्हीं भुवयांचा तोल अचूक. तिचे डोळे निळसर राखी रंगाचे होते. त्यांतली नजर शांत, दयाळू, पाणीदार, पण एखाद्या मौन धरलेल्या वेड्याची होती.

मिसेस् निष्ट्रुम बोलायची, आठवतंय् ते एवढंच, फक्त मोजक्या विषयांवर: तिच्या अत्यंत सुंदर बागेतली तऱ्हेतऱ्हेची फुलं, स्वीडीश्, कुकीज् आणि परमेश्वराची दया. तिचं बोलतांना कोणाकडेच लक्ष नसायचं. बोलण्यांत तिचा देवभोळेपणा नेहमीं लक्षांत यायचा. आम्हाला दोघांनाहि तिने न्यू टेस्टामेंटच्या तळहाता-एवढ्या प्रति दिल्या होत्या. कष्टाच्या काळांत आपल्याकडले लोक जसे शनिमहात्म्य वगैरे वाचतात, तसं वाचायला.

एकदा मला विजू म्हणाली कीं, मँटलपीसवरचा फोटो निष्ट्रुमच्या मुलाचा आहे. लष्करी पोशाखांतला ब्लांड् आणि गुलजार मुलगा, तो त्यांचा एकुलता एक, मारला गेलेला मुलगा. नंतर कळलं कीं, मुलगा मेल्यावर मिसेस् निष्ट्रुम् अशी वेडसर बनली.

पंचावन्न वर्षांची ऑफिलिया बघावी तसं तिला बघून वाटायचं. पण मग हें कळल्यावर तिच्या बागेंतली तऱ्हेतऱ्हेची फुलझाडं, तिच्या अंगणांत इवाई सरोवराकडे बघत घेतलेले कॉफीचे घुटके आणि ऐकलेलं स्वर्ग आणि परमेश्वराबद्दलचं बोलणं, ह्यांचा एक-दम एक विलक्षण संदर्भ बनला. बोलतांना कधींच तिनें आपल्या मुलाचा उल्लेख केलेला नव्हता. फक्त एकदांच, तिच्या मूळच्याच संगीतमय आवाजांत वारं संचारलं होतं, आणि ती फोटोकडे बोट करून म्हणाली होती, "तो फार फार चांगला होता. म्हणून तर आजहि तो तिथे–स्वर्गांत आहे!"

[६]

स्त्रीच्या शरीराबद्दल जें आकर्षण वाटतं तें.

आणि स्पर्शाने होणारं भूगर्भ प्रगल्भ ज्ञान.

कोणीहि कधीं ना कधीं कबूल करीलच कीं ब्रेसियर्स, परकर, स्कर्ट्स्, साड्या यांच्यापलिकडे स्त्री असते.

त्यांतल्या अंगापलिकडेहि ती असते.

आणि तरी तिच्याबद्दल वाटणारं गूढ म्हणजे तिच्याबद्दलचं कुतू-हल कीं, स्वतःच्याच इच्छेचं गूढ, कीं शरीराची दुर्बोधता, कीं आप-लाच अहंकार निरसून निर्विकार, स्तब्ध होण्याची ओढ–कोण जाणे.

जिच्या हालचाली डोळे मिटूनहि ओळखता येतात, जिच्या ओठाच्या मुरडींतल्या वळणाची तिळभर जागा नेमकी ठाऊक असते, जिच्या डोळ्यांतला बारीकसा अर्थ अनेकदा वाचलेला असतो, जिच्या श्वासाची लय कमीजास्त केव्हां होईल हें पूर्वापारपासून ठाऊक असतं, तीहि, अनेक वर्षांनंतर, समोरून चालत येते, तेव्हां जणुं तिला आपण पहिलूनच बघतोय् असं कां वाटतं ?

त्यावेळेला सगळंच सततच अलंघ्य राहून गेलंय् असं का वाटतं ?

हे अनारंभ, सतत जन्मणारं कौमार्य येतं कुठून ? सगळीं सुखं, सगळे नाजूक क्षण, सगळे बलात्कार, सगळं होऊन गेल्यावरहि शरी-राचा आणि मनाचा सामोरा, विशेष, सामोराच कसा राहतो?

त्या एका मूळच्या संवेदनेतून सगळे विचार, सगळे विकार, सगळ्या भावना स्रवतात.

तिला चेहरा नसतो.

तिला फक्त अंग असतं.

आपल्या मिठींत पलिकडलं कधींच येत नाहीं. येतं तेव्हां आपणच आपल्याशीं एकटेच असतो.

[७]

मे १९६१ मध्यें विजूला बाळंतपणासाठीं आदिसअबाबाच्या प्रिन्सेस त्सहाय हॉस्पिटलमध्यें जाऊन राहावं लागलं. वस्तुतः जुलैच्या पहिल्या आठवड्यांत मूल जन्मणार असं डॉक्टरांचं गणित होतं. पण साध्या बाळंतपणाखेरीज इतर अनेक अवघड



साखरेच्या टंचाईनें या खेपेस दिवाळी अशीच साजरी करावयाची ठरवलीय.









अनुक्रमणिका

गोष्टी, उदाहरणार्थ वाढलेला रक्तदाब, अॅनीमिया आणि किड-नीचा विकार असल्यामुळें केव्हांहि ऑपरेशन वगैरे करावला लागण्याची शक्यता होती. त्यामुळें शाळेचें काम आटोपून मी अदिसअबाबाला आलो.

पुढला जवळजवळ सबंध महिना मीहि रात्रंदिवस त्या हॉस्पिटलांत होतो. तिथल्या नर्सेस्–आय्यलिज्, कड्डिस्त, लूल, . . . तिथली मेट्रन व्हेरा क्लीमेंट. . . . डॉक्टर हॅमालिन् आणि त्याची बायको निकल्सन् (हें तिचं "पूर्वाश्रमीं"चं नांवच ती लावायची) . . . ही सगळीं माणसं जवळ आली.

व्हेरा क्लीमेंट ही पंचेचाळीस ते पन्नास वर्षांची प्रौढ कुमारिका होती. ती मूळची इंग्लिश. वयाच्या मानाने तिला जबरदस्त उत्साह होता. तिच्या हालचाली पंचविशींतल्या मुलीइतक्या जलद, यौवन-सुलभ वाटायच्या. तिचा बांधा सडसडीत होता. फक्त चेहऱ्यावर वयाच्या न पुसता येणाऱ्या रेषा आणि करडे झालेले केस, एवढ्याच वार्धक्याच्या खुणा.

एकदां विजू केव्हांतरी तिला म्हणाली मी कविता करतो. तेव्हांपासून सिस्टर क्लीमेंटचा माझ्याकडे पहायचा दृष्टिकोन बदलला.

तिची कवितेची आवड टेनिसन् आणि अगोदरचे इंग्लिश रोमँटिक कवि इथवरच. मला टेनिसनबद्दल खरोखर काय वाटतं, तें मी तिला सांगायचं टाळलं. पण नेहमींच, बाहेरच्या खिडकींतून, गॅलरींतून, दिसणारा इथिओपियन निसर्गाचा सुंदर तुकडा दाखवीत, सिस्टर क्लीमेंट कोणत्यातरी कवीच्या कोणत्यातरी ओळींचा उल्लेख करायेची.

माझी मनस्थिति तेव्हां कवितांचं रसग्रहण करण्याजोगी नव्हती. पण सिस्टर क्लीमेंट मला मुद्दाम हॉस्पिटलांतूनच ब्रेकफास्ट आणि जेवण पाठवायची हें मात्र खरं.

ती अतिशय बडबडी होती. कधीं कधीं आमचं तासतासभर बोलणं व्हायचं.

मला वाटायचं ही, मेनॉपॉझ्, उलटून गेलेली इंग्लिश् कुमारिका, थंड पण उत्साही, तिच्यांतला सगळा Sex कधींच गोठून गेलेला, वागण्यांत अगदीं "करेक्ट" आणि इंग्लिश्, तरीपण एकाकी आणि आतां केस करडे झालेली, चेहऱ्यावर वयाच्या रेषा उमटलेली, माझ्याशीं बोलण्यांत हिला आणि हिच्याशीं बोलण्यांत मला–काय मिळतंय् ?

तिसेक वर्षं हळूं हळूं तिचं तारुण्य, शारीरिक ओढ, हळू हळू गोठून गेलेली असणार. पुरुषाच्या सहवासाचा प्रचंड, शारीरिक अर्थ संपून गेलेला असणार. उरलाय् फक्त तारुण्याचा आणि वार्धक्याचा विलक्षण मोहक संधिप्रकाश.

विजाशयाचं निर्माल्य होऊन गेल्यावरहि ही स्त्री, ह्या वरकरणींच्या बलोट, तरुण, उत्साहांत, अजून काय शोधतेय् ?

आशयच्या जन्मानंतरहि सिस्टर क्लीमेंटने आमच्याशी ओळख ठेवली. नंतर, एक दिवस, चार्ल्स राईट् नांवाच्या पन्नाशी उलटलेल्या आर्किटेक्टशीं तिने लग्न केलं, आणि हें जोडपं कीन्या–टांगानिकांत हनीमूनला गेलं ! हा हनीमून कसा असेल ह्याचा मी पुष्कळ विचार केला.

वय उलटलेलं पण सुदृढ, असं हे जोडपं. दोघांचंहि तारुण्य सुकून गेलेलं, शरीरांवर सुरकुत्या–आणि हनीमून !

एकाकीपणाचा एकाकी, पण आशा धरूनच केलेला, शेवट. . . .

मिस्टर क्लीमेंटमुद्धां अतिशय आकर्षक होती. पण आतां मला आठवतंय् तें विजूच्या ऑपरेशनपूर्वी तिनं म्हटलेलं "Don't lose heart. Hope for the best." कारण डॉक्टर मला म्हणाला होता, स्पष्ट सांगतो, दोघांचंहि कांहींहि होऊं शकेल. मन घट्ट कर आणि परमेश्वरावर विश्वास ठेव. आणि नंतर, ऑपरेशन थिएटरमधून, सिस्टर क्लीमेंट धांवत आली. तिच्या पांढऱ्या एप्रनवर रक्ताचे डाग होते. माझा हात घट्ट पकडून, मला जोरजोरांत हालवून, ती म्हणाली, "Congratulations — you're the father of the loveliest baby I've seen — a son!" घोगऱ्या आवाजांत मी विचारलं, "How's she? Tell me, how's she?"

सिस्टर क्लीमेंटच्या डोळ्यांत त्यावेळीं मला एक निराळीच लकाकी दिसली.

Oh, don't worry. It's all over. She'll be well!" ती पुटपुटली.

मग, केव्हांतरी ती विजूला म्हणाली, शब्द नक्की आठवत नाहींत, पण, "Oh, you're lucky to be loved so much! Very, very lucky!"

मला वाटलं, पंचविसाव्या वर्षी, ही हेंच म्हणाली असती कां ?

[८]

मेरिअलची आठवण होते–न शरमता–कारण कांहीं काळ आम्हांला एकमेकांबद्दल आकर्षण होतं म्हणून.

मेरिअल ग्रॅहॅमची लग्नाची बायको. तिला दोन मुली होत्या. मग हळू हळू, स्वभावतःच दोघं वेगळी झाली. मेरिअलचा टॉम ब्लूरशी संबंध आला. ग्रॅहॅमचा मोठेपणा हा कीं, इतरांच्या बोलण्यांत जें बौद्धिक पातळीवरच राहतं, तें मनाला कष्ट सोसून त्यानें प्रत्यक्षांत आणलं. त्यानेच टॉम–मेरिअलचा संसार थाटून दिला आणि आपण वेगळा झाला. दोघांचाहि मित्र राहूला, घटस्फोट








घेतला नाहीं, आणि मुलींचं मानसिक जीवन सुरळित ठेवण्याचा प्रयत्न केला.

मी कांहीं तिघांबद्दलहि लिहीत नाहीं. मी लिहितोय् मेरिअलबद्दल. माझं आदिसअबाबांतलं पहिलं घर, आफ्रिका हॉलच्या जवळ, स्तेफानोस् चर्चपाशीं होतं. पहिल्यांदा मेरिअल टॉमबरोबर आली त्यावेळीं दुपारीं आम्हीं सर्वजण चिक्कार तज प्यायलों होतो. तिशीला आलेली मेरिअल दिसायला सुंदर नव्हती. हाडकुळी, किंचित् पोक काढून चालणारी, पसरट जिवणीची आणि पुष्कळशी नखरेल वागणारी.

पिणें झाल्यावर सर्वजण बागेंत, अंगणात विखुरले. मी घराच्या पायरीवर बसलो होतो. मेरिअल जवळ येऊन बसली आणि म्हणाली "Oh, hello!" मी म्हटलं, "Hello!"

तिच्या डोळ्यांत पुष्कळ नशा चढलेली होती. माझ्याकडे रोखून पाहात ती म्हणाली, "You have hauntingly beautiful eyes! You'll seduce a woman easily!"

"Will I be able to seduce you?" मी विचारलं.

"Oh, don't be naughty!" ती म्हणाली, पण तिच्या डोळ्यांत किंचित् आव्हान होतं.

जातांना तिनं माझा तळहात थोडा जास्तच दाबला. पण हा भासहि असेल.

विजूला माझं हें वागणं अनपेक्षित नव्हतं, पण दुखावणारं होतं. आम्हां दोघांनाहि त्यामुळें पुष्कळ दुःख सोसावं लागलं, जे प्रेमाचा भाग असतं.

आणखी एकदां, दुपारीं, तिने माझा हात बघितला. चेटकीसारखी डोळ्यांनीं ती पुन्हां म्हणाली, "जगभर तुझा लौकिक होईल—कलावंत म्हणून—पण बायकोला तूं फार दुःख देशील. तूं इतरजणींमध्यें नेहमींच गुरफटणार !"

विजू तिथेंच होती, ती म्हणाली, "How true! सगळे ज्योतिषी असंच म्हणतात. . . ."

"जाऊं दे ग ! All men are like that..." मेरिअल म्हणाली.

"...and some women, too!" मी म्हटलं.

पुढच्या वर्षी, एकदां एका पार्टीत, जेफ् लास्ट् नांवाच्या आणखी एका मित्राच्या घरीं, मी चिक्कार प्यायलो होतो. पहिला तासभर मी अत्यंत Delightful वागत होतो—असं म्हणतात. नंतर मी जवळजवळ बेशुद्धच झालों. बाहेर, समर हाऊसमध्यें मी पडून होतो. विजू माझ्याजवळ बसून होती. इतक्यांत मेरिअल आली. तिनें विजूला पार्टीत जायचा आग्रह केला आणि माझ्याजवळ थोडावेळ राहायची तयारी दाखवली. विजूला जायचं नव्हतं—पण वाईट दिसेल म्हणून ती गेली. शिवाय मला जेमतेम जाणीव होती, धुगधुगीसारखी.

मला त्या स्थितीत कांहींहि करतां येणं शक्य होतं आणि नव्हतंहि. मेरिअलनें माझा हात धरला आणि आपल्या अंगाशीं ओढला. खरं तर, हें मला नामुष्कीचं.

. . .पण नंतर, बऱ्याच दिवसांनीं, मेरिअल विजूला म्हणाली, "मी तुला कधींच सांगणार नव्हते—पण—you know — Dilip — tried to do it to me..."

"मग ?" विजूनें विचारलें.

"अग तो असा वागला ह्यांत त्याची कांहींच चूक नव्हती. पण असं वागायला नको होतं . . ." विजू नंतर मला म्हणाली, "खरं काय झालं ?"

"Let's face it!" मी म्हणालो, "मला तिच्याबद्दल आकर्षण वाटलंय्. पण त्या दिवशीं—किंवा अजूनपर्यंत तरी—असं कांहींच झालेलं नाहीं. . . ."

आमची मैत्री शेवटपर्यंत होती. तिला मैत्री असंच म्हणतां येईल कीं काय कोण जाणे.

[९]

मार्गारिट्.

ही सायकोपॅथॉलजींतली एक केस—हिस्टरी झाली असती माझ्या चरित्रांत घडली नसती तर.

ह्या स्त्रीने मला स्त्रीकडे बघायला लावलंय्. माझा थरकाप उडवलाय्.

दारुडी, incurable alcoholic, sex — maniac. सगळा गाव ओळखतो ते, पण त्याहून फार जवळून मी पाहिलंय्. वय चाळीस. चेहरा गोल. एकेकाळी सुंदर. आतां कुरुप, तोल गेलेला, हिंस्त्र, हिस्टेरिकल्, क्वचित् उदास, उदास, दुखावलेल्या लहान मुलीचा.

एकदां मला नाचताहि येत नव्हतं, आणि हिने मला सगळ्या फरशीवर कापडाचं, चिंध्याचं बाव्हलं हिंडवावं तसं हिंडवलं, नाचवलं. जॅझ्च्या फवाऱ्यांत. लखलखत्या विदूषकी वातावरणांत. बिअरच्या वासांत. कच्च्या स्टेकच्या मांसभक्षक वासांत. टाळ्यांचा कडकडाट ! Great fun !

आणि ती एकदम फुस्कारली, "You savage bastard!" मी म्हटलं, "You unsophisticated bitch!"

मग ती म्हणाली, "Tell me about India. About Indian women..." तिच्याबरोबर नाचायला कोणीच तयार नव्हतं. फक्त आफ्रिकन मुलं. आणि त्यानंतर ती त्यांना घेऊन सरळ बाहेरच्या गवतांत जायची.

एकदां, मला भिंतीशीं लोटून—ती भयंकर तर्र होती तेव्हां—तिनें आपले ओठ माझ्या ओठांवर चुरडले. माझी सगळी धुंदी पार उतरली.

[१०]

ह्या सगळ्यांतून, कोणती एक अविस्मरणीय स्त्री दिसते?

नुसती स्त्री.

स्त्री. स्त्रीत्व.

आणखी उरलेल्या इथिओपियन मुली: लिझ्, आल्माझ. पाशवी सौंदर्य आणि जिवंतपणा एका अपभ्रष्ट मानवी भाषेंत व्यक्त झालेला. ह्या पुरुषांच्या इच्छा. त्यांचा पराजय. हीं जिंकलेली शरीरं. ही लक्तरं. ही अतिशयोक्ती. हा प्रेम, प्रेम म्हणून मानलेला अंधारा व्यवहार—रक्तामांसाचा, खुनाचा वास येणारा.

आम्हीं हरवलेलं मानवी शरीर—स्वर्गीय आणि अस्खलित.

ईव्हचं.

—दिलीप पु. चित्रे

**स्टेशनच्या प्लॅटफॉर्मवर ती उभी होती. माझ्याकडे पहात होती. नंतर ती 'अन्नपूर्णा' झाली. माझें कुतुहल वाटले. शेवटीं ती तिकडची 'शास्त्री' असल्याचा शोध मला लागला........**



**अथेन्स** सोडल्याला आतां दहा-बारा तास झाले होते. संध्याकाळीं सातला अथेन्स सोडलं होतं. आतां सकाळचे सहा साडेसहा झाले होते. आगगाडीच्या खिडकीचा मखमली पडदा वर केला तों बाहेर चांगलंच ऊन आलेलं दिसत होतं. कुठल्या तरी मोठ्या स्टेशनांत गाडी उभी होती. भराभर तोंड धुतलं, केंस विंचरले, शर्ट पॅन्ट घातली आणि कंपार्टमेंटच्या बाहेर येऊन गाडीच्या खिडकींतून बाहेर पाहूं लागलों. ग्रीक सरहद्दीचं स्टेशन असावं. आतां युगोस्लाव्हियाची हद्द सुरू होणार असं दिसतं. स्टेशनाचं नांव किंवा इतर पाट्याहि वाचतां येत नव्हत्या. ग्रीक किंवा युगोस्लाव्ह भाषा येत नव्हतीच. इतर युरोपियन भाषांची लिपी रोमन असल्यामुळें कांहीं तरी र ट फ वाचता येतं आणि थोडा तरी अक्षरांचा बोध होतो. पण इथें ग्रीक भाषेंची लिपीही वेगळी असल्यामुळें कशाचा कांहींच बोध होईना! पांढऱ्या पीक टोप्या आणि गडद निळा लष्करी गणवेष घातलेले ग्रीक पोलिस अधिकारी इकडे तिकडे फिरत होते आणि पासपोर्टच्या चवकशा करीत होते त्यावरून आतां ग्रीक सरहद्द संपून युगोस्लाव्ह सरहद्द सुरू होणार असें वाटलें.

भाषा येत नाहीं, पौंड मोडून ग्रीक ड्रॅक्मा घेतले तर कॉफीचे पैसे दिल्यानंतर उरलेले ग्रीक पैसे युगोस्लाव्हियांत बदलून मिळतील किंवा काय याची शंका, प्रवासाच्या पहिल्याच टप्प्यांत कपड्यालत्त्यांची मोठी बॅग विमान कंपनीनें हरवून टाकलेली, खिशांत रिझर्व्ह बॅंकेच्या कृपेनें सर्व प्रवासासाठीं मोजके आठदहा पौंड या आणि असल्या काळज्यांनीं ग्रस्त होऊन—उठल्याबरोबर त्याच्याशिवाय रहावत नाहीं असा गरम गरम च्हाचा किंवा कॉफीचा कप स्टेशनांत कुठं आणि कसा मिळवावा म्हणून गाडीच्या खिडकींतून मी भिरिभिरी बाहेर पहात होतों. समोरच्या प्लॅटफॉर्मवर स्टेशनचें रेस्टोरां दिसत होते. ग्रीक उतारू उभ्या उभ्याच कॉफी घेत, सुकी कोंबडी दांतांनीं तोड तोडून मटकावीत असलेले दिसत होते. माझ्या घशाला कॉफीच्या घोटासाठीं अगदीं कोरड पडली होती. खालीं उतरावें तर गाडी केव्हां सुटेल, पैसे बदलून कॉफी घेण्याइतका वेळ आहे किंवा नाहीं—कांहीं समजेना. भाषेमुळें कुणाला धड विचारतां येईना. इतक्यांत समोरच्या प्लॅटफॉर्मवरून रेल्वेलाईन ओलांडून माझ्याकडे ओळखीच्या नजरेनें पहात एक तीस पस्तीस वर्षांची सोनेरी केसांची युरोपियन बाई शांतपणें येत असलेली मला दिसली. ती ओळखीच्या नजरेनें कां पहात होती मला कांहीं कळेना. मी तिला आत्तांच पहिल्यांदा पहात होतों. माझ्या खिडकीशीं येऊन उत्तम इंग्रजींत ती म्हणाली, 'तुम्हाला कॉफी घ्यायची असेल नाहीं ? या खालीं उतरून. गाडी सुटायला अजून वेळ आहे.'

मी मुकाट्यानें खालीं उतरलों आणि तिच्याबरोबर समोरच्या रेस्टोरांत गेलों. गल्ल्याकडे बसलेल्या गलेलठ्ठ ग्रीक माणसाला तिनें ग्रीकमध्यें कांहीं सांगितलें. त्यानें भरून दिलेला गरम गरम कॉफीचा कप माझ्या हातांत देत तिनें विचारलें, 'उकडलेलीं अंडीं. सुक्या कोंबड्या यापैकीं इथलं कांहीं प्रातउपहाराकरितां घ्या कीं.' 'नाहीं—नाहीं—इतक्या सकाळीं मी कॉफीच घेतों. मला कांहीं खायला नको', मी म्हणालों. 'बरं मग, बिस्किटं घ्या' असं म्हणून कुरकुरीत बिस्किटांचा तिथला एक पुडा उचलून तिनं माझ्या हातांत दिला. 'अहो पण तुम्हीं—' मी तिला कांहीं प्रश्न विचारण्याचा प्रयत्न करीत होतों.





अनुक्रमणिका

अनुक्रमणिका








'तुम्ही आधीं कॉफी घ्या,' एका टेबलाकडे बोट दाखवून ती म्हणाली, मला एक तातडतीच तार खरडून स्टेशनांत द्यायची आहे' पलीकडल्या टेबलावर ती तार लिहीत बसली.

माझी कॉफी संपल्यानंतर मी तिच्याकडे जाऊन म्हणालों, 'पौंडाचे ड्रेक्मा कुठं मिळतील सांगा बघूं. मला कॉफीचं बिल देऊन टाकूं द्या.'

'पौंड मोडूं नका बिल मी देऊन टाकलंय् !' पहिल्यापासून ती बोलत होती त्याच शांत स्वरांत ती म्हणाली, 'तुम्ही गाडींत जाऊन बसा. गाडी सुटण्याची सूचना ध्वनिक्षेपकावरून ग्रीकमध्यें होईल. तुम्हांला ती समजणार नाहीं. तारमास्तराकडे तार देऊन मी येतेंच.' मी गाडींत जाऊन बसलों. थोड्या वेळानें ती आली आणि आपल्या कंपार्टमेंटमध्यें जाऊन बसली. माझ्या कंपार्टमेंटच्या पलीकडे तिसऱ्या कंपार्टमेंटमध्यें ती होती. गाडी सुटल्यावर तिला भेटण्याचा आणि ती कोण, काय, माझी चवकशी तिनें कां केली वगैरे प्रश्न विचारण्याचा माझा विचार होता. पण तिनें कंपार्टमेन्टचें दार लावून घेतलेलें असल्यामुळें मी स्वस्थपणें माझ्या कंपार्टमेंटमध्यें सिगारेट ओढीत आणि पुस्तक वाचीत पडलों.

माझ्या कंपार्टमेंटचें दार उघडेंच होते. साडे अकरा बाराच्या सुमारास स्वच्छ पांढऱ्या पातळ कागदांत गुंडाळलेलीं दोन तीन लहान-मोठीं पुडकीं घेऊन माझ्या दाराशीं आली. माझ्या कंपार्टमेंटमधल्या छोट्या टेबलावर तीं पुडकीं ठेवीत ती म्हणाली, 'तुम्ही कोल्ड चिकन खाता ना ? लंच असंच घ्यावं लागेल--बशा, काटे, चमचे, नाहींत. गाडींतला लंच आहे हा !' असें म्हणून 'गाडींतलं प्यायचं पाणी चांगलं नाहीं--माझ्याकडे मिनरल वॉटर आहे तें, तुम्हाला आणून देते थोडं' असं म्हणत ती परत गेली. मिनरल वॉटरची बाटली घेऊन ती आली आणि माझ्या टेबलावरचें कांचेचें भांडें तिनें भरून ठेवलें.

'तुम्ही काय चालवलंय्, हें मला कांहीं समजत नाहीं. मला कांहीं खायला नको आहे या वेळेला--' गोंधळलेल्या स्वरांत, पण जरा जोरातच मी उद्गारलों.

खिडकीकडे बसत ती हंसत म्हणाली, 'मी कांहीं चालवलेलं नाहीं--आइस बॉक्समधून मी भरपूर खायला आणलंय् या प्रवासांत. नेहमींच मी भरपूर खायला घेतें प्रवासांत. कोणना कोण तरी लांबच्या प्रवासांत भेटतंच. अथेन्समध्यें तुम्ही कुत्सोहेराम मंडळींकडे राह्यला होतात ना ? त्यांचा माझा चांगलाच परिचय आहे. त्यांच्या घराजवळच माझं माहेर आहे. काल संध्याकाळीं तुम्हाला गाडींत बसवून द्यायला मादाम कुत्सोहेराम आल्या होत्या ना ? गाडी सुटतां सुटतां मी त्याना दिसलें तेव्हां त्यांनीं मला बजावून सांगितलं कीं, हे आमचे भारतीय पाहुणे युगोस्लाव्हियांत परिषदेला जाताहेत. त्यांना ग्रीक किंवा युगोस्लाव्ह भाषा येत नाहींत. फक्त इंग्रजी येतंय. तेव्हां तूं त्यांच्यावर जरा लक्ष ठेव. मी तुमच्यावर लक्ष ठेवलंय् नि पाहुण्यांचं गाडींत शक्य आहे तितकं आदरातिथ्य करत्येंय. पाहुण्याला असं कागदांत गुंडाळून चिकन खायला देतांना मला लाज वाटते ! खायला लागा तुम्ही.' तीं पुडकीं उघडून मी खायला लागलों. एकांत अतिशय खुमखुशीत चिकनचा तुकडा होता. एकांत टोमॅटो आणि काकडीचे काप होते. लोणी लावलेले पावाचे दोन तुकडे आणि मुंबईंत गेल्या कित्येक वर्षांत दृष्टीलाही न पडलेल्या अशा चवदार चीजचा एक मोठा थोरला तुकडा होता. दोन रसरशीत पीचचीं फळेंहि होतीं.

बोलतां बोलतां तिनें स्वतःची पुष्कळ माहिती सांगितली आणि वरीचशी माहिती विचारूनहि घेतली. तिचें नांव एलिस अनाग्नॉस्तोपुलू.

'नको, नको,' ती हंसत म्हणाली, 'माहेरचं माझं ग्रीक नांव उच्चारण्याचा किंवा लक्षांत ठेवण्याचा प्रयत्न करूं नका ! माझे पति अमेरिकन आहेत. माझं सासरचं नांव तुम्हाला लक्षांत ठेवायला चांगलं आहें-- लिली लिटल्फील्ड्.'

'वाः छान आहे' मी म्हणालों, 'एखाद्या कादंबरीच्या नायिकेला शोभण्यासारखं आहे !'







अनुक्रमणिका

बोलतां बोलतां पंतप्रधान शास्त्रींचें नांव निघालें.

'काय हो, शास्त्री या नांवाचा अर्थ काय होतो तुमच्या भाषेंत ?' तिनें विचारलें.

'शास्त्र पुराणांचा ज्यानें अभ्यास केला आहे असा विद्वान्', मी म्हणालों.

'तर मग आमच्या ॐनाग्नॉस्तोपुलू या माझ्या माहेरच्या आड-नांवाचा अर्थ तोच आहे !' ती म्हणाली.

तिचे वडील संस्कृत भाषेचे संशोधक अभ्यासक असल्याचें आणि तिचा भाऊ याच विषयाचा अथेन्स विद्यापीठांत प्राध्यापक असल्याचें तिनें सांगितलें. इटलींत मिलानमध्यें कुठल्यातरी मोठ्या कार-खान्यांत तिचा अमेरिकन नवरा इंजिनियर आहे. मिलानमध्येंच त्यांचें घर आहे आणि माहेरच्या माणसांना भेटून ती मिलानलाच परत चालली होती. आगगाडींत एक रात्र, एक दिवस आणि दुसरी बहुतेक रात्र काढून तिसऱ्या दिवशीं सकाळीं इटली–ऑस्ट्रियाच्या सरहद्दी-जवळ असलेल्या लुब्लियाना या युगोस्लाव्ह गांवाला मी पोहोंचणार होतों. त्यानंतर आणखीं दहा बारा तासांनीं तिसऱ्या दिवशीं दुपारीं तीन चारला ती मिलानला पोहोंचणार होती.

'मला एक आश्चर्य वाटतं,' मीं थोडयाशा कुतूहलानें तिला म्हणालों, 'एक विमान रद्द झालं नि तीन दिवसांत पुढें विमान नाहीं म्हणून मी हा आगगाडीचा प्रवास करतोंय्, पण तुझ्यासारखी अमेरिकन इंजिनियराची बायको हा अथेन्स-मिलान प्रवास आगगाडीनें कां करतेय् मला समजत नाहीं ! विमानानें दोन दोन तासांत तूं अथेन्सहून मिलानला पोहोंचली असतीस.'



'अगदीं खरं आहे तुमचं म्हणणं', ती गंभीरपणं म्हणाली, 'दीड दोन तासांत पोहोंचले असतें, नि या सुपरक्लास वार्गा-ली डब्यानें प्रवास करून पैशांचीहि बचत होत नाहीं. पण मला दीड दोन तासांत पोहोंचायची इच्छाच नाहीं मुळीं. ग्रीसचा नि युगोस्लाव्हियाचा आजुबाजूचा हा सबंध प्रदेश किती रमणीय आहे हें तुम्हीं पहातांच आहां. हीं रमणीय निसर्ग दृश्यं पहात आरामांत दोन तीन दिवस प्रवास करणं मला फार आवडतं. मी नेहमींच माहेरीं आगगाडीनें येतें. नि आगगाडीनें परत जातें. मी जरा जुनाट मताची बाई आहे !'

'मला वाटलंच !' मी मिस्किलपणें म्हणालों.

'कां हो ?' ती एकदम उद्गारली.

'पाहुण्याला खाऊपिऊ घालण्याची तुझी ही रीत, नि तुझी केशरचना, हें सगळं जुनाटच आहे !' मी म्हटलें.

'केशरचना ?'

'हो, केशरचना,' मी म्हणालों.

'तुझे हे विपुल सोनेरी केंस कापून त्यांचीं शेपटं न करतां किंवा झिपऱ्यांचं टोपलं न करतां तसेंच वळवून त्यांचा छानदार अंबाडा बांधलायस् हें जुनाट नाहीं तर काय ? युरोपांतल्याच काय, पण आमच्या भारतांतल्याही अद्यावत् मुली आतां केसांच्या डबेटोपल्या तरी करूं लागल्यात किंवा बीटनीक्–बीटल छाप, झिपऱ्या छपरं ठेवूं लागल्यात !'

ती किंचित् हंसली आणि गंभीरपणें म्हणाली, 'खरोखरच मी सर्वंच बाबतींत जुन्या मतांची आहे. मला शहरांचा तो अवाढव्यपणा नि गलबला मुळींच आवडत नाहीं. मिलानमध्येंसुद्धां आमची रहा-ण्याची जागा शहरापासून दूर एका छोटया उपनगरांत आहे.'

'तुझा विशेष आवडीचा विषय काय ?' मी विचारलें.

'प्राचीन वास्तुकला नि शिल्पकला,' ती म्हणाली, 'याच विषयाचें विशेष संशोधन करून मी मिलान विद्यापीठाची पीएच्. डी. पदवी घेतलीय्.'

'थिसीस्, इटालियनमध्यें लिहावा लागला असेल ?'

'अर्थात्', ती म्हणाली, 'इटलींत रहातें म्हणून मला इटालियन येतं. नवरा अमेरिकन म्हणून इंग्रजी येतंय, नि ग्रीक तर मातृभाषाच !' एकदम कांहीं तरी आठवण झाल्यासारखें करून अजंठा आणि वेरूळची तिनें पुष्कळ माहिती विचारून घेतली.

संध्याकाळीं साडेसात वाजतां सकाळच्या प्रमाणेंच तिनें शांतपणें चिकन, चीज, फळें, पाक माझ्या टेबलावर आणून ठेवलीं. कसलेच आढेवेढे न घेतां हंसतमुखानें मी तिचे आभार मानले आणि मुकाटयानें खाऊं लागलों.

'आतां तुम्हाला खरोखरच भूक लागलेली दिसतेय् !' ती हंसून म्हणाली.

'उगाच शिष्टपणा करण्यांत मला कांहीं अर्थ वाटत नाहीं' मी म्हणालों.

पहांटे साडेतीन वाजतां मी लुब्लियानाला उतरलों, तेव्हां तिचा निरोप घेणें शक्य नव्हतें.

—प्रा. अनंत काणेकर








साठ वर्षांपलिकडचं तें सुरकुतलेलं पण सुंदर तारुण्य मला म्हणत होतं, "प्लीज! हें घ्याना!" मी कप्ड्यांत ठेवायची सुगंधी पावडर आणि कांहीं अविस्मरणीयही घेतलं—त्या अनामिकेकडून !!



# अनामिका

इंग्लंडचं सौंदर्य खानदानी प्रौढेसारखं आहे. एखाद्या षोडषिचा मादक अवखळपणा तिथं नाहीं. विशींतला उन्मत्तपणा नाहीं. इथं आहे चाळिशीच्या आसपासचं पुष्ठ, संथ सौंदर्य.

तसं पाहिलं तर खुद्द राजधानीचं व्यक्तिमत्वहि बहुरंगी आहे, बहुढंगी आहे. वेस्ट्मिन्स्टर ॲबे नि पार्लमेंटच्या आसपासचं लंडन हे शाही-राजेशाही-साम्राज्यशाही! ईस्ट नि वेस्ट एंड्स्मध्यें तफावत पण सर्वांत मजेदार गोष्ट म्हणजे अत्यंत आधुनिक नि सनातन अशा संप्रदायांची एक गोड सरमिसळ! पेटीकोट् लेन् हें असंच एक जुनं प्रस्थ आहे.

होय! प्रस्थच आहे तें एक! आपल्याइकडचा नळबाझार, चोर बाझार म्हणजेच तिथली पेटीकोट् लेन् मार्केट. तें भरायचं आठवड्यांतून एकदांच—रविवारीं! सकाळीं भरायचं नि दोन-प्रहरीं बिझीनेस् बंद! शंभर-शंभर, दोनदोनशें मैलांवरून मोठमोठ्या ट्रेलरयुक्त गाड्यांतून इंग्लिश कुटुंबांच्या कुटुंब अनंत तऱ्हेचा नवा नि जुना माल भरभरून आणतात. आपल्या इकडल्या जत्रेंत तात्पुरती बांधतात तशीं छप्परी दुकानं मांडून सहा तास विक्री करतात नि दुपारचं जेवण मस्त करून नि तर्र होऊन जातात आपापल्या गावीं!

हजारों जातींची खेळणीं, बिलोरी आरसे, वीजेवर चालणारीं शेंकडों उपकरणं, पंखे, बॅटरीज्, इस्त्र्या, कांचकाम, कपडा, हॅटस्, छत्र्या, ब्रूचीस्, अनंत उपकरणं, कटलरी, यंत्रसामुग्री, चाकू, सुरे, पिस्तुलं, दुर्बिणी, फिल्मस्, लाकूडकाम, अत्तरं, पावडेरी, रेशीम, मखमल, शिवण्याचीं यंत्रं, घड्याळं.... लाखों तऱ्हेच्या वस्तुंचा नुसता खच पडलेला असतो खच!

रविवारीं सकाळीं लवकर न्याहारी उरकून आल्डगेट् ईस्टला मी दर रविवारीं अगदीं नियमितपणें जात असे. त्या स्टेशनच्या एस्क्यालेटरमधून मी वर जो सरसरायचा तो जत्रेला अधीरतेनं जाणाऱ्या एखाद्या शाळकरी पोरासारखाच!

त्यादिवशीं मी प्रथमच गेलों. मला मोठी मौज वाटली. अगदीं जत्रेचं खुलं, हंसतखेळतं वातावरण! गुलाबी थंडी, शरीर नि मन दोन्हीं उत्तेजीत करीत होती. पायांना चाकं लावल्यासारखा मी सरसरत चाललों होतों.

उजव्या हाताला पेटीकोट् लेन! मी औत्सुक्यानें पाहिलं अन् सर्दच झालों. अगदीं सुरुवातीलाच एक लालबुंद, गलेलठ्ठ म्हातारा इंग्रज, तारस्वरांत ओरडत होता, "कमॉन्... कमॉन् बॉईज्....सार्सापरिला... इंडियन् सार्सापरिलाऽऽऽऽ!"

मी चमकून तिकडं पाहिलं. जांभळट पेय भरलेल्या सरबताच्या बाटल्यामागं अत्यंत आनंदी मुद्रेनं तो कोकलतच होता.... सार्सापरिलाऽऽऽ! डॉ. वामन गोपाळ ह्यांच्या सार्सापरिल्याची जाहिरात लहानपणीं सारखी वाचण्यांत येत होती! पण सार्सापरिल्याची भेट ही अशी अनपेक्षितपणें होईल ह्याची कल्पना नव्हती.





अनुक्रमणिका

पण भारतीय मालाच नांव पुकारून तो तें पेय विकत होता म्हणून अस्मादिकानी भारतीय भावनाप्रधानतेनं सरबताचा एक पेला रिता केलाच !

सरबत पितां पितां मी वाजूला पाहिलं. दोनचार दुकानांत कच्च्या कालवांचे ढीगच्या ढीग ठेवलेले. होते. गोरे लोक येत व गोल भजीं खावी तशीं ती कालवं कच्चीच्या कच्ची खात ! जगांतली बहुतेक बेटं इंग्रजानं पादाक्रान्त कां केली त्याचं मानसशास्त्र मला त्यावेळीं उमजल्यासारखं वाटलं!

दहाच्या सुमारास ती जत्रा नुसती फुलली होती. तीन तीन किंवा चार चार बॅंडवाले आपापली पथकं घेऊन मोठ्या सुरेल स्वरांत बॅंड वाजवून, गर्दीतून वाट काढीत नि वातावरण नुसतं धुंद करून टाकीत. कुणी कांहीं दिलं तर ठीक. नाहीतर पर्वा नाहीं ! त्यांच्या भीकेंतहि स्वावलंबनं होतं नि उर्मटपणाचा दर्प होता. मोहमयी नगरांत, दुसऱ्याच विश्वांतून आलेल्या एखाद्या मानवासारखा मी सुन्न होऊन हिंडत होतो. जरा दमल्यामुळें एका कोंपऱ्यांत उभा राहिलों. तोंच एक स्वरूपसुंदर स्त्री माझ्यासमोर ठाकली.

"प्लीऽऽऽज् ! हे. . . हे. . घ्या ना ऽऽ" अत्यंत आर्जवी स्वरांत तिनं एक पारदर्शक कागदांत बांधलेली पुरचुंडी माझ्यापुढं केली.

"हें. . हें काय आहे ?" मी विचारले.

"कपड्यांत ठेवायची सुगंधी पावडर.. छान आहे. . . घ्या. . . घ्या ना ऽऽऽ !"

साहा पेनीज् मीं चटकन् तिच्या हातांत ठेवून पुडी घेतली. तिच्याकडं मी प्रथमच पाहिलं. . . नि स्तिमित झालों. साठ वर्षांपलिकडचं एक वृद्ध, सुरकुतलेलं तारुण्य माझ्याकडं आपले कारुण्यपूर्ण डोळे रोखून पहात होतं !

कां कुणास ठाऊक ? त्या वृद्धेकडं पाहूनच मी विरघळलों. दोन परदेशी नेत्रांत एवढं कारुण्य सांठविलेलं मी प्रथमच पहात होतो. मी झटकन् विचारलं. . . "कॉफी घेणार ?"

"जरूर" ती म्हणाली. .

"चला तर !"

समोरच्याच कॅफेंत आम्हीं बसलों !

"तुम्हांला कोण नाहीं वाटतं ?" .

तिचा चेहरा लालसर झाला. डोळ्यांत पाणी तरारलं. आपला जीर्ण घसा खाकरून ती म्हणाली !

"यंग् मॅन्. . ! नाहीं !"

"म्हणजे ?"

"नवरा पहिल्या महायुद्धांत गायब झाला. . . ."

"मग ?"

"मुलगा मोठा होत होता. . . ."

"मग ?"

"मग मी दुसरं लग्न केलं !"

"मग ?"

"दुसरा नवरा न्यूमोनियानं उचलला !"

"हाऊ टेरीबल ?" मी.

"यस् ! एकुलता एक मुलगा ! तो महायुद्धांत गेला. . . ."

"अरेरे !"

"चालायचंच !"

(६)

तुम्हा आम्हांला भेटलेली अविस्मरणीय स्त्री



(अ) जून यौवनिका

**अधरांत फुलली लाली बाई**
**कवळी ग मुखीं माझ्या नाहीं**
**कलपाची नवी नवलाई**
**'गंगावनां' त मोहरली जाई**
**चष्म्यांविना गवसेना कांहीं**
**कवळी ग मुखीं माझ्या नाहीं.**

"काय म्हणालांत ?" मी आश्चर्यानें विचारलं.

"मी म्हणाले चालायचंच !"

"म्हणजे मी नाहीं समजलों !"

"यंग् मॅन् ! जीवन हें असंच आहे...ते कडू असतं. . . असायचंच.... आपलं आपणच तें गोड करून घ्यायचं असतं..."

"पण. . पण. . आपल्या आयुष्याचा तर हा सर्वस्वी घात झालेला. . . ." माझ्यांतला भारतीय बोलत होता !

"सो व्हाट ? घात ! हूं ! तें मानण्यावर आहे. . ."

"माफ करा ! पण. . . आपला घात झाला नाहीं कां ?"

"असेल ना ! पण. . .पण झुंज द्यावी लागते सारखी ! मी हंसत हंसत द्यावी लागते. . . मी हंसत हंसत झुंज दिली नसती. तर केव्हांच खपले असते. . ."

"कमाल आहे तुमची !"

"कमाल कसली ? आम्हीं इंग्लिश लोक आहोंत बुलडॉग्सारखे ! पाय ठेवूं ती जमीन आमची ! नजर टाकूं तिथलं पाणी आमचं. . . रूल ब्रिटानिया रूल द वेव्हज्. . . . " ती भावनाप्रधान होऊन म्हणाली !

ज्या देशांतली एक सामान्य वृद्धा हें असं आवेशपूर्ण बोलूं शकते त्या देशाचं भाग्य नि महिमा काय वर्णावा ? जाज्वल्य देशाभिमान, कडवी हिंमत, बुलंद उत्साह, विस्तारवादी मनोवृत्ति. . . जगांतल्या एक चतुर्थांश भागावर जे मूठभर लोक नि त्यांचं राष्ट्र इतकी वर्षे राज्य करून आपली हुकमत चालवित होते त्या लोकांमागच्या प्रचंड ताकदीचा साक्षात्कार त्या रविवारीं एका वृद्धेच्या उद्गारांतून हा असा अनपेक्षितपणें झाला.

आतां ती मंद हंसत होती !

"पण. . पण. . . एवढं दुःख तुम्हीं सहन तरी कसं केलंत ?" पुन्हां मी !

"यंग् मॅन् ! आघात होणं. . दुःख होणं ह्याच नैसर्गिक क्रिया ! आनंददायी घटना म्हणजे अपवाद ! गेलीं चाळीस वर्षं ही अश्शी झगडतेय्. . . एकटी ! हिंमत नाहीं खचली ! ती खचणार नाहीं ! दोन युद्धं झालीं. जगाचा नूर पालटला... आमच्या इंग्लंडचा देखील ! हूं ! पण. . . पण माझ्या देशाचा दिल आहे तस्साच मजबूत आहे ह्याची खात्री आहे मला ! यंग् मॅन् ! तूं फारच चांगला आहेस रे ऽऽऽ !"

"थॅंक् यू !"

"केक्स् मागव कीं !"

"मागवती कीं !"

तिनं प्रथम मला केक दिला !

"हें, हें काय? आपण घ्या कीं प्रथम!"

"नाहीं! तूं. .तूं खा आधीं! मग मला बरं वाटेल. . ."

"म्हणजे!"

"म्हणजे हेंच कीं माझा जॉर्ज जर आज ह्यात असता. . .तर. . .तर . . . तुझ्या एवढाच असता रे ऽऽऽ! तूं तूं खा रेऽऽ केक्स !"

म्हणजे. . . म्हणजे जॉर्जला केक्स् दिल्याचा मायाळू आभास मला क्षणभर तरी सुखवील. . !. एवढंच बोलून तिनं तो केक् माझ्या ओंठाशीं लावला! मी तोंड उघडलं नि तिच्या नेत्रांतल्या आसवांनीं अंतर्मनांतल्या अनुपमेय सौंदर्याचा आविष्कार एका विलक्षण अवस्थेंत मी सुन्न मनानं अनुभवीत होतो!!

—वसंत देशमुख

केंब्रिजहून न्यूयॉर्कला जायची
तयारी होते. सामान भरले जाते.
डेव्हच्याच गाडीनें आम्हीं निघणार
असतो. सुझी तिथें उभी असते.
तिचे डोळे सुजलेले असतात.
ती हुंदके देते. डेव्ह विमनस्क होतो.
एका **'परदेशी सैंय्या'**ला उत्कट
प्रीति देणारी ती **'सुप्रिया'**....



# सुझी

**निर्मलाला** भारताकडे जाणाऱ्या विमानांत बसवून मी तिचा निरोप घेतला. तिच्या गैरहजरींत न्यूयॉर्कला राहण्यांत त्याक्षणीं कांहीं रस वाटत नव्हता. म्हणून तसाच बॉस्टनला विमानानें आलो. केंब्रिजला घरीं पोहोंचायला रात्रींचा एक वाजला. मग टेलिव्हिजनवरचा सिनेमा पहात बिछान्यावर पहुडलो. तीन वाजतां तोहि संपला. पण झोप येईना. निर्मलाविना घर अगदीं रितं रितं वाटत होतं. शनिवारीं संध्याकाळनंतर तिचा फोन यायला हवा होता. म्हणून फोनची वाट पाहात घरींच थांबणें भाग होते. रात्र झाली. फोनची ट्रिंगट्रिंग कांहीं होईना. दार वाजल्याचा दोनतीन वेळां आवाज झाला. वाटले, तारवाला असेल. पण पाहतो तर शेजारचीच बेल वाजलेली. या जीवघेण्या प्रतीक्षेची मला भयंकर चीड आहे. त्यामुळें वैतागून निर्मलाला कांहीं विशेषणें मनांतल्या मनांत मोजलीं. रविवारी सकाळीं मग तसाच हार्वर्ड स्क्वेअरमधल्या न्यूज स्टॉलवर गेलों. न्यूयॉर्क टाइम्स व हेरॉल्ड ट्रिब्यूलनचे 'रविवारीय गठ्ठे' आणले आणि ते चाळत बसलो.

मग घरांत बसवेना. बॉस्टनला जाऊन एखादी 'अॅडल्ट मूव्ही' बघावा. 'न्यूडी' असली तर उत्तमच.

यंदाचा हिंवाळा लांबलेला होता; त्यामुळं स्प्रिंग येऊनही अजून बर्फाचे ढीग अधुनमधून उरलेले होते. पण आज ऊन चांगलं होतं. ओव्हरकोट नसला तरी चालेल म्हटलं.

एकच ब्लॉक चालून गेलों असेन; तेवढ्यांत एक कार अगदीं मला खेटून उभी राहिली. मी गोंधळलों. कानावर हांक आली, "शंकर."

मी पाहिलं तर डेव्ह होता. त्याच्याच शेजारी एक पोरगी बसलेली होती. माझी तिची नजरभेट होतांच ती गोडशी हंसली. अमेरिकन मुली हंसतात आकर्षकपणें.

"कुठं चाललायस तूं?" डेव्ह मला विचारत होता, न्यूयॉर्कहून एवढ्या लौकर परतशील अशी कल्पना नव्हती मला. फोन कां नाहीं केलास?"

त्याच्या त्या सरबत्तीला अडवणं सोपं नव्हतं.

"निर्मला नसल्यामुळं कसं वाटतंय्?"

"कसंसंच—अगदीं रॉट्न्".

डेव्हची बायको न्यूझीलंडमध्यें आहे. तिला येतांना त्यानं बरोबर आणलेलं नव्हतं.

"अन् आत्तां हा कुठं चाललायस्?"

"बॉस्टनला—एखादं पिक्चर बघावं म्हणतोय्."

"मग बस कीं गाडींत. मी तुला राइड देतो."

माझें लक्ष त्या मुलीकडे जाते. बसावं कीं बसूं नये?

तेवढ्यांत डेव्ह पुन्हां म्हणाला, "अरे तुझी ओळख करून द्यायची राहीलीच. ही सुझी – ये ना – हा शंकर."

खिडकींतून तिनं हात पुढं केला. मीहि मग तो हातांत घेतला. "तुला भेटून आनंद झाला"ची उजळणी झाली. इतक्यांत सुझीनेंच दार उघडलें. "इथं फ्रंटलाच बसा."

मी आंत शिरलों. ती डेव्हच्या बाजूला सरकली. "निर्मलाला भेटायचं होतं माझ्या मनांत. पण तें राहूनच गेलं. मेरी-अॅन सांगत होती की, ती फार सुंदर दिसते." मेरि-अॅन आमच्या ऑफिसांतली सेक्रेटरी.

डेव्हनं खुलासा केला, "ही मेरि—अॅनच्याच बरोबर अॅपार्टमेंट शेअर करते."

"ओ – तरीच! मग या आधींच आपली गांठ पडायला हवी होती."

"तुझ्या त्या इंडियन पार्टीवर मेरी—अॅन भलतीच खुष होती हं. रात्रीं तिनं कित्तीतरी वेळ त्या पार्टीचं गुणगान चालवलं होतं.










साडी नेसण्याची तिला भारी हौस. मला हि नेसून बघायचीय् – थ्रिलिंग."

"डेव्ह, तूं कुणीकडे चालला आहेस?"

"असंच भटकायला. स्प्रिंग मधलं पहिलं ऊन पडलंय्. चार्लस्च्या कांठाकांठानं फिरूं या थोडं."

"शंकर, तुला सिनेमाला गेलंच पाहिजे का ?" सुझीनं विचारलं.

"कुठंतरी वेळ घालवायचा–"

"मग जॉन उपडाइक काव्यवाचन करणार आहेत, चलणार कां?"

"जॉन उपडाइक – तो इथं असतो? मी त्याचं वाचलंय् कीं–"

ती मग माझ्या हातांत 'बॉस्टन ग्लोब'मधलं कात्रण देते. इप्सविचच्या 'किंग्ज् रुक्' नामक कोणा एका वलयांत रेव्हरंड रीब यांच्या कुटुंबियांच्या मदतीसाठीं कार्यक्रम होता. त्यावेळी अमेरिकेंतील कांहीं नामवंत लोक–गायक–गायिका येणार होत्या. जॉन उपडाइकहि आपलं काव्य वाचन त्यावेळीं करायला तयार झालेला होता.

"हें इप्सविच कुठें आहे?" मी विचारलं. "मी तिथेंच येईन पाहिजे तर."

"इथून चाळीस मैलांवर–"

"नाहीं बुवा – मग तूंच राइड दिलीस तर जमणार–!"

"मग आपण असं करूं. आतां थोडा वेळ चार्लस्वर फेरफटका मारूं. कुठंतरी जेवण घेऊं. अन् सरळ इप्सविचला जाऊं. कार्यक्रम साडेआठला आहे. सातला तरी निघायला हवं." सुझीमधली गृहिणी सारे तपशील झटपट ठरवत होती.

तिचा बेत फक्कड होता. पण मी डेव्हला म्हटलं, "डेव्ह, तूं पाहिजे तर मला इथं सोड. सातला माझ्या अपार्टमेंटवर ये. मग आपण जाऊं–जर माझी तुला आतां अडचण असेल तर. आय डोन्ट वॉन्ट टू स्पॉईल युवर–"

"डोन्ट बी सो सिली–!"

सुझी डेव्हला दिशा दाखवत होती. डेव्हहि नवऱ्याप्रमाणें तिच्या त्या सूचना ऐकून घेत होता.

त्या दिवशी चार्लस्वर तरुण-तरुणींची ही रंगदार जत्रा भरली होती. बरीच जोडपीं चार्लस्च्या कांठावरच्या हिरवळींत लेटलेली होती. आपल्या द्वैताचा निरास करण्याच्या प्रयत्नांत होती. कुणीं मधूनच चुंबनांची धमाल उडवीत होती. कुणी एकमेकांवर रेलून चालले होते. आंखूड चड्ड्या-बिनबाह्यांचे ब्लाऊझ – वसंताच्या पहिल्या उन्हाच्या तेजांत जास्तींत जास्त अंग मोहरून निघायला हवें ना! वारक्या वारक्या बोटी चार्लस्मध्यें इकडे-तिकडे चालल्या होत्या.

आम्हीं त्या हिरवळीच्या थोडें पुढें गेलो. एम्. आय. टी.–जवळ गेलो. कार पार्क केली; आणि खालीं उतरलो.

सुझीनें 'काऊ-बॉय' टाइपची गुडघ्यांना जेमतेम झांकणारी पॅंट घातली होती. अंगांत पांढरा शर्ट होता. किंचित मळलेला.

डेव्ह म्हणाला, "आपण पळायची शर्यत लावूंया."

डेव्ह पाठोपाठ सुझी धांवते. त्याला गांठीपर्यंत तिली धांप लागते. तो मग थांबतो. तिचे हात हातांत घेऊन तो परत फिरतो.

मी आधीं पळतच नाहीं. त्यांच्याकडे चालत जातो.

मग आम्हीं सपाट दगड गोळा करून चार्लस्च्या कांठाला असलेल्या एका बीअरच्या डब्याला मारूं लागतो. मी त्यांना भाकरी करायची क्रिया दाखवतो. तीहि त्याचें अनुकरण करतात. पण जमत नाहीं. त्याचा नाद ते सोडून देतात.

मी सिगारेट शिलगावतो. सुझी आपली पर्स धुंडाळते. पाकिट रिकामें असतें.

"तुला हवीय् का सिगरेट?" म्हणून मी पाकिट पुढें करतो. ती घेते. मी ती पेटवतो.

"सुझी, तुझं गांव कुठलं?"

"मिशिगन".

"खरंच. माझा एक मित्र तिथं होता–स्टेट कॉलेजमध्यें."

"मीहि बी. ए. तिथंच झालें कीं मग–!"

"मग इथं तूं कसलं काम करतेस?"

"शाळेंत शिकवते."

"तुला आवडतं हें काम?"

"मला मुलं आवडतात. त्यामुळं शिकवायला गंमत वाटते."

हवेंत गारठा येतो म्हणून आम्ही परततो.

केंडल स्क्वेअरमधून केंब्रिज स्ट्रीटकडे डेव्ह गाडी घेतो. "घरीं जाऊन कपडे बदलायचेत हं मला–" मी डेव्हला सांगतो. सुझी हंसते. दाढीवरून हात फिरवत मी तिला म्हणतो, "आज दाढीहि केलेली नाहीं मी. मला काय माहित तूं अशी अवचित भेटणार आहेस!" ती कोपरांनं मला ढोसते. कृतककोपानें.

"शंकर, बीअर घेणार कां?"

डेव्ह खरं म्हणजे माझ्या उत्तरासाठीं न थांबतांच गाडी उभी करतो.

"हा मॅक्बिन्ले बार–मी घरीं नसलो तर हमखास इथं सांपडतो–" डेव्ह मला डोळे मिचकावत सांगतो. "एक आयरिश गृहस्थ हा बार चालवतो. फार जॉली माणूस आहे."

तो बार तसा कळकट वाटतो. टेबलं-खुर्च्या जुनाट असतात. आम्ही दारापासून जरा आंत असलेल्या टेबलाजवळ जातो. सुझीसाठीं मी खुर्ची मागें करतो. 'थॅंक् यू' म्हणत ती स्थानापन्न होते. तेवढ्यांत त्या बारचा मालक येतो. डेव्ह त्याला माझी ओळख करून देतो. "ओ; यू आर आल्सो ए नीमॅन फेलो–फॉम

(७)

तुम्हा-आम्हांला भेटलेली अविस्मरणीय स्त्री

**आळसिका किंवा आधाशिका**



**कोचांत झोपली सताड उघडें पोट**
**पसरली परंतु मुळी न मिटतां ओठ**
**लागला 'घोर' जणुं खर्ज पावसाळीं**
**ताटांत राहिल्या फक्त केळीच्या साली**







अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

इंडिया – हाऊ वंडरफुल!" तो शेकहँड करतो.

सुझी तिथं सराईतपणें वावरते.

बीअरचे ग्लास येतात. "टु अवर फर्स्ट मीटिंग" मी ग्लास वर करतो. सुझी-डेव्हहि त्यांत सामील होतात. मग इकडच्या–तिकडच्या बऱ्याच गप्पा होतात.

डेव्ह जिथं जातो तिथं आपल्या खुणा ठेवून जाती. माझं उलटं आहे. कधीं काळीं या तटावर माझे पाय उमटले होते हें कुणालाच कळूं नये असं माझं चालतं. लहानपणापासून. स्वतःला पुसून टाकायचं शक्य तितकं.

त्या रात्रींचा 'किग्ज् रुक'मधला कार्यक्रम पाहून अमेरिकेंतल्या तरुण पिढीचें एक नवें साक्षात्कारी दर्शन होतें. त्यांत भाग घेणारे कांहीं निग्रो गायक असतात. आफ्रिकन लोकगीतांच्या धारणीवरचें त्यांचें गायन-वादन. राठ-आक्रमक पण अस्वस्थ करणारें. कांहीं तरुण अमेरिकन गायकहि त्यांत होते. सुझी त्या पिढींतलीच. ती त्यांत विलक्षण रंगते. त्यांतलीं कांहीं गाणी तिला माहित असतात. ती तीं गुणगुणते. माहित नसतात तीं. ती लक्षपूर्वक ऐकून ध्यानांत ठेवते. मला त्यावरची कॉमेंटरी सुनावते. डेव्ह अमेरिकनांचा कट्टर टीकाकार आहे. जॉन उपडाइकचें कविता वाचनहि जोरदार होतें. 'वन्स मोअर'चा त्याला आग्रह होतो. तो त्याला मान तुकवतो. लांबेल्या नाकाचा, कांहींसा बावळा दिसणारा हा तीस-बत्तीसचा तरुण–त्याची बायकोहि त्या कार्यक्रमाला उपस्थित असते. त्याचें गाणें ऐकून आम्हीं निघतो.

सुझी ड्रायव्हिंग करायला बसते. ती भलतीच टेन्स असते. रात्रीं घरीं यायला बारा वाजतात. दोघांना मी म्हणतो, "चलताय् कां वर? कांहींतरी ड्रिंक घेऊं."

सुझी गाडीतून बाहेर पडणार असें दिसते. पण तेवढ्यांत थांबते. "अरे, मला उद्यां सकाळींच शाळा आहे–तेव्हां आतां नको."

मी तिचा हात दाबून म्हणतो, "आजचा दिवस फार छान गेला हं सुझी!"

तिची गाडी सुरूं होते. मी घरीं येतो. ★★★

वसंताला आरंभ झाल्यानें आम्हां नीमन फेलोंची पिकनिकस् दर रविवारी असत. केंब्रिजपासून कुठें तरी लांब जायचें. बेसबॉल-फुटबॉलची 'पिकनिक' आवृत्ति आम्हीं खेळतो. मला बोलवायला डेव्ह यायचा, त्याच्याबरोबर सुझीही असायची. "ए, आज तूं कांहीं बरोबर घेऊं नकोस हं. मी तुझ्यासाठीं घेतलंय् जादा. तुला हॅम सँडविच चालेल ना? . . ." "शंकर, तुझ्याकडे बीअरचे किती कॅन्स आहेत? माझ्याकडचे आज पुरणार नाहींत". "आतां तुझं तें इंडियन पिकल घ्यायला विसरू नकोस हं – मला फार आवडतं तें."

आम्ही नीमन फेलो एकमेकांना जेवायला बऱ्याच वेळां बोलवायचो. डेव्ह त्यावेळीं जेवायला असला तर सुझीहि त्याच्याबरोबर असायची. पार्टयांच्या वेळींहि सुझी हजेरी लावायची. त्यांतली एक पार्टी मला विशेष आठवते. सुझी त्यावेळीं मोठा नखरेबाज पोशाख करून आली होती. निळसर जॅकेट अन् स्कर्ट. अन् वर अत्तराचा घमघमाट. केसांचीहि नवीच रचना होती. मी तिला म्हटलं, "सुझी, आज थाट औरच दिसतोय्. छान दिसतेस तूं."

"थँक् यू' म्हणत ती मनसोक्त हंसली.

त्या पोशाखांत ती स्मार्ट दिसते. उपवर वाटते.

मनांत विचार येऊन जातो, डेव्हला ही कितपत ओळखते? त्याची बायको लौकरच परतणार आहे हें तिला माहित आहे का?

पण हे प्रश्न तिथें कुणी विचारत नाहींत; विचारले नसतील. अमेरिकेंत हें सारे गृहीत धरून चालतात कां? कुठल्याहि नीमन फेलोनें–त्याच्या बायकोनें डेव्ह–सुझीबद्दल चोरट्या आवाजांत कधीं बोलल्याचें माझ्या पाहण्यांत नाहीं.

एकदां डेव्हनें आणि केंडलनें मिळून पार्टी दिली. केंडलच्या घरीं नीमन फेलो तर होतेच. त्या दोघांचे कांहीं दोस्तहि होते. सुझी त्या दिवशीं विलक्षण खुषींत होती. आपला कॅमेरा ती घेऊन आली होती.

मी गेल्या गेल्या सुझीनं मला विचारलं, "शंकर, आज काय घेणार तूं?"

"तूं देशील तें."

ती म्हणते, "तुला सरळ उत्तर माहीतच नाहीं का रे?"

"मग म्हणणं काय तुझं. सुझी, अशी रागावूं नकोस."

"नाहीं रे, मला किनई बघायचंय्–तुला जरा दारु चढलेल्या अवस्थेंत."

"यू लिटल् डेव्हिल–मिसचिफ्–मॉंगर–" मी तिच्या पाठीवर एक हल्का रट्टा देत म्हणालो, "तुला कांहींतरी नवी करमणूक बघायची असेल तर प्रयत्न करतो मी. मलाहि जाण्यापूर्वी एकदां पूर्ण चढल्याचा अनुभव घ्यायचाय्–"

तेवढ्यांत रे जेनकिन्स माझ्याजवळ येतो. मी त्याला सांगतो, "या खट्याळ सुझीला मला झिंगलेला बघायचंय्".

तो उत्तेजित स्वरांत म्हणतो "गुड आयडिया".

मी साळसूदपणें विचारतो, "मग तूंच सांग, काय घेऊं म्हणजे मी लौकर ऑफ होईन?"

तो म्हणाला, "मॅनहटन–आजचं खास ड्रिंक आहे तें–"

( पृष्ठ १२६ वर पहा ).











पांढरेशुभ्र **डेट**च तुमचे कपडे स्वच्छ नि पांढरेलखलखीत करू शकेल. डेटने तुमचे रंगीत कपडेही काहीही अपाय न होता स्वच्छ निघू शकतात. ही किमया आधुनिक **डेट**च सहजपणे करू जाणे! अन् तोहि कपड्यांच्या तंतूना एवढासासुद्धा अपाय न करता.

***स्वस्तिक*** ऑईल मिल्स लि. मुंबई.










पोटांतली भीति आंतल्या आंत दडवून झपाझप पावलें टाकीत मी गल्ली पार केली आणि इजाफा मंझीलच्या दोन दोन पायऱ्या ओलांडीत पहिल्या मजल्यावर येऊन क्षणभर थांबलों. सुटकेचा दीर्घ निःश्वास सोडला. धाप थांबली तशी मी दुसरा मजला चढायला सुरुवात केली.

भीतीनें थरकांप उडावा असेंच त्या गल्लीचें वातावरण. गल्लीच्या अगदी तोंडाशीच पठाणांच्या पांच पंचवीस खाटा. त्यांची आपसांतली कुजबूज. संशयी नजरा. जरा पुढें गेले कीं, बेवड्याचा वास. पिऊन जाम झालेले, झोकांड्या खाणारे कांहीं नशाबाज. तियेंच डाव्या बाजूला फुटपाथवर जुगाराचा अड्डा. उजव्या हाताला तीन चार तर्र झालेल्या वेश्या एकमेकांच्या झिज्या ओढीत भांडताहेत. भोंवती त्यांना चिथावणाऱ्या वेड्यांची गर्दी. कुणी चंडोल ओढताहेत. कुणी चरस पिताहेत.

त्या पलीकडे सावजावर उडी मारायच्या पवित्र्यांत असल्यासारखे सिगारेटच्या धुराकडे किलकिले डोळे करून बघण्याचे नाटक करीत फुटपाथवर बसलेले चपटचा नौकांचे चिनी मवाली. गल्लीभर रंगसफेतीवाल्यांचा बाजार.

रात्रीच्या अंधुक लालट प्रकाशांत हें सारे अधिकच भयानक वाटे. इजाफा मंझीलकडे जायला हाच एक रस्ता सोयीचा होता. दुसरा रस्ता याहून भयंकर. तिकडून जाणें हें एक मोठें दिव्यच होते. शिवाय त्याचा वळसाहि फार मोठा होता. इजाफा मंझीलकडे जाणारेहि याच गल्लीतून जात असत. त्या इमारतींत जाणाऱ्या येणाऱ्यांच्या केसाला आजपर्यंत कुणी धक्का लावलेला नव्हता. आणि या गल्लींतील लोकांनीं पादचाऱ्यांच्या वाटेला जाऊन त्यांचे नुकसान केल्याच्या कथाहि ऐकल्या नव्हत्या. त्यामुळें या गल्लीच्या तोंडापर्यंत मी निश्चित मनानें येई; पण गल्ली पार करीपर्यंत मात्र जिवांत जीव नसे.

इजाफा मंझीलच्या पहिल्या मजल्यावर थांबणे म्हणजे चूड पेटवून वुद्धया भुतांना आमंत्रण केल्यासारखेंच. या इमारतीच्या

**इजाफा मंझिलच्या तिसऱ्या मजल्यावरच्या कोठीवर चांदकडून मी ती ठुमरी प्रथम ऐकली—'कित गयो बावरी बना....'**

**बऱ्याच वर्षांनीं पुन्हां कोठीवर गेलो. आणि पुन्हां चांदच म्हणत होती—कित गयो........पण हे बोल ऐकतांना माझं काळीज पिळवटलं.**

# कित गयो बावरी बना

—गोपालकृष्ण भोबे

पहिल्या व दुसऱ्या मजल्यावर कुंटणखाने होते. जिन्याच्या पायऱ्या वाजल्या रे वाजल्या कीं, बिळांतून घुशींनी तोंडें बाहेर काढावी तशा रंगलेल्या वारांगना पडद्याबाहेर मुखडे काढून अंदाज घेत असत. आणि त्यांच्याकडे न बघतां माणसानें दुसऱ्या मजल्यावर चढायला सुरुवात केली कीं, त्या पडद्याआड होत; परंतु पहिल्या किंवा दुसऱ्या मजल्यावरील कठड्याकडे जरा कुणीं घुटमळला कीं, फिदी फिदी हंसत, मुरकत मुरकत पंधरा वीस जणींचा घोळका भोंवती जमा झालाच; पण "मुन्नीबाई के यहां जाना है !" एवढे शब्द त्यांच्या कानावर पडले किंवा या वाक्यांतला पहिला शब्द ऐकायचा अवकाश कीं, डोळ्यांच्या पापण्या लवायच्या आंत जिकडे तिकडे शुकशुकाट. असें वाटायचें कीं, हे दोन्हीं मजले रिकामेच असावेत.

तिसऱ्या मजल्याच्या—मुन्नीबाईच्या कोठीवर जायच्या जिन्याजवळ पोहोंचल्यानंतर मात्र या वकाल वातावरणाचा, अंगावर कांटा उभा करणाऱ्या दृश्यांचा विसर पडायचा. जादूनें भारल्यासारखी स्थिति व्हायची. कोठीच्या मोठ्या दरवाजांतून जिन्यावर झिरपलेला निळसर प्रकाशझोत; अनेक फुलांच्या राशींतून यावा तसा मिश्र मादक सुगंध; आणि हॉलमधील मैफलींतील धुंद स्वरांनी गात्रन् गात्र चेतनेनें भरून जाई.

मुन्नीबाईची ही कोठी म्हणजे बड्या बड्या कलावंतांचे आश्रयस्थान; रईस, अमीरांचें चार दोन घटिकांचे ते आराम केंद्र—डोळे दिपून जावे असें त्या कोठीचे वैभव. बघावे तिकडे किनखाब आणि रेशीम. हंड्या झुंबरांचे लोलक हिऱ्यामाणकांसारखे चमचमणारे. उंची उंची वस्तूंनीं या कोठीचा कोपरान् कोपरा भरलेला. एकेका वस्तूकडे डोळे भरून पाहात राहावें. दौलत आणि संगीत या दोन शक्ति इथें पाणी भरीत होत्या अखंड नाद करीत !

डाव्या कोपऱ्यांत मुन्नीबाई एखाद्या राणीसारखी लोडाला टेकून बसलेली असे. रामव्वा व शबनम् या दोन दासी पान लावीत तिच्या आजूबाजूला उभ्या. उजव्या कोपऱ्यांत काहीं खानदानी कलावंत हुक्का पीत बसलेले. बैठकीवर साजिंदे आपसांत हलक्या आवाजांत चर्चा करीत असलेले. दारांत पाहुणा दिसला कीं – 'आइये, तशरीफ लाइये !'ची सलामी.\. . . .

मुन्नीबाईकडे रोज नाचगाणें व्हायचें नाहीं. आठवड्यांतून तीन दिवसच मैफल असायची. तशी ओळख असल्याशिवाय इथें प्रवेश मिळायचा नाहीं. रईस, अमीर आपले खास पाहुणे इकडे घेऊन यायचे. त्यांचे देणे घेणें सारे परस्पर व्हायचें. एखाद्याकडून बेहोषीनें बक्षिसी फेंकली जायची ती साजिंद्यांवर. गाणाऱ्या किंवा वाजविणाऱ्या मुख्य कलावंतावर नव्हे. पाहुण्या कलावंतांचे गाणें वाजविणे झाले कीं, मुख्य कार्यक्रमाला सुरुवात होई. या कार्यक्रमाची डोळ्यांत प्राण आणून सगळेच वाट बघत असत.

पाहुण्यांच्या कॉफी शरबताच्या आणि पान विड्याच्या देवघेवींत जो वेळ जाई तेवढ्यांत नोकरांकडून बैठकीवर नवा रुजामा अंथरला जाई. रेशमी अभ्र्यांचे गोंडेदार तकिये व्यवस्थित लावले जात. सारे झगझगीत दिवे मालवले जात. मंद निळा प्रकाश फाके. आणि किनखापी पडदा बाजूला करून उमललेल्या गुलाबासारखी टवटवीत, बदामी डोळ्यांची, दुधाळ कांतीची, जडावाच्या दागिन्यांनीं नखशिखांत मढलेली चांद, चांदीच्या नूपुरांचे छुम छुम लयदार पदन्यास टाकीत बैठकीवर येऊन बसत असे.

"आइये चांद वाला; आइये !"

आपले बदामी डोळे सर्वांवरून फिरवीत किंचित् हांसून, किंचित् मान लववून चांद, त्या उत्थापनाचा स्वीकार करी. सारंगीच्या तरफा सुरांत लावून होईपर्यंत मागच्या जलशांच्या चर्चा व्हायच्या. एकेकाळीं मुन्नीबाईनीं याच कोठीवर गाण्यांच्या ज्या इंद्रसभा फुलविल्या त्यांच्या आठवणी निघत. आईपेक्षां बेटी कशी सवाई निघाली आहे याचीं वर्णनें होत. चांदच्या एकेका ठुमरीची आणि अर्थपूर्ण अदाची मनमुक्त स्तुति व्हायची. त्या स्तुतीचा स्वीकार मुन्नीबाई करी. चांद मान वर करून कुणाकडेहि पहात नसे. ती विनयाची पुतळी हॉलमध्यें प्रवेश करतांना सुरुवातीला एकदां लोकांकडे पाही तेवढेंच. गाणें सुरु करतांना मुन्नीबाईची आणि उजव्या कोपऱ्यांत हुक्का पीत बसलेल्या खांसाहेबांकडून ती आज्ञा घेई.

पण ठुमरीला सुरवात झाली रे झाली कीं, कुणीतरी स्प्रींगची किल्ली फिरवून सोडून द्यावी तसें तिचें नवांग लवलवूं लागे. गाणें सुरू होण्यापूर्वीची चांद आणि गाणें सुरू झाल्यानंतरची चांद यांत जमीन अस्मानाचा फरक जाणवे. ठुमरीला सुरवात झाली कीं, श्रृंगार ओसंडून वाहायचा. जीवनांतला रस मुक्तपणें अनुभवण्याच्या ऊर्मी फुटायच्या. साऱ्या बंधनांचा विसर पडायचा. विनोदी गझल म्हणतांना हास्य खदखदून फुटायचे. कारुण्यभाव तर सुस्कारे सोडायला लावणारा, क्षणांत क्रोध. क्षणांत लटका रुसवा; क्षणांत विलासी दृष्टि; क्षणांत लज्जा—

"लट उलझी सुलझा जा रे बालम,
हाथन मेरे मेंहदी लगी है ।।धृ।।

"प्रिया, अरे माझ्या केसांची बट सुटून ती कपाळावर आली रे;












अनुक्रमणिका

ती जरा सारखी कर ना ! माझे दोन्हीं हात मेंदीनें भरलेले असल्यानें मला ती सारखी करतां येत नाहीं. अरे, या अवस्थेंत मी माझ्या माथ्यांतली बिंदी देखील लावूं शकत नाही." तुझ्या हातांनीं ती लाव ना !"

हाय हाय ! सुईसारखा निकोप आवाज, आणि शब्दाशब्दाला अर्थपूर्ण हाव भाव. जीव कुर्बान करीत असत लोक त्या ठुमऱ्यांवर; पण सगळ्यांचा जीव गुंतलेला असे आणखी एका ठुमरीवर, ती ठुमरी ऐकतांना अनेकांचीं साखळलेली जीवनें प्रभावी होत. अनेकांचीं सुप्त दुःखें विरली जात. अनेकांच्या दवलेल्या भावना पेटून उठत. सगळ्यांचा शिणवटा घटून जाई. ती ठुमरी चांद सर्वांच्या फरमाइशीनें आणि आग्रहानें सर्वांत शेवटीं गायची—

"कित गयो बावरी बना. . ." षड्जांत ती भिनली कीं काळजांचं पाणी पाणी करून टाकी. खरोखरीची ती बावरी झालेली असायची. तिचे डोळे, तिचा चेहरा, तिचें अंगप्रत्यंग बावरें-वेडें-पिसे झालेले दिसायचे.

'कुठं गेला. . . . कुठं गेला माझा जिवाचा सखा ? मी वेडीपिशी झालेली आहे हो. . . मला चैन नाहीं ! तो वेष पालटून एकाकीं असा कुठं गेला. त्याच्या कानांत कुंडलं आहेत, त्यानं गळ्यांत वनमाला घातलेली आहे; आणि अंगाला विभूत लावलेली आहे. अशा विचित्र वेषांत तो गेला कुठं ? अहो मला सांगा, मी खूप दमलेली आहे. . . मी बावरी झालेली आहे. . . . . !'

* * *

बेनीलाल तबल्याच्या साथीला बसूं लागल्यापासून चांदची ही ठुमरी विलक्षण रंगूं लागली. भावनातिरेकानें तिच्या डोळ्यांतून अश्रूंचा प्रवाह वाहूं लागे. अभिनय तर इतक्या पराकाष्टेचा कीं, अंगावरचा एकेक किमती अलंकार काढून चांद तो इतस्ततः फेंकून देत असे. ते एकत्र करतां करतां रामव्वाची त्रेधा तिरपीट उडत असे. हातांतले बिलवर, बांगड्या, बाजुबंद, बोटांतली हिऱ्याची आंगठी असें करतां करतां शेवटीं पायांतले चांदीचे नुपूरहि ती फेंकून द्यायची. बेफामपणें केस मोकळे सोडून केसांवर माळलेल्या फुलांच्या सुगंधी वेण्याहि ती कुस्करून टाकी.

ठुमरी संपली कीं, चांद दुःखावेग असह्य होऊन मागच्या लोडावर मान टाकून स्फुंद स्फुंदून रडत असे. मग तिचे सांत्वन करीत मुन्नीबाई आणि दासी रामव्वा तिला धरून आंत घेऊन जात. गाणें ऐकायला आलेले लोक सुस्कारे सोडीत "काय ही तन्मयता, काय हें स्वर्गीय संगीत !" असे उद्गार काढीत उठत; आणि क्षणार्धात कोठी रिकामी होई. किती तरी वेळ 'कित गयो बावरी बना' हे शब्द तिथे सुरांत गुंजू लागत.

बेनीलाल कोठीवर वाजवायला येऊं लागल्यापासून चांदच्या ठुमऱ्या पूर्वीपेक्षां चौपटीनें अधिक रंगूं लागल्या. चांदची ठुमरी श्रेष्ठ कीं, बेनीलालचा तबला श्रेष्ठ अशी तुलना होऊं लागली. ठुमरीचा भराव सुरूं झाला कीं, तबल्यावरील ठेक्याची गति अशी मृदु मंद चाले कीं, वाटे याच्या हाताला वेग कसा तो नाहींच. पण दुगण सुरू झाली कीं, तबल्यावरची बोटे चौपटीनें आठपटीनें अशीं नाचूं लागत कीं, तर्जनी हालते आहे असें वाटत देखील नसे. चांदच्या रसपूर्ण हावभावांसारखाच तबलाहि हावभावानेंच बोलत राही.

बेनीलाल सिनेमांतल्या एखाद्या मर्दानी हिरोसारखा दिसायचा. उत्तर हिंदुस्तानी तांबुस गोरेपणा, सरळ नाक, पाणीदार डोळे, रुंद कपाळ, उलटे फिरवलेले मानेवर किंचित मोंगली पद्धतीनें वळवलेले केस. बैठक रुबाबदार. केवळ तबला वाजविण्याकरितांच जन्माला आल्यासारखे त्याचे वागणे. मैफलींत तो कुणाकडेहि बोलायचा नाहीं. त्याच्या वादनाची तारीफ झाली कीं, मंद हंसायचा. चांदकडे डोळे वर करून त्यानें पाहूंच नये.

एखादा सुरेल मुखडा घेऊन तो समेवर आला कीं, कोपऱ्यांत हुक्का पीत बसलेले उस्ताद म्हणायचे— "जियो बेटा, जियो ! इसको कहते हैं तालीम ! तुम्हारे दादा, परदादा भी बहोत नामनी उस्ताद हो गये बेटा; मगर कुदरतने तुम्हें जो खुबसुरती दी है वैसी खुबसुरती हमने आजतक न देखी न सुनी !"

उस्ताद असें वारंवार बोलत. बेनीलाल उजव्या बाजूला वळून मूकपणानें उस्तादांना वंदन करी; पण चांद मात्र मूड गेल्यासारखी दोन आवर्तनें संपेपर्यंत बेनीलालच्या चेहऱ्याकडे, त्याच्या फुरफुरणाऱ्या बोटांकडे खिन्न नजरेनें पाहात राही. तिला काय होत होतें. कोण जाणें अलीकडे 'कित गयो बावरी बना' ही ठुमरी गातांना भावनावेगानें इतस्ततः फेंकले जाणारे अलंकार ती बेनीलालच्या अंगावर फेकूं लागली. आणि एकदां तर भर मैफलींत आपल्या बोटांतील आंगठी दूर भिरकावण्याऐवजीं तिनें ती बेनीलालचा बायावरील हात पकडून त्याच्या करंगळींत सरकवली. मैफलींत त्यामुळें चेष्टा झाली.












चांदचें तसें वागणें सर्वांनांच विचित्रपणाचें वाटलें. कांहीं चांगल्या रईसांनीं कांहीं घडलेंच नसल्यासारखी ही गोष्ट वाऱ्यावारी नेली. बेनीलालनें तावडतोब तिथल्या तिथें ती अंगठी रामव्वाकडे परत केली; पण मुन्नीबाईचा चेहरा गंभीर झाला. कांहींतरी मर्यादे-बाहेरचें घडतें आहे असें तिला वाटूं लागलें. कधीं अनुभवलें नव्हते, असें एक नवें शल्य अंतःकरणाला टोचलें. सलत राहिलें.

चांदसारखीच मुन्नीबाईदेखील यौवनांत असतांना एके काळीं कोठीवर येणाऱ्या अमीर रईसांना आपल्या गानाभिनयानें रिझवीत होती. या कोठीला इभ्रतीची परंपरा होती. प्रणयाच्या नाजुक भावनांना इथें थारा नव्हता. तसल्या फुकटचा गोष्टींचा वास देखील लागूं नये याची पूर्ण दक्षता डोळ्यांत तेल घालून अष्टौप्रहर इथें घेतली जात असे. पैसा खर्च करण्याची ताकद असलेल्यांनीं इथें फक्त नृत्य गायनासाठीं यावें. एखाद्याच्या थोड्याशा लोचटपणाची वा बुभुक्षित नजरेची शंका आली कीं, त्याला कोठीवर कायमचा मज्जाव झालाच. सभोंवताली कामकर्दमाची नदी वाहात असतांना, शिवाय इजाफा मंझीलच्या दोन्हीं मजल्यावर खुद्द मुन्नीबाईच्या मालकीचीं दोन वेश्यागारें असतांना इतकें कडक वातावरण इथें कसें काय टिकून रहात होते हें कळणें कल्पनाशक्तीच्या पलीकडचें होतें.

कोठीवरच्या स्त्रीची जवानी लुटायची ती रत्नें माणकें उधळ-णाऱ्या संस्थानिकांनीं किंवा नवाबानीं; आणि एकदां तसल्या श्रीमंतीचा हात लागल्यानंतर खालच्या पायरीचा वारा इथल्या स्त्रीनें कधींहि घेतला नाहीं. मुन्नीबाईसारखीच आणखी एक गुणवान नर्तकी या कोठीवर होती. तिनें एका नाचण्यावर मोहोब्बत केली आणि ती त्याच्याबरोबर कोठीवरून खालीं उतरली. पक्ष्याला एकदां माणसाचा हात लागला कीं, इतर पक्षीजात त्याला पुन्हां आपल्यांत घेत नाहीं. त्याला टोचून टोचून मारतात. त्या नर्तकीची तीच गत झाली. तिला कोठीचे सर्व दरवाजे बंद झाले. कुत्र्याच्या मौतीचें जीवन तिला जगावें लागले.

मुन्नीबाई गंभीर झाली खरी, पण चांदच्या बाबतींत ती एकदम तसा कांहीं बंदोबस्त करूं शकत नव्हती. चांद हा तिच्या कोठीच्या संगीत परंपरेचा आधारस्तंभ होता. संपत्ति तिच्याकडे अगणित होती. त्यांत नित्य भर पडतच होती; पण कोठीला किंमत त्यामुळें नव्हती. श्रीमंति आहे म्हणून वडे वडे कलावंत त्या कोठीच्या आश्रयाला येत नव्हते. ते येत होते त्या कोठीचा संगीत महिमा ऐकून. कलावंताची तिथें होणारी योग्य कदर आणि त्याच्या गुणांची होणारी पारख ऐकून. त्या भलाईचें समाधान मुन्नीबाईंना टिकवायचें होतें; पण हें नवें शल्य पचवायला मात्र मुन्नीबाईला फार विचारपूर्वक डाव लढवावा लागणार होता.

चांदला आपल्याबद्दल कांहीं विशेष वाटतें आहे याची जाणीव बेनीलालला अजिबात नव्हती. तो देखील–झुंजीसाठीं काळोखांत कोंडून माजवणाऱ्या बैलासारखाच— बारा चौदा वर्षे एकांतांत रियाज करून, पूर्ण होऊन दिग्विजयाला बाहेर पडलेला. धन जोडायला चुकून तो या कोठीवर पोहोंचला आणि अडकून पडला. स्त्रीच्या नाजुक भावना कशाशीं खातात याची त्याला यत्किंचितहि जाणीव नव्हती. तबल्याखेरीज दुसरें विश्व तो जाणत नव्हता. म्हणूनच चांदनें आपल्या बोटांत आंगठी कशाकरितां सरकवली; ती मधून मधून एकटक आपल्याकडे कां पहात असते हें त्याला कळलेंच नाहीं.

जलसा संपला कीं, आपली विदागी घेऊन तो मुक्कामावर जाई आणि नित्यक्रमाप्रमाणें पुन्हा रियाजाला बसून ... दहा वाजतां जो झोंपी जाई तो खाण्यापुरता जागा व्हायचा. इतर भानगडींत पडायला त्याला फुरसत नव्हती. त्यामुळें बेनीलालकडून आपल्याला प्रतिसाद मिळत नाहीं असें वारंवार दिसल्यामुळें चांद अतिशय दुःखित होई. ठुमरी संपवितांना या विपण्णतेमुळें तिला अधिकच ग्लानी येई. खरोखर ती बावरी होई; पण ती ठुमरी ऐकणाऱ्यांना वाटे–'किती तल्लीनता या बाईची ! किती सार्थ अभिनय करते ही ! काय ही रंगत !' असे उद्गार काढीत ते घरोघरीं परतत असत.

कोठीवरच्या या रंगतीमुळें गाणें ऐकायला येणाऱ्या रईसांची गर्दी वाढली होती. कोठी दिवसेंदिवस फुलत चालली होती. मी कांहीं रईस अमीर यांपैकीं कुणीहि नव्हतों. कोणत्या ग्रहयोगामुळें मी त्या कोठीवर पाय ठेवला देव जाणें; पण ज्या क्षणीं पाय ठेवला त्या

# तशी ती



श्रावणात केवडा उमलावा
तशी ती
त्याच्या मार्गावर अलगद
उमलली,
गंधाने भारीत अवघे रान
सुवर्णमाया मिरवीत गेली !
पानापानाच्या अंगांगी
सुवासाची नुसती उधळण
झोक्यावरून फिरले मन ! . . .
सरता श्रावण ——
गेला सरून
त्याला इथेच असा विसरून :
आताही तो
जपत आहे
एक सुकले पिवळे पान
ओल्या गंधाने निथळणारे
केवळ केवळ
त्याच्यासाठीं !

—वि. म. कुळकर्णी

क्षणापासून माझा तिथें घरोबा निर्माण झाला. आठवड्यांतल्या एखाद्या तरी दिवशीं रात्रीचे आठ वाजले कीं, माझे पाय आपोआप मुन्नीबाईच्या कोठीकडे मला ओढीत नेत असत. दर वेळीं पोटांत भीति बाळगून ती भकास गल्ली मी पार करी, आणि इजाफा मंझीलच्या पायऱ्या चढत असे. आजहि असाच मोठ्या उमेदीनें दोन मजले मी चढलों. तिसऱ्या मजल्याच्या जिन्याकडे मी आलों तों पायऱ्यांवर पडणारा तो मंद निळा प्रकाश–झोत मला दिसला नाहीं. हुशारी आणणारा तो मंद मादक सुवासहि मला आला नाहीं. एक प्रकारची विपण्ण सामसूम सगळीकडे पसरलेली. जिन्यावर जवळ जवळ काळोख. त्या काळोखांत कुठेंतरी कुजबुज. मी थक्क झालों. एक पायरी मी अर्धवट चढलों असेन नसेन तोंच आवाज आला–

"कौन है ? ऊपर मैंत आइयेगा; आज जलसा नहीं होगा !"

"क्यूं ?"

"ज्यादा बातों की जरुरी नहीं है, आज जलसा नहीं है सो आप जा सकते है !"

आवाज करडा होता. अनोळखीही होता. जास्त वेळ तिथें हुज्जत घालण्यांत अर्थ नव्हता. कांहींतरी घोटाळा झालेला असला पाहिजे. चांदची तब्येत बिघडली असेल काय ? पण तब्येतीचेंच कारण असतें तर आवाज असा करडा कां आला असता ? आणि ही अशी स्मशान-शांतता कां निर्माण झाली असती ? कांहींहि असो, चौकशी करणें हें माझें कर्तव्य आहे असें वाटलें. खिशांत दिडकी नसतांना मुन्नी-बाईच्या कोठीवर रईस अमीरांच्या पंक्तीला मांडी लावून जो मी बसूं शकत होतों तो मुन्नीबाईच्या मजवरील लोभामुळें. बाई माझी जातीनें चौकशी करी. आणि असें घरोब्याचें नातें निर्माण झालेलें असतांना या परिस्थितींत त्यांची चौकशी देखील न करतां तिथून निघून जावें हें मला कसेंसेंच वाटलें.



शर्करा बहुत, अष्ट ओनरशिप ब्लॉक भट्ट

मी खालीं उतरलों. रस्त्याच्यावर आलों. साजिंद्यापैकीं कुणी भेटतात का पाहूं लागलों. गल्लीच्या तोंडाकडे वळून आठ दहा पावलें धिमे धिमे चाललों. इतक्यांत मुन्नीबाईची दासी रामव्वा बेनीलालशीं कांहीं बोलत असतांना मला दिसली. बेनीलालच्या गालावर टिचकी मारून ती झटकन वळली, आणि उजव्या अंगाला पानाची पिचकारी मारून ती इजाफा मंझीलमध्यें घुसली. मी हांका मारल्या— "बेनीलाल, ओ बेनीलाल !"

त्यानें लक्ष दिलें नाहीं. रस्ता ओलांडून मी त्याला गांठायचा प्रयत्न करणार तोंच एक घोडागाडी आड आली. तिला चुकविण्याचा प्रयत्न करतों तोंच पों पों करीत पोलीस पाठी लागल्यासारखी भरधांव एक टॅक्सी. आणि हीं संकटें पार करून रस्ता ओलांडीपर्यंत बेनीलाल माणसांच्या गर्दीत दिसेनासा झाला.

मनाला एक शंका चाटून गेली. मुन्नीबाईनेंच बेनीलालचा काटा काढण्यासाठीं रामव्वाला एका वेगळ्या रीतीनें तर त्याच्यावर सोडली नसेल ? न पेक्षां बेनीलालच्या गालावर टिचकी मारण्याची हिंमत रामव्वाला झाली असती का ? रामव्वानें बेनीलालला आपल्या नादीं लावायचा; तो तिच्या नादीं लागला आणि हें चांदच्या लक्षांत आलें कीं, त्या संशयानें चांदच्या मनांत बेनीलालविषयीं निर्माण झालेला प्रणयांकुर आपोआप खुडला जाईल. बेनीलालला कोठीवर वाजवणारा एक चांगला तबलिया याहून अधिक किंमत राहाणार नाहीं. चांदही पुन्हां चांदच राहील. तिच्या वृत्ति बावचळल्या जाणार नाहींत. . . . . .

माझी ही अटकळ बरोबर होती हें या घटनेच्या तिसऱ्याच दिवशीं मी जेव्हां इजाफा मंझीलच्या दरवाजाकडे आलों तेव्हांच मला एका बुढ्या साजिंद्याकडून समजलें. विड्याचें बंडल आणायला तो खालीं उतरला होता. मी विचारलें—

"क्यूं खां साहब, आज जलसा होगा कीं नहीं ?"

"हां हां, होगा जरूर; मगर ओ कंबख्त आयेगा तब ना ?"

"कौन ?"

"अरे, ओ बेनीलाल ! हर रोज उनकी राय देखते देखते हम थक जाते हैं ! साला आजकल कहां गूम हो जाता है अल्ला जाने !"

"क्यूं ? कोई खास बात है !"

"क्या बतावूं बाबा ! अरे ओ दिवाना रामव्वा के पीछे पड गया है ! ओ लंवडी भी साली ऐसी है की न जाने उसने कौनसी जादू किया ! कभी दस बजे आता है; कभी ग्यारह बजे आता है, कभी आता भी नहीं; और जब तक वह नहीं आयेगा तब तक चांदबाला गायेगी नहीं. बहोत तंग आ गया बाबा; बहोत तंग आ गया !"

आल्यासारखें थोडा वेळ कोठीवर बसून जावें, मुन्नीबाईनाहि भेटावें म्हणून मी पहिल्या मजल्यावर आलों. उजव्या बाजूला असलेल्या कुंटणखान्याच्या एका खोलींत दिवा लागला तशी माझी नजर साहजिकच तिकडे वळली. आणि जाळीच्या पडद्यांतून रामव्वा बेनीलालला लटक्या रागानें ढकलून बाहेर येतांना मला दिसली. दरवाज्याचें कवाड पकडून आंत डोकावून ती म्हणाली—

"अब जलदी उपर आना. जलसा खतम होने के बाद मिलेंगे !"

एक घायाळ मुरका मारून रामव्वा घाईनें निघाली. जिना चढतांना जवळ जवळ मला धक्का देऊनच ती दाण दाण पायऱ्या चढून गेली. ती अत्यंत आनंदांत होती. मी कोठीच्या हॉलमध्यें दबकत पाऊल ठेवलें तेव्हां ती मुन्नीबाईला पान लावून देत असलेली दिसली. आणि मुन्नीबाईहि थंडपणानें समोरच वसलेल्या एका रईसाकडे अवांतर गोष्टी बोलण्यांत दंग होती.

थोड्या वेळानें वेनीलाल आला. तवला त्यानें सुरांत लावून घेतला. चांदला बोलावण्याकरितां दासी गेल्या. झुंबरांतील झगझगीत दिवे मालवले गेले. जडावाच्या दागिन्यांनीं नखशिखांत नटलेली चांद पड्याबाहेर आली. "आइये चांदवाला !" असा सर्व श्रोत्यांकडून गजर झाला.

मी पाहिलें — चांदच्या चालण्यांत पूर्वीचा डौल नव्हता. लयबद्ध छुमछुमाट नव्हता. मरगळल्यासारखी वेताल हलकीं पावलें टाकीत कशीतरी ती बैठकीपर्यंत आली. तिनें स्मित केलें नाहीं. नेहमींसारखा प्रणाम केला नाहीं. खिन्नपणें ती बैठकीवर बसली. मुन्नीबाईंना देखील तिने आजचा मुजरा न करतां साजिंद्यांच्या स्वरांत स्वर मिसळून दुसरी कोणतीहि ठुमरी न गातां श्रोत्यांच्या फरमाइशीशिवाय अऽज तिनें "कित गयो वावरी वना" ही शेवटीं गायली जाणारी ठुमरी पहिल्यानेंच गायला सुरुवात केली.

निर्जीव चैतन्यहीन असे शब्द तिच्या तोंडून बाहेर पडताहेत असें मला वाटलें. वेनीलालचा तवला मात्र उत्साहानें फडफडला. जोरदारपणें नाना तऱ्हेच्या लग्ग्या आणि पर्णें वाजलीं. श्रोत्यांनीं त्याला वाहवा दिली. "वा वेनीलालजी ! वाहवा !" चांद मात्र आपलें कांहींतरी हरवल्यासारखी कुठेंतरी शून्यांत नजर लावून गात होती. अंगवळणी पडलेल्या सरावानें तिनें थोडासा अर्थपूर्ण आदा केला; पण तो उत्कट नव्हता. तिनें आज अंगावरचे अलंकार फेंकले नाहींत. वावरी झाल्याचा पूर्वीचा अभिनय केला नाहीं; कांहीं नाहीं. अर्धा तासपर्यंत सारें कांहीं निर्जिवपणें चाललें होतें; पण कधीं नव्हे ती एकाएकीं चांद स्वरापासून अलग झाली आणि 'कित गयो वावरी वना' हे ठुमरीचं पालुपद ती किंचाळल्यासारखी गाऊं लागली. तिचा तोल सुटला. तिनें अंगावरचा पदर खालीं टाकला. पोलक्याचीं वटणें तटातट तोडून स्तन उघडे टाकले. मानेला झटका मारून केस मोकळे केले. रामव्वा तिथें धांवत आली, तशी फुलांच्या वेण्यांचा रामव्वाच्या तोंडावर तिनें जोरानें फटका मारला, बैठकीवर उभी राहून 'कित गयो वावरी वना' म्हणत ती हात वर करून नाचूं लागली. रामव्वाला तिनें बैठकीवरून ढकलून दिलें.

हा विपरित प्रकार दृष्टीला पडतांच सगळे थक्क झाले. मुन्नीबाई आकांतली. ती धांवत बैठकीजवळ गेली. चांदला तिनें आपल्या कवेंत घट्ट घेतली आणि आंतील माणसांना मोठमोठ्यानें हांका मारल्या. कोठीभर एकच गोंधळ झाला. चांदला आंत नेण्यांत आलें. तिला आवरण्याचा प्रयत्न चालला; पण आंतमधून देखील मोठमोठ्यानें 'कित गयो वावरी वना' 'कित गयो वावरी वना !' असे चांदचे वेसूर, वेताल शब्द ऐकूं येत होते. मुन्नीबाईनें डाव केला पण तो तिच्यावरच उलटला. नतीजा इतका भयंकर होईल याची तिला कल्पना नव्हती.

पुढच्या चार सहा दिवसांत चांदच्या चौकशीला जावें असें मला पुष्कळ वाटलें; पण एकाएकीं जातीय दंग्याचा डोंब उसळल्यानें पुढें कित्येक महिने मला मुन्नीबाईच्या कोठीकडे जातांच आलें नाहीं. देशाची फाळणी झाली. अनेक कलावंतांनीं स्थलांतर केलं. चांदचे पुढें काय झालें हें मला कळूंच शकलें नाहीं. ज्या एका नवाबानें मुन्नीबाईला ठेवली होती त्याच्याबरोबर मुन्नीबाई आपली कोठी मोडून निघून गेल्याचें वर्तमान वर्ष दीड वर्षानंतर मला कळलें पण चांदबद्दल कांहीं कळलें नाहीं.

* * *

दंगे धोपे थांवले. राज्यें स्थिर झालीं. माणसें माणसासारखीं वागूं लागलीं. वाऱ्याच्या झोतानें पुस्तकांचीं पानें भराभर उलटावीं तशीं वर्षें उलटलीं. एका जलशांत पंजाबचे एक तवलिये मला भेटले. खूप वर्षांनीं ते मला भेटत होते. मुलाखत झाली पण तेवढ्यानें कांहीं खां साहेबांचें समाधान झालें नाहीं. दुसऱ्या दिवशीं आपल्या मुक्कामावर येण्यासाठीं त्यांनीं मला आग्रहाचें आमंत्रण दिलें ?

"उतरलांत कुठं खांसाहेब ?"

"इजाफा मंझील के तीसरे माले पर. जहां जिंदा हुसैन खांसाहब और ताज खांसाहेब रहते हैं !"

"इजाफा मंझील ?" तो एखादा भूत बंगला असल्यासारखें आश्चर्य करीत मी विचारलें; पण लगेच स्वतःला सांवरलें. खांसाहेबांना कांहीं कळलें नाहीं. ते फक्त एवढेंच म्हणाले कीं—

"जरूर आना भाई. वहोत दिनों के वाद मिलते हैं, वहोत कुछ सुनाऊंगा आप को !"

जवळ जवळ दहा वर्षांच्या दीर्घ कालावधीनंतर मी इजाफा मंझीलच्या पायऱ्या चढत होतों. तिथल्या पूर्वींच्या आणि आतांच्या वातावरणांत तसा कोणताच बदल झालेला नव्हता. पूर्वी गल्लीच्या नाक्यावर दिसणाऱ्या पांच पंचवीस खाटा आजहि तिथें होत्या. फक्त तिथले पठाण नाहींसे झाले होते; पण पठाणाऐवजीं वेश्या आणि त्यांचे दलाल यांची तिथें मोठमोठ्यानें वाचावाची चाललेली होती. पूर्वींच्या गलिच्छ वातावरणांत हातभट्टीच्या घाणीची भर पडली होती. आख्खी रात्र उंडगेगिरी करणारीं बेवारशी पोरें फुटपाथवर अस्ताव्यस्त झोपलीं होतीं. त्यांतच कांहीं बाद झालेल्या वेश्या खोटी रंगरंगोटी करून उत्तर हिंदुस्थानी भय्यांशीं सौदे पटवीत होत्या.










इजाफा मंझील जसा पूर्वी होता तसाच आजहि दिसत होता. पहिल्या मजल्याची रचना मात्र पूर्णपणें बदललेली दिसली. अगदीं जिन्याला लागूनच दरवाजा दिसला. त्यामुळें मी इजाफा मंझीलमध्येंच आलों कीं दुसऱ्या कोणत्या इमारतींत घुसलों कळेना. पूर्वी पायऱ्या चढून वर आल्यानंतर वीस पंचवीस कदमांवर डाव्या हाताला दुसऱ्या मजल्याचा जिना लागे; पण या मजल्याची रचनाच बदललेली असल्यानें दुसऱ्या मजल्यावर जायची वाट मला सांपडेना. जिन्यांत काळोख. वरतींहि काळोख. वरें, कुणाला विचारावं म्हटलं तर जिकडे तिकडे सामसूम.

मी त्या दरवाजाची कडी वाजविली. एका म्हातारीनें तावडतोब दरवाजा उघडला. दरवाजा समोरच मोठ्या रस्त्याकडची खिडकी होती. त्या खिडकींत काश्मिरी पद्धतीचा वेश केलेली बाई पाठमोरी उभी होती. "अंदर आइये जी!" म्हातारीनें ते शब्द उच्चारले मात्र– खिडकींतल्या बाईनें मागें वळून पाहिलें. आणि माझ्याकडे बघून ती मोठमोठ्यानें हंसूं लागली. माझ्या डोळ्यांवर माझा विश्वास बसेना. मुन्नीबाईची चांद ? ही इथें कुठें आली ? का मुन्नीबाई इथे राहात होती ?

तिचे बदामी डोळे तसेच होते; पण त्या खालीं काळीं काळीं वर्तुळें पडलीं होतीं. तिच्या गौर वर्णामुळें ती अधिकच उठून दिसत होती. चेहरा पूर्वीसारखाच सतेज होता. केसांच्या वेण्यांत दोन्हीं बाजूला फुलें खोंचलीं होतीं. कानांत खांद्यापर्यंत लोंबणारीं इअररिंग्स. अंगावर सारे काचमण्यांचें अलंकार. मी एकटक पाहात राहिलों. ती हंसतच होती. "उसको मत देखना बाबा. वो दिवानी है" म्हातारी कळवळून म्हणाली. "गिऱ्हाइकाकरितां तिला खिडकींत उभी करतात, पण ती वेडी आहे बाबा वेडी आहे !" आणि एवढें बोलून म्हातारीनें एक दीर्घ सुस्कारा सोडला.

'ही मुन्नीबाईची मुलगी चांद ना ?" माझ्या या प्रश्नानें म्हातारीला विश्वास वाटला. मुन्नीबाईच्या कोठीवर येणाऱ्या ओळखीच्या रईसापकीं मी कुणीतरी एक असेन अशा कल्पनेनें ती माझ्या अधिक जवळ आली म्हणाली—

" हो; म्हटलं तर मुलगी, म्हटलं तर नाहीं !"

"म्हणजे ?"

"म्हणजे असं कीं, ती मुन्नीबाईची पाळलेली मुलगी होती. ही वेडी झाली तशी मुन्नीबाई हिला इथंच सोडून गेली आपल्या यजमानांबरोबर हैद्राबादला. तिथून ती पुढं कुठं गेली कोण जाणें ! दैवानं हिला फार मोठें केलं पण कर्मानं ही वेडी झाली !"

"मग हिला आतां सांभाळतो कोण ?"

"या कुंटणखान्याची मालकीण रामव्वा !"

आणखी संभाषण वाढवण्याच्या भानगडींत मी पडलों नाहीं. मी एवढेंच विचारलें–

"जिदाहुसेन खांसाहेब इकडेच रहातात ना ?"

"हा हां तिसऱ्या मजल्यावर !"

'मग तिथं जाण्याचा जिना कोणता ?"

"हां– असं इकडून जावं लागतं त्यांच्याकडे." डाव्या हाताने तो जिना दाखवित म्हातारी बाजूला झाली.

जिन्याकडे वळतांना मी चांदकडे पाहिलें; ती हंसतच होती. तिची चेतनाहीन दृष्टि कांहींहि सांगत नव्हती; पण दुसऱ्या मजल्याच्या पायऱ्या चढतांना वैफल्यानें साकळलेले, सूर नसलेले, लय नसलेले, बारीक आवाजांत पण आर्ततेनें म्हटलेले ठुमरीचे बोल कानावर आले– "कित गयो बावरी बना. . . कित गयो बावरी . . ." ते ऐकतांना माझें काळीज पिळवटलें. डोळ्यांच्या पापण्यांत पाणी उभें राहिलें. ●●●




















अनुक्रमणिका

—असें सांगतात कीं, अग्निदिव्यांतून सीता जेव्हां बाहेर आली तेव्हां तिच्या केसातली वेणी आगीच्या ज्वाळांनीं जरादेखील आहळली नव्हती. सीतेच्या त्या फुलांसारखीच निष्ठावंत, श्रद्धावंत मनाची कोवळीक जळत्या जीवनांत देखील अदग्ध राहते, रहायला पाहिजे.






- वा रा. कान्त

व्यथेची कथा सांगणारी गाणीं अधिक मधुर असतात, असें आंग्ल कवि शेलेनें म्हटले आहे. मग वेदना, दुःख काय स्वभावतःच सुन्दर, सुखद असतात ? त्यांच्या कथा, त्यांची गाणीं मधुर कशीं होतात ?

व्यथा किंवा दुःख स्वतः सुन्दर नसते, ते दुःख पेलणारे मन सुन्दर असावे लागते, खंबीर असावे लागते, असेंहि कुणीं म्हणतात. परमेश्वराचा कधीं विसर पडू नये, सतत त्याचे स्मरण होत रहावे म्हणून कुंतीनें संकटें, दुःखें मागितली. परंतु सर्वसामान्य माणसें अशी दुःख मागणारी नसतात. दुःखापासून दूर पळणारीं, त्यानें पिचून फुटून जाणारींच असतात. दुःखानें चूर झालेलीं हळवी (भिगाचीं) मनें कांहीं साठवूं शकत नाहींत. तसेंच सोशीकपणानें मुकाट दुःख सहन करणारी दगडासारखी मनेंहि कांहीं ग्रहण किंवा दान करूं शकत नाहींत, नाहींतरी थोडी का माणसें या जगांत मुकाटपणें दुःख सहन करणारीं आहेत ? आपल्या प्रेयाशी किंवा आपल्या श्रेयाशीं जवळीक साधण्यासाठीं दुःख, व्यथा स्वीकारणारीं माणसें क्वचित् जन्माला येतात. शिवाय न मागतांच आयुष्यांत दुःखें सर्वांच्या वांट्याला येतात. मग ती मागायचीं कशाला ?

प्राप्त दुःखाचा भार कसावसा सारेच वाहतात. त्यांतहि दोन प्रकार असतात. कांहीं माणसें हें जग, हा संसार दुःखमय आहे म्हणून या संसाराचाच त्याग करतात; तर दुसरीं कांहीं माणसें दुःखानंतर सुख येईल या आशेनें दुःखाचे माप पदरीं घेत असतात. 'शुभाशुभांचा संगम म्हणजे हा अमुचा संसार', असे म्हणतात काहीं लोक सुखदुःखाची तडजोड करीत, सुवर्णमध्य साधल्याचा व्यावहारिक शहाणपणा मिरवतात; तर कांहीं जण ही सत्वपरीक्षा आहे या श्रद्धेनें दुःखाला सामोरे जातात. आगींत सोनें उजळून निघते. त्याचा कस लागतो, त्याचे अलंकरण होते. मग ते लोकांच्या मस्तकी चढते, हृदयाशी भिडते. दुःखाच्या अग्निसंपर्कांत माणसाचे व्यक्तित्व देखील असेंच उजळते. पण त्यासाठीं जीवनाच्या कोपऱ्यांत कुठेंतरी कांहीं निष्ठा असाव्या लागतात. असे सांगतात कीं, अग्निदिव्यांतून सीता जेव्हां बाहेर आली, तेव्हां तिच्या केसांतली वेणी आगीच्या ज्वाळांनीं जरादेखील आहळली नव्हती. तिच्या गजऱ्यातली सारीं फुलें तशीच हंसरी, ताजी टवटवीत होती. सीतेच्या या फुलांसारखीच निष्ठावंत, श्रद्धावंत मनाची कोवळीक जळत्या जीवनांत देखील अदग्ध राहते, राहायला पाहिजे. अशा अदग्ध मनाकडून समाजाला विदग्ध साहित्य आणि कला यांची देणगी मिळते. परंतु त्यासाठीं मनाची कोवळीक, मनाचा फुलोर, इतकेच नव्हे तर मनाचे सारे फूलपण, दैनंदिन तापाच्या जाळांत, जपले पाहिजे. 'प्रौढत्वीं निज शैशवास जपणें बाणा कवीचा असे,' असे केशवसुत सांगतात, तेव्हां त्यांना असेंच कांहींतरी सुचवायचे असेल, मानवी मनाच्या या कोवळीकतेची जपणूक अभिप्रेत असेल, असे मला वाटते. या कोवळीकतेचे जतन करतांना त्यांत हळवेपणा येणार नाहीं याची काळजी घ्यावी लागते. हलक्याशा झुळुकीनें गळून पडणाऱ्या पारिजातकासारख्या कोंवळ्या फुलांचीं दलें पाहा ना ? ती ताठ असतात, तशाच प्रकारचा ताठरपणा सर्जनशील व्यक्तीच्या मनाला येतो, तेव्हां आपल्या टोकाशीं प्रतिक्षणीं रंगगंधाचे नवे विश्व उमलविणाऱ्या अन् तोलून धरणाऱ्या देठांप्रमाणें त्यालाहि आपल्या भावानुभवाचें फुलते फूल तोलून धरणें शक्य होते. पण सर्वसामान्य दुःखी माणसाच्या

मनाला अशी देवें नसतात. म्हणूनच या जगांत खरी कला इतकी दुर्मिळ असावी.

म्हणजे याचा अर्थ सुखांतून साहित्य, कला जन्माला येत नाहींत असा कां कराय‌चा ? नाहीं, असेंच म्हणतां येणार नाहीं, इतकेंच म्हणतां येईल कीं, सुख आणि दुःख या दोन्हीं खऱ्या प्रेरणा नाहींत. या दोन्हीं-मागें वसणारे जीवन, साहित्याची खरी प्रेरकशक्ति आहे, हे जाणून दुःखाचा जो सहज स्वीकार करतो त्याला जीवन कळते आणि कला आकळते. सुख हे पारदर्शी असल्यामुळें त्या पलीकडील जीवनाचे रुप चटकन् नजरेंत भरते. दुःख मात्र जड, काळेकभिन्न अन् अपारदर्शक असते. त्यामुळें त्याच्या पलीकडच्या जीवनाचे निखळ स्वरूप आपल्याला दिसत नाहीं, कळत नाहीं. दुःखालाहि आकार असतो, रुप असते; अंधाराला असते तसे. पण अंधाराला अस्तित्व कुठें आहे ? अंधार म्हणजे प्रकाशाचा अभाव. तुम्हीं प्रकाशाच्या परिभाषेंत बोलता म्हणून असें म्हणता. प्रकाश म्हणजे तरी काय ? अंधाराचा अभावच नव्हे काय ? म्हणून प्रकाश आणि अंधार, त्यांचे येणे-जाणे, त्यांचा भावाभाव, खरा महत्वाचा नाहीं. या दोन्हींपेक्षां त्यांचे अस्तित्व, त्यांच्या अस्तित्वाची वास्तव, प्रखर जाणीव ही खरी महत्वाची. जीवनावरील निष्ठेंतून, श्रद्धेंतून ही जाणीव निर्माण होते. ही जाणीव झाली म्हणजे प्रकाश अंधाराच्या पलीकडे स्पंदणाऱ्या जीवनाची यथार्थ जाणीव होते, त्याचा अर्थ कळतो, रुप आकळते. हे कळावे म्हणून सीतेच्या फुलांनीं घडलेल्या मनाची कोवळीक सांभाळणें आवश्यक आहे. कधीं असेही वाटते कीं, सीतेच्या अग्निदिव्याचे रहस्य यापेक्षां कांहीं निराळे आहे. रावणाच्या घरांत राहिल्यामुळें सीतेवर लोकापवाद आला. सामान्य जनां-बरोबर रामचंद्रानेंहि तिच्या सतीत्वाबद्दल साशंक वृत्ति दाखवली. ज्याच्यावर तिचे अमर्याद प्रेम, अढळ विश्वास, त्या तिच्या प्रत्यक्ष पतीनें, प्रभु रामचंद्रानें लोकांच्या संशयनिवृत्तीच्या, लोकाराधनेच्या नांवा-खालीं तिच्याकडे निर्मळतेचा पुरावा मागितला, अग्निदिव्याची सूचना केली. या अघोर अपमानाच्या आणि दुःखाच्या यातनांत रामावरील आपली निष्ठा श्रद्धा ढळेल काय अशी क्षणभर तिला भीति वाटली असावी. आपली निष्ठा कलंक लावण्यासाठीं, ती पारखून त्या निष्ठेवरोंवर निष्ठास्थानाचाहि गौरव अढळ, अबाधित राखण्यासाठीं तिनें आनंदानें अग्निप्रवेश केला असावा.

इटलीच्या स्वातंत्र्य-संग्रामाच्या इतिहासांत अशीच एक रोमहर्षक घटना घडली. 'तरुण इटली' या क्रांतिकारक संघटनेंतले सारे तरुण देशभक्त आणि त्यांचा मार्गदर्शक नेता, गुरु जोसेफ मॅझीनी यांना तेथील राजसत्तेनें पकडून तुरुंगांत डांबले. तुरुंगांत त्यांचा अनन्वित छळ करण्यांत आला. राज्यसत्ता उलथून पाडणाऱ्या कटाचा सुगावा लागावा म्हणून या तरुण देशभक्तांचा बुद्धिभेद करण्याचाहि प्रयत्न तुरुंगांतील अधिकाऱ्यांनीं केला. ह्या क्रांति-कारकांत जॅकोपो रॅफिनी हा एक अत्यंत भावनाप्रधान, कोंवळ्या मनाचा तरुण होता. तुमचा नेता, खुद्द मॅझीनी आम्हांला फितुर झाला आहे, त्याने तुझें नांव सांगि-तले आहे असें त्याला त्या अधिकाऱ्यांनीं सांगितलें. या गोष्टीवर प्रथम त्याचा विश्वास बसेना, तेव्हां मॅझीनीच्या सहीचें बनावट पत्र त्याला दाखवण्यांत आले. तें पाहून मॅझीनीवरची, देशांतील तरुणांच्या स्वातंत्र्यभक्तिवरची, जीवनभर जोपास-लेल्या ध्येयावरची त्याची श्रद्धा डळमळली, ढांसळूं लागली. पण त्यानें या 'ढासळते-पणाचाच' इन्कार करायचे ठरवले. ही निष्ठा ढळली तर आपण निराधार होऊ, आपले जीवन अर्थशून्य, निरर्थक होईल, अशी त्याला भीति वाटली. भावविश्वातील ही भयावहता त्याला असह्य झाली. मॅझिनी वस्तुतः कसाहि असो, परंतु त्याच्यावरील आपली निष्ठा ढांसळली तर तो आपल्या आत्म्याचा अधःपात होईल. आपल्याला जगण्यासारखे कांहीं उरणार नाहीं, म्हणून ह्या निष्ठेला, ध्येयाला तडा जाण्यापूर्वीं, तुरुंगांतील खिळा मानेंत खुपसून घेऊन त्यानें आपल्या प्राणांचा त्याग केला. ध्येयपातापेक्षां देहपात त्याने पसंत केला. प्राणांचे मोल देऊन आपल्या श्रद्धेचे निष्ठेचे, आणि निष्ठा-स्थानाचे त्याने रक्षण केले. रॅफिनी मेला (कारण चमत्काराचे युग तेव्हां समाप्त झाले होते.) रामायण-कालांतील, चम-त्काराच्या कल्पनेंत जीवनपद्धतीचे कांहीं सत्व होते, बळ होते. म्हणून आपल्या ध्येयाचे, निष्ठेचे जतन करणारी सीता, त्या अग्निदिव्यातून, सदेह (सव्येय) बाहेर आली. तिच्या वेणींतील फुलेंहि ताजी टवटवीत राहिली.

असेंच विचार भरकटत जातात आणि एखाद्या क्षणीं प्रश्न पडतो या भरकटण्यांतून कांहीं अर्थ निघतो का ? निघाला तर हवाच आहे. परंतु तसें कांहीं निष्पन्न झालें नाहीं तरी, कोवळीकतेच्या कल्पनेचा एवढा विस्तार—विलास झाला (तुम्हीं याला कोवळा म्हणाल, खुशाल म्हणा) हें देखील थोडेथोडके नाहीं. अशा विचारांत, कल्पनेंत रमत गेल्यामुळें, मला वाटते. इतक्या वर्षांनंतर अजूनहि माझ्या मनाची फुलें, तशीच हंसरी, ताजी टवटवीत राहिलीं आहेत. सीतेच्या फुलांसारखी. कुणीं सांगावे, हीहि एक माझी कल्पनाच असेल.



## सामसूम

सामसूम रात्र : सामसूम तारे
घराघरांतून झोपलेले, सारे

झोपलेलीं सारीं सुख आणि दुःखें
झोपी गेले ओठ ओले आणि सुके

डोळ्याडोळ्यांतली झोपी गेली दिठी
आशानिराशेची पडे गाढ मिठी

झोपी गेले रस्ते : झोपी गेली घरे
फिकट चांदणें मंद मंद झरे

झोपेच्या लयींत श्वसन वाहतें
आभाळ वरचें वाकून पाहतें

सामसूम रात्र : सामसूम तारे
सामसूम मोही : सामसूम सारे

—शान्ता ज. शेळके











अनुक्रमणिका



पावसाळा सुरू व्हायला थोडाच अवधी आहे. कदाचित् उद्यां देखील सुरू होईल. आकाश काळ्याभोर ढगांनीं भरून गेलें आहे. तासाभरांत ते अदृश्य होतात. लखलखीत कोरें ऊन पसरतें आणि पावसाची उत्कंठेनें वाट पाहाणाऱ्यांचें अंतःकरण अस्वस्थ होतें. पुनः कांहीं वेळानें ढग ओथंबूं लागतात. दूर कुठें तरी पाऊस पडल्याचा गंध येतो. मन अधिकच अस्वस्थ होतें. मनांत आठवलेल्या कोठकोठल्या आठवणी एकाएकी उसळून वर येतात बऱ्याच काळ दडून ठेवलेल्या स्प्रिंगसारख्या. . . .

आजची दुपारही अशीच अस्वस्थ करणारी आहे. चन्द्रशेखर इस्पितळांत नुकताच जेवून गेला आहे. मोलकरीण येऊन केव्हांची कामें आटोपून गेली आहे. चन्दरची बायको मुलांसह माहेरी गेली आहे. घरीं त्या एकट्याच आहेत. यौवनांत पदार्पण केलेल्या बालिकेला एखाद्या आवडणाऱ्या पुरुषाशीं बोलायचें तर औत्सुक्य असतें. पण ओठांतून शब्दांची पखरण तर होत नाहीं, असल्या संभ्रमित अवस्थेंत पाऊसही श्वास रोघून ढगांमध्येंच बसला होता. विलक्षण उकाडा होत होता. त्या शून्य नजरेनें जमिनीकडे टक लावून पाहात आहेत. हातामध्यें तारेचा कागद मूकपणें अडकलेला आहे.

—अर्ध्या तासापूर्वींच तार आलेली होती त्यांच्या दुसऱ्या मुलाची. "वडील वारले. अंत्यसंस्कारासाठीं तावडतोब निघा." दुसरा मुलगा त्यांच्याजवळच राहात होता. काय उद्योग करीत होता कोण जाणे ? त्यांच्याच वळणावर गेलेला असणार !

तारेची तरी काय आवश्यकता होती? सारें त्यानेंच उरकून टाकायचें होतें. इतरांची काय जरुरी होती ? गेलीं बारा वर्षे कधी जरूर भासली नाहीं. आतां तरी कसली जरुरी आलीय् ?

त्यांची नजर जमिनीवर खिळून राहिली. आहे. जमिनीवर त्यांना सुन्दर रंगीरंगी रांगोळी दिसत आहे. एक पुरुषी हात हळूच त्या रांगोळीजवळ येतो आहे. हात हळूं हळूं मोठा होत जातो. आक्राळविक्राळ होतो. त्याच्या बोटाची नखें वाढूं लागतात. भयानक दिसतात. भसाभसा रांगोळी पुसू लागतो तो हात. कामातुर— नव्हे—कामांध झालेल्या पशूच्या हालचालीसारखा. रांगोळीचे सारे रंग मिसळून



अनुक्रमणिका

**हातांत तार होती. समोर मोठा मुलगा उभा होता. विचारींत होता, 'आई, जायचं ना मग ?' पण त्यांचं मन जागेवर नव्हतं. त्यांना आठवत होता तो चंद्र -- चांदणं आणि तो स्पर्श........**

जातात एकमेकांत. सर्वांचे मिश्रण होऊन उरतो एक राखाडी रंग !

त्यांच्या तोंडून एक अस्पष्ट किंकाळी उमटते. खुर्चीवरून त्या कोलमडूं लागतात. मग स्वतःलाच त्या सांवरतात. . .

त्या भयानक रात्री डोळयांसमोर पिंगा घालूं लागतात. त्या आठवणीदेखील नकोत असें वाटूं लागतें.

—एक संवाद त्यांच्या कानांत डांसासारखा गुणगुणतो....वीस वर्षांपूर्वीचा...

"नको ना. . . अगदीं इच्छा नाहीं माझी--"

"तुझी नसेल. माझी नाहीं मेली. पुरुष आहे मी."

"पण वाढत्या वयाबरोबर. . . ."

"म्हातारा झालों नाहीं मी. . . ."

"पण निदान तसं तरी ."

"तें कांहीं चालायचं नाहीं. . ."

"पाया पडते मी तुमच्या. . ."

आणि मग सगळा संवाद कळ्याकुट्ट अंधारांत बुडून जातो. जीवघेणा अंधार. मनांत अंधार, शरीरांत अंधार, खोलीभर भरून राहिलेला अंधार. कशानेही छेद न जाणारा अंधार !

सदोदित हाच संवाद ऐकावयाचा. निरनिराळ्या शब्दांत. चन्दर त्यावेळीं शिकण्यासाठीं मुंबईला राहात होता. मिलिंद मिलिटरी स्कूलमध्यें होता. दहा वर्षांची चित्रा तेवढी त्यांच्याजवळ राहात होती.

अशा संवादानंतरचा दुसरा दिवस चित्राला जवळ घेऊन मुसमुसण्यांत जायचा. चित्रा बावरी होऊन त्यांच्या कुशींत झोंपून जायची.

. . .मग कुठल्यातरी शेजाऱ्याचा आवाज ऐकूं येतो.

"वहिनी, इंजिनियरसाहेब नाहींत वाटतं घरांत ?"

त्या अत्यंत प्रसन्नपणें हंसून म्हणतात.

"नवीन कुठंतरी कॉन्ट्रॅक्ट घेतलंय् ना त्यांनीं ? जागेवर गेलेत देखरेखीला. ."

"कुठं म्हणालात?" शेजारी थोड्याशा संशयास्पद उत्सुकतेनें विचारतो. कारण इंजिनियरसाहेबांची गांठ कालच कुठंतरी गांठ पडलेली असते-आणि सध्यां बाहेरगांवचें कुठलेंच कॉन्ट्रॅक्ट नाहीं हें त्यांनींच सांगितलेलें असतें.

आपली थाप पचली नाहीं हें त्यांच्याही लक्षांत येते. तरीही त्या अधिक हंसून म्हणतात, "इथेंच, जवळ कोडोली म्हणून गांव आहे."

"असं होय." तो शेजारी देखील पटल्यासारखा होकार देतो-आणि वाट चालूं लागतो.

दुसऱ्या दिवशीं रेल्वेच्या डब्यांत कुठेतरी इंजिनिअरसाहेबांची गांठ पडते. त्यांच्यासमवेत कोणीतरी काळी किरिस्तांव बाई असते. बहुधा नर्स असावी. त्यांना रेलून बसलेली असते. इंजिनिअरसाहेब त्याला पाहून वरमतात. कोठल्यातरी स्टेशनावर चहा घेण्याचा त्याला आग्रह करतात. स्टॉल्वर चहा पितां पितां ते शेजाऱ्याला सांगतात—

"बरें का उत्तमराव, घरीं बोलूं नका हं कृपा करून. . . ."

उत्तमराव मग ती गोष्ट तशीच मनांत जतन करून ठेवतात. त्यांच्याविषयींची अनुकंपा त्यांच्या मनांत तशीच हळहळत राहते.

. . .चन्दरचे शिक्षण संपायला अद्याप एक वर्ष आहे. मिलिंदचे मिलिटरी स्कूलमधलें शिक्षण पुरें झालें आहे. पण त्याला मिलिटरी करिअर नको आहे. तो कॉलेजमध्यें नांव घालतो. . . .त्याच्या मनाचा थांगच लागत नाहीं. मन मानेल तसें करतो. त्याला भडक रंग आवडतात. भगभगीत खायला आवडतें. अभ्यासाकडे लक्ष नाहीं. खोली सगळी नट्यांच्या फोटोंनीं भरलेली. . .त्यांना मिलिंदचें भय वाटूं लागतें. हाही असाच.... माझ्या कुशींतून जन्माला आला, पण त्यांची छाया घेऊन बाहेर पडला. शहरांत त्याच्या कॉलिजजीवनाबद्दल कुजबूज ऐकूं येते.

"मिलिंदकडे जरा लक्ष द्या ना. . ."

"कसलं लक्ष द्यायचं ! काय वाईट झालंय् ?"



—ना. व्यं. देशपांडे

"अहो नुसत्या उनाडक्या करीत असतो."

"तरुण रक्त आहे. चालायचंच. आपण फार लक्ष देऊं नये. पुढं सुधारतात आपोआप." त्यांना आपलें कॉलेजमधलें आयुष्य आठवतें. मोठ्या चवीनें ते ओठावरून जीभ फिरवतात.

"चन्दर कसा नीट मार्गानं चाललाय् पहा. . .थोरल्या भावाचं थोडं तरी वळण. . . . . . . ."

"त्याला तूं नेभळा करून ठेवलयस्. तुझा मुलगा तो."

"आणि मिलिंद तुमचा ?"

मग त्यांचें बेफाट हंसणें. पोटांत खड्डा पाडणारे. . 'चित्रा कुणासारखी ?' त्यांच्या मनांत प्रश्नांचें वादळ सुरू होतें. . .

. . .एके दिवशीं त्या कोठेतरी बाहेरगांवीं जाऊन परतलेल्या असतात.

स्वयंपाकिणीजवळ नवऱ्याची वास्तपुस्त करतात.

ती हलक्या आवाजांत कुजबुजते. .









"त्यांचं एक राहूं द्या हो. पण मिलिंद-सुद्धां. . . ."

"काय झालं ?" त्या कातर आवाजांत विचारतात.

"त्या रात्रीं दोघंही बापलेक दारू पीत बसले होते."

त्यांचा चेहरा पांढराफटक होतो.

—कांही दिवसांनीं घरांतील रचनाच बदलते. त्यांची स्वतंत्र झोंपायची व्यवस्था होते. शेजघरांतले जवळजवळ असलेले लांकडी नक्षीदार पलंग वेगवेगळ्या खोल्यांत जातात. चित्रा आईच्या खोलींत झोंपत असते. आईच्या हालचालीवरून तिला झोंप लागत नसल्याचें तिला समजते. चित्रा आतां मोठी झाली आहे. . . .

. . .त्यांचें शेजारीपाजारीं जाणें कमी झालें आहे. अलीकडे अबोल झाल्या आहेत त्या. पण त्यांच्या गोऱ्यापान, मृदुमधुर चेहेऱ्यावरील प्रसन्न हास्य तसेंच कायम आहे. . .चन्दर डॉक्टरीची परीक्षा पास झाला आहे. हाउसमनशिप् करतो आहे. त्याच्या स्वतंत्र संसाराची त्या आतुरतेनें वाट पाहात आहेत.

चन्दरची बायको पाहून त्या मनांत अतिशय सुखावल्या आहेत. किती वात्सल्यपूर्ण चेहेरा तिचा! त्यांच्या मनांत मायेचे कढ दाटून येतात. चन्दरचा स्वतंत्र संसार पाहण्यास त्या उतावीळ झाल्या आहेत.

"चन्दर हैद्राबाद संस्थानांत हॉस्पिटल् घालावें म्हणतोय्. तिथं डॉक्टर फारसे नाहींत. जम चांगला बसेल असं म्हणतो."

खरें म्हणजे हैद्राबाद खूप दूर आहे या कल्पनेनेंच त्या सुखावतात.

"ठीक आहे."

"मीपण त्याच्याकडेच राहायला जाते."

"बरं."

"चित्राही माझ्याबरोबरच येईल."

ते चमकतात. . .घशांत आंगठा घुटमळूं लागतो. त्यांच्या लालसर डोळ्यांत कणव फुलते. . . . .

"तीही....?"

कधीं नाहीं तो त्यांच्या आवाजाला पालवी फुटल्यासारखा त्यांना भास होतो. त्याही क्षणभर घोटाळतात. क्षणभरच. आणि नंतर निश्चयानें म्हणतात—

"हो."

"माझ्याजवळ ?"

"मिलिंद आहे ना. . . .?"

"ठीक आहे. तसंच होऊं द्या."

मग चार पांच दिवसांत त्या हैद्राबादकडे चन्दर, त्याची बायको आणि चित्रा यांच्यासह निघून जातात.

त्यांच्याशीं केलेला हा शेवटचा संवाद.

त्यानंतर त्या चन्दरच्या संसारांत रमून जातात. त्यांच्याशी पत्रव्यवहार नाहीं. कधीं जाणें नाहीं, येणें नाहीं. खुशालीदेखील समजून घेण्याची जरूरी नाहीं. त्यांच्याजवळ मिलिंद आहे. तो घेईल त्यांची काळजी. भूतकाळावर कायमचा पडदा. चन्दरची बायको मोठी सुस्वभावी आहे. सासूची अगदीं काळजी घेते. चन्दरची मुलें त्याच्यासारखीच—सुस्वभावी, निकोप. . . .त्या चन्दरच्या संसारांत रममाण होऊन गेल्या आहेत. मायलेकरांच्या संभाषणांत त्यांचा कधीं उल्लेख येत नसतो. चन्दरला तें जाणवतें. तो लपवून ठेवतो. त्याही विसरण्याचा प्रयत्न करतात.

. . .एके दिवशीं मात्र चित्रा म्हणते.

"आई, अण्णांच्याकडे थोडे दिवस जाऊं मी? एकटे आहेत गं. . .अशक्त झाले आहेत म्हणे. त्यांची कोण काळजी घेत असेल ?

चित्रावर त्यांची माया आहे हें त्यांना ठाऊक असतें. चित्राचें बोलणें त्यांच्या मनांत घरें पाडून जाते. खरेंच. आपण कधीं विचार केला का त्यांचा ? नको. नकोच तो विचार. मग चित्राला जाऊं दे का थोडे दिवस? चित्रा आतां मोठी झालीय्. वयांत आलीय्. तिच्यासाठीं स्थळं पाहिली पाहिजेत. खरें म्हणजे वडिलांनींच पाहायला नको का? चन्दरला तर फुरसत मिळत नाहीं. कातर मनीनें त्या चित्राला संमति देतात.

—मग एके दिवशीं चित्रा त्यांच्याकडे जाते. महिना दोन महिने राहते. पण ती परत येतच नाहीं. अंतःकरण फाडून टाकणारी फक्त बातमी तेवढी येते. . . . . 'चित्रानें आत्महत्या केली.'

त्या तारेला सुद्धा त्या उत्तर देत नाहींत. तिच्या अंत्यसंस्कारालाही त्या जात नाहींत. त्यांना न सांगता, न बोलताही समजलेलें असतें. मनाच्या दूरचित्रवाणीवर त्यांना सगळें दिसत असतें. चित्राच्या मृत्यूनंतर त्या तिच्याविषयीं एक अक्षरही बोलत नाहींत.



## पूर्णविराम !

दिसा देई कोवळीक
  देई शोभाही अंधारा
गोरजाच्या झळाळीत
  विलसतो सायंतारा !

जात्या दिवाकरा काय
  देव आशीर्वाद देतो
येत्या यामिनीच्या भाळी
  शुभ अक्षत लावितो !

जिथे असावें तिथून
  त्याला सन्मुख रहावें
डोळा भरून पाहता
  विश्व नाहीसेच व्हावे !

उरी माजता तुफान
  असा तसा गाजे वारा
त्याच्या दर्शनाने त्याचा
  होतो मंजूळ लेहरा !

जीव होतो लाही लाही
  चढे विखार 'तापां'चा
त्याच्या दर्शनात त्यांचा
  होतो पिसारा चंद्राचा !

त्याला पाहताचं वाटे
  सारे नितळ प्रसन्न
त्याला पाहताच होते
  कृष्ण कमळाचे मन !

माझे आनंदनिधान
  तोच एक सायंतारा
माझ्या जीवनाला तोच
  पूर्ण विराम हासरा !

–इंदिरा

....त्या रांगोळीच्या राखाडीमध्यें त्यांना आतांही चित्राचा चेहरा दिसतो आहे. क्षणांत ती हंसते आहे. क्षणांत तिचा चेहरा भेसूर होतो आहे.

त्या पुनः हातातल्या तारेकडे त्याच शून्य नजरेनें पाहात राहतात. त्यांचा हात लुळा पडतो. वाऱ्याची एक झुळूक येते आणि तारेचा कागद त्यांच्या हातांतून निसटतो. पतंगासारखा गिरक्या घेतो. फोनजवळच तो सांपडतो.

–करावा कां चन्दरला फोन ? त्या स्वतःलाच विचारतात कळवावी कां त्याला ही वातमी ? आल्यावर त्याला कळणारच आहे कीं. कळून तरी काय करावयाचें ? जायचें थोडेंच आहे आपल्याला ? मिलिंद आहेच कीं, तेथें सर्वार्थानें त्यांचा मुलगा तरीही त्यांचें मन हेलकावे खाऊ लागलें. त्यांनीं रिसिव्हर उचलला. पुनः खालीं ठेवला. फोनजवळ मग तशाच अवस्थेंत उभ्या राहिल्या. पायांना कळ आली तशा त्या भानावर आल्या.

पुनः खुर्चीवर येऊन बसल्या. तिकडचें दृश्य त्यांच्या डोळयांसमोर तरळूं लागलें. काढली असेल कां त्यांनीं माझी आठवण? अखेरच्या घटकेला तरी? जवळ तरी? कोण होतें कीं, नाहीं कोणास ठाऊक? .... त्यांनीं मला काय दिलें नि मी काय घेतलें ? बेरीज आणि वजावाकी.

—चन्दरला कळवलें पाहिजे. कळवलेंच पाहिजे. आतां काय ? नातेंच तुटलें, कायमचें. लौकिकदृष्ट्याही ! मरणानंतर कसला द्वेष करायचा ? त्या तरातरा उठतात. चन्दरला फोन करतात.

अर्ध्या तासांतच चन्दर परततो. तीं दोघेंही दिवाणखान्यांत मूकपणानें बसलीं असतात. मूकपणेंच त्या दोघांचा संवाद चालला आहे. चन्द्रला कुठें कांहीं आठवतें. त्या आठवणीनें तो सद्गदित होतो. समोर आपल्या आईला पाहातो आणि क्षणांत त्याचे डोळे कोरडे होतात.

शेवटीं जड आवाजांत तो विचारतो, "आई, जायचं कां मग ?"

"अं ऽ.................नको."

"बरं."

अतिशय उघडत असते म्हणून तो अंगातला भिजलेला सदरा काढतो. आईकडे पाठ करून खिडकीच्या चौकटीला दोन्हीं हात टेकवून तो बाहेर पाहात राहतो.

त्या त्याच्या गोऱ्यापान पाठीकडे पाहातात. त्याचे गोरे गोरे मांसल दंड दिसतात.....

त्यांचें मन चन्द्रकान्त मण्यासारखें पाझरूं लागतें.

एक सुगंधी चांदणी रात्र त्यांचें डोळे गप्पकन् मिटलें अन् कुणीतरी खट्याळपणें ओरडतें "सा ई सु ऽ ट्चो ऽ"

त्या डोळे उघडतात——

खोलीमध्यें अत्तराचा नाजूक मधुर वास भरून राहिला होता कदाचित् खिडकीवाटे आंत वाहणाऱ्या चांदण्याचा तो सुवास असावा. खिडकीबाहेरून आंत डोकावून पाहणारा जाईचा वेल फुलांनीं डंवरलेला होता. तिचा हात दिव्याच्या बटणावर होता—आणि त्या हातावर एका पुरुषी पण प्रेमानें मुलायम झालेल्या एका हाताची पक्कड बसलेली होती.

"असूं दे ना दिवा."

"नको ना ऽ. मला बाई लाज वाटते.."

"बरं. हा दिवा नको तर नको...पण तो आकाशांतला दिवा ?...."

त्यानें तिला पलंगाकडे ओढली. पलंग पोसावरचें चांदणें बेभान होत होतें.

"मला चादणं खूप खूप आवडतं... असंच तुमच्या छातीवर डोकं ठेवून कायमचं विलीन व्हावं चांदण्यांत असं वाटतं.." ती डोळे मिटून बडबडत होती. तो तिच्या मस्तकावर वत्सलतेनें थोपटत होता.

मग त्यांनें तिच्या कपाळावर कुंकू लावतात त्या ठिकाणीं नखानें चंद्रकोर कोरली. मग गालावर, दोन्हीं स्तनांवर, तिच्या मृदु-मांसल पाठीवर, नितंबांवर, मांड्यांवर.........

...वर्षाच्या आंतच चन्द्रशेखराचा जन्म झाला.

...त्या पुनः जाग्या होतात. चन्दर अजूनही खिडकीच्या चौकटीवर हात ठेवून उभा आहे. निश्चल.....

तो क्षणभरानें मागे वळून पाहतो.

त्या निःशब्दपणें रडत असतात.

"चन्दर.....!"

"काय आई ?"

"चल. मिलिंदची तार आली आहे ना ? जायची तयारी कर !"

●●●









रायगडाला जेव्हां जाग येते
दीपावलीचा राजकीय नाट्योत्सव
मी जिंकलों मी हरलों
सुवर्ण नियंत्रण
महाराष्ट्र विरोध
प्रधानमंत्रिपद
काँग्रेस अध्यक्षपद

अनुक्रमणिका




दीपावलीचा राजकीय नाट्योत्सव






## दीपावलीचा राजकीय नाट्योत्सव






अनुक्रमणिका






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

सकाळपासूनच माझं मन गोंधळलं होतं. कचेरींत आल्यापासूनच. प्रसन्नकुमार दिसले त्या क्षणापासूनच....

दुपारीं 'लंच'च्या वेळीं किंवा संध्याकाळीं ऑफिस सुटायच्या वेळीं ते येणार, 'येणार ना?' असं म्हणणार आणि त्यांनीं असं विचारलं कीं, माझ्या मनाचा गोंधळ उडणार हें मला माहित होतं. आतांशा रोजच असं होत होतं......

मला अनेकदां वाटे कीं, माझं मन मी थोडं आवरलं असतं, मी थोडी सावधपणें वागलें असतें तर कदाचित् आयुष्यांतल्या घोपट मार्गावरून मी गेलेंहि असतें. माझ्या अंतःकरणातलीं दुःखं कुणाला दिसलीं नसतीं आणि त्यांच्या वेदना कुणाला कळल्या नसत्या तरी लोकदृष्टीनं माझा संसार सुखाचा झाला असता, सासूबाईनीं माझं कौतुक केलं असतं आणि कदाचित् माझ्या दुःखाचा फणकारा कालांतरानं थांबलाहि असता. माणसाच्या दुःखावर काळासारखं दुसरं औषध नाहीं म्हणतात, तें खरं असेल तर माझं दुःख कालांतरानं मी विसरलेंहि असतें, निदान तें कमी तरी झालं असतं....

पण आतां असा विचार करण्यांत अर्थ नव्हता हेंहि मला समजत होतं. झालं तें होऊन गेलं होतं. मागं उरल्या होत्या त्या फक्त त्याच्या आठवणी-बोंचणाऱ्या टोंचणाऱ्या. अंतःकरण विदीर्ण करणाऱ्या.

मुंबईंत आल्यापासून मात्र त्याहि हळूहळू पुसट होऊं लागल्या होत्या त्या मी नोकरीला जाऊं लागलें तेव्हां. अखेर काकांचंच म्हणणं खरं झालं होतं. जवळ जवळ सहा महिने मी आतां माहेरीं राहिलें होतें. आणि पुन्हां आपल्या घरीं परत जाईन अशी आशा उरली नव्हती. सामोपचाराचे सगळे मार्ग चोखाळून झाले होते, सारी मनधरणी करून झाली होती, पण विभाकर कांहीं एक ऐकून घ्यायलाच तयार नव्हते. 'माझं लग्नच झालं नव्हतं असं मी समजेन. पाहिजे तर तुम्ही कोर्टांत जा. मग जें व्हायचं असेल तें होईल. पण माझा निर्णय आतां बदलायचा नाहीं!' असं विभाकरनीं निक्षून सांगितलं तेंव्हांच सारं संपलं होतं. चूक कोण आणि बरोबर कोण हा मुळीं प्रश्नच नव्हता. विभाकर मला घरांत घ्यायलाच तयार नव्हते. गळ्यातलं मंगळसूत्र सांगत होतं कीं, माझं लग्न झालं होतं, पण नशिबीं आलं होतं तें स्त्रीचं अविवाहित जिणं. कंटाळवाणं. रुचिहीन. गतिहीन.....

मात्र असें झालं होतं तरी बाबा स्वस्थ बसले नव्हते. त्यांच्या रक्तांतला वकील त्यांना स्वस्थ बसूं देत नव्हता. 'त्याला कोर्टांत खेंचीन' असं म्हणूं लागले होते. पण मीच त्यांना तसं करूं देत नव्हतें. एकदां सारं प्रकरण कोर्टांत गेलं कीं, सारे धिंडवडे होणार होते, वकील नाहीं नाहीं ते प्रश्न विचारणार होते, नाहीं नाहीं ते





अनुक्रमणिका

**म्हणजे अखेर आम्हीं दोघेही एकमेकांना फसवीत होतो. आणि ही फसवणूक थांबवायी कशी ही एकच विवंचना दोघांच्याही मनांत होती हें लक्षांत येतांच मी हंसले आणि....**

साक्षीदार उभे राहाणार होते, वर्तमानपत्रांतून हें सारं प्रकरण रंगणार होतं, लोक कुचेष्टेनं हंसणार होते. हें सारं मला दिसत होतं आणि म्हणूनच बाबांना त्या मार्गानं मी जाऊं देत नव्हते. 'माझ्या यातना मी सोशीन, माझ्या नशिबांत असेल तें मी भोगीन' असं मी त्यांना सारखी सांगत होतें, त्यामुळं ते हताश झाले होते...

कुठून तरी ही सारी बातमी मुंबईला काकांच्या कानावर गेली होती. माझं लग्न झाल्याला चार-सहा महिनेहि झाले नव्हते, तोंच हा काय प्रकार झाला हें न समजल्यामुळें एके दिवशीं अचानक ते आले होते. 'पुण्याला फार दिवसांत आलों नव्हतो, म्हणून आलो सहज !' असं ते आल्याबरोबर बाबांना म्हणाले होते, पण त्यांच्या येण्याचं कारण मग त्यांना गुप्त ठेवतां आलं नव्हतं. बाबा कोर्टांत आणि आई शेजारीं गेली आहे अशी संधि साधून ते मला म्हणाले होते,

"मधु, मला सारं सारं सांग पाहूं काय झालंय् तें !".....

म्हणजे यांच्या कानापर्यंत गेल्या वाटतं या साऱ्या गोष्टी !' या विचारानं मी चरकलें होतें. 'गोपाळला कशाला कळवायचं उगीच ?' असं बाबा म्हणाले होते, तशी आई त्यांना म्हणाली होती,

"येऊन जाऊं दे एकदां गोपाळ भावजींना. ते काढतील कांहीं तरी नवी तोड."

तरीही बाबांनीं तिचं ऐकलं नव्हतं. गोपाळकाकांना त्यांनीं पत्र पाठविलं नव्हतं म्हणूनच ते रिक्षांतून खालीं उतरलेले दिसतांच आतां त्यांच्या कानावर साऱ्या गोष्टी जाणार याची प्रथम मला भीति वाटली होती, पण क्षणांत माझ्या मनांत आलं होतं, गोपाळकाका आले हें बरंच झालं एका अर्थानं. सारं कांहीं त्यांना सांगतां येईल आणि कदाचित् या विचित्र परिस्थितींतून ते मार्ग काढतीलहि.....

आणि झालं होतं तसंच.......

आल्यानंतर थोड्या वेळांतच काकांनीं हा प्रश्न काढला तशी मी गांगरलें होतें. विषय टाळण्याचा मी प्रयत्न केला होता, पण तो साधत नाहीं हें पाहून मी अखेर म्हणालें होतें,

"कशाला तुम्हांला सांगूं सारी कर्मकथा ?......."

"पण तूं ती सांगितली नाहींस तरी लोकांना ती समजल्याशिवाय राहात नाहीं, मधु !"

"म्हणजे तुम्हांला कुणी सांगितलं ? काय सांगितलं ?...."

माझ्या स्वरांतली उत्सुकता त्यांना जाणवली होती.

"मी जें ऐकलं तें सारं अर्धवट, पण तें ऐकल्यावर मला राहवेना. दादाला पत्र पाठवलं तर तो सारं सविस्तर लिहील कीं नाहीं तें कळेना. म्हणून म्हटलं स्वतःच जाऊन यावं....."

त्यांचं बोलणं ऐकून मला जरा बरं वाटलं होतं. ते माझ्यावर रागावतील, अशी भीति माझ्या मनाला वाटली होती, ती खोटी ठरली होती.

मग सांगतां येतील तेवढ्या स्पष्टपणानं मी साऱ्या गोष्टी त्यांना सांगितल्या होत्या आणि म्हणाले होते,

"मला फार वेळां वाटतं मी असं वागायला नको होतं. माझं मन मी आवरायला हवं होतं......"

माझ्या या शब्दांनीं काका स्तब्ध झाले होते. त्यांची ती स्तब्धता मला मोठी अशुभ वाटली होती.

पण थोड्या वेळानं ते म्हणाले होते,

"हें बघ मधु, माणसाला आपल्या चुका जेव्हां दुरुस्त करतां येत नाहींत, त्या वेळीं पराभव पत्करायचा असतो. पराभवाला सामोरं जायचं असतं. परिस्थितीकडे पाठ फिरवून प्रश्न कधीं सुटत नसतात. त्यांना तोंड द्यावंच लागतं माणसाला जगायचं असेल तर !"

"पण पराभव पत्करायचा म्हणजे काय करायचं......"

"त्याचाच विचार करतोय मी. दादाला माझा विचार पटेल कीं नाहीं मला समजत नाहीं, पण यापुढें तूं इथं राहूं नकोस.

## आठवण : एक : गोष्ट

—वि. वा. पत्की

मुंबईला चल. इथं राहिलीस तर रोज त्याच त्याच आठवणी येत राहातील. तींच तींच माणसं भेटतील आणि तुझ्या दुःखाला अशा रीतीनं डिवचतील कीं, त्या जखमेवर कधीं खपली धरायचीच नाहीं, ती जखम नेहमीं वाहातच राहील......"

"पण मुंबईला येऊन तरी मी काय करूं ?......"

"तूं मुंबईला तर चल. मग पाहूं तिथं गेल्यावर काय करायचं तें !"

जें विचित्र जिणं माझ्या नशिबीं आलं होतं त्यांतून बाहेर पडण्याचा एक मार्ग काका सुचवीत होते. पण बाबांना आणि आईला तो कितीसा आवडेल, तीं मला मुंबईला जाऊं देतील का, अशी शंका माझ्या मनाला येत होती. ती त्यांनीं दिली नाहीं तर आपल्या नशिबांत आलेला दुःखाचा कडवट घांस जन्मभर मुकाट्यानं गिळींत बसण्यावांचून गत्यंतर नाहीं हें मला उघड दिसत होतं.

तरी अखेर काकाच या विचित्र परिस्थितींतून मार्ग काढतील असं मात्र माझं मन मला सांगत होतं.....







आणि माझा अंदाज चुकला नव्हता....

'गोपाळ म्हणतोय तर तूं जा थोडे दिवस मुंबईला' असं अखेर बाबा म्हणाले तेव्हां मला आनंद झाला होता.

पण मुंबईला जायचं म्हणजे नव्या जीवानला प्रारंभ करायचा होता, एकाकी जिणं जगायचं होतं. इथं सोबत राहणार होतीं ती जुन्या आठवणींची, जें घडायला नको होतें पण घडलं होतं त्याची. काका म्हणत होते कीं, 'मधुमती, तूं काय पदवीधर आहेस, तुला सहज नोकरी मिळवून देतां येईल आणि एकदां नोकरींत तुझं मन रमलं कीं, अप्रिय विचारांचीं शल्यं तुला बोचत राहायचीं नाहींत, तुला त्यांची आठवणही होणार नाहीं. हळूहळू तूं सारं विसरशील—' काकांचं म्हणणं मला खरं वाटत नव्हतं, पण एकदां वाटत होतं. काका म्हणतात तसं करून तर पाहावं. तें नाहीं जमलं, तर यावं पुन्हां पुण्यांत परत, राहवं घरीं, वाटलं तर धरावी एखादी नोकरी इथंच.....

मी पुण्याहून मुंबईला जायला निघालें होते. क्षणाच्या समाधानासाठीं मी हें काय करून बसलें हा विचार गाडी धावूं लागली तसा माझा पाठलाग करूं लागला होता. जिवाची सारखी तगमग होत होती. माझ्याच विचारांच्या तंद्रीत मी चाललें होते. सभोंवतीं चाललेलीं बोलणीं, हंसणीं, खिदळणीं, मुलांचीं रडणीं, माझ्या लेखीं तियं नव्हतीच. समुद्रांत एकाकी बेट असावं तशी सभोंवतालच्या कोलाहलांत मी मांडी दुमडून एकटीच बसलें होते. आणि डोळ्यापुढून सरकत होतीं तीं गतायुष्यांतलीं चित्रं....



माझं लग्न झाल्याला सहा महिने सुद्धां झाले नव्हते. संसारातलीं नवी नव्हाळी अजून ओसरली नव्हती. वास्तविक माझं लग्न झालं होतं तें इतर दहा जणींच्यासारखंच दाखवून, पसंत पडून, देणीं-घेणीं ठरवून, रूसणीं-रागावणीं यांच्या कडकडाटांत. जीवनाचा नवा मार्ग सुरू झाला या विचारांत बाबा आणि आईच काय पण मीसुद्धां होते. पायांत अडकून बसलेला कांटा मधेंच एखाद्या वेळीं सलावा तसं एक दुःख मनांत बोचत असे, पण विभाकरांच्या सहवासांत आणि वैभवांत त्याची आठवण सहसा होत नसे. मला कितीदां तरी वाटे, मला आयुष्यांत काय कमी आहे म्हणून या दुःखाची आठवण मनांत राहावी ? विभाकरांचं प्रेम, सासुबाईंना कौतुक सारं सारं माझ्या वांट्याला आलं होतं. देहूरोडला एका लष्करी कचेरींत विभाकर चांगल्या हुद्याच्या जागेवर होते, राहायला चांगलं घर होतं, कसलीच उणीव म्हणून नव्हती.

पण दैवाला हें सारं पाहवलं नाहीं कीं काय कुणास ठाऊक ?

संध्याकाळीं विभाकर कचेरीतनं आले कीं, त्यांच्या बरोबर बाहेर जातां यावं म्हणून घरांतलीं सारीं कामं आटपायचीं, मंडईतनं जाऊन यायचं आणि पातळ बदलून तयार राहायचं हा माझा नित्यक्रम झाला होता. अशीच एके दिवशीं भाजीची पिशवी घेऊन मंडईतनं मी बाहेर पडत होते तोंच माझ्या कानांवर शब्द आले,

"मधु !"

शब्द ओळखीचा वाटला म्हणून मी मागं वळून पाहिलं तों जयंत उभा होता !

सारं क्षणांत आठवलं होतं...जयंतची सहज पडलेली गांठ, त्यानं योजनापूर्वक केलेल्या अनेक गोष्टी आणि माझ्यासाठीं त्याचा सदा हुरहुरलेला जीव ! मला भेटण्याची, माझ्याशीं बोलण्याची एकहि संधि तो कधीं वाया जाऊं द्यायचा नाहीं. पण त्याच्या सहवासांत माझ्या भावना कधीं फुलतच नाहींत हें माझ्या लक्षांत आलं तसा त्याचा वाढता सहवास टाळावा कसा हा एक नवा पेंच माझ्या आयुष्यांत निर्माण झाला. त्याच्या शब्दांतली आणि डोळ्यांतली आर्तता माझ्या दृष्टीस पडली कीं वाटे, याच्या प्रीतीला प्रतिसाद देतां येणार नाहीं मला कधीं ! तरीही मला त्याचा राग कधीं यायचा नाहीं, दया यायची ! मी त्याला टाळीत आहे हें त्याच्या लक्षांत आलं, तसा तो उदास झालेला दिसूं लागला. माझं कॉलेजचं अखेरचं वर्ष होतं, आणि त्याच्याकडे लक्ष द्यायला मला सवड नव्हती हें खरं, पण तो कधीं नियमितपणें कॉलेजांत यायचा नाहीं. दोरी तुटलेला पतंग वाऱ्याच्या लहरीवर तरंगत जावा तसा तो वागायचा. त्याला जें हवं होतं तें मी त्याला देऊं शकत नव्हते. त्याला जें हवं होतं तें तो उघडपणें माझ्याजवळ मागूं शकत नव्हता, त्याच्या मनाचा कोंडमारा मला दिसत होता, पण मी कांहींहि करूं शकत नव्हते.......

घरांत आईला माझ्या लग्नाची घाई झाली होती. परीक्षा आटोपली कीं, मधुमतीचं लग्न करायचंच असा बेत तिनं मनाशीं केला होता. ती उघडपणें बोलत नव्हती, पण तिच्या तुटक शब्दांतून तिच्या मनांत चाललेले बेत मला समजत होते....

अनुक्रमणिका

त्यांतच एके दिसव बाबांनीं एक चांगलं स्थळ सुचविलं. विभाकर एम्. एस् सी. आहेत, देखणे आहेत, सधन आहेत हें तर मी पाहात होतेंच पण अत्यत नम्र आणि शालीन आहेत. घरातलं सारं वातावरण मोठं पवित्र आहे याची जाणीव माझ्या मनाला होतांच बाबांनीं आणि आईनं विचारण्यापूर्वींच मी मनानं 'हो'कार दिला. कांहीं तरी निमित्तानं मग विभाकर घरी येऊं लागले आणि आम्ही बोलत बसलो किंवा क्वचित् कधीं बाहेर गेलो तर त्यांत कांहीं वावगं आहे असं कुणालाच वाटेनासं झालं....

कुठून तरी ही बातमी जयंतला कळली होती. परीक्षेला अजून महिन्याभराचा अवकाश होता. प्राध्यापकांचीं लेक्चर्स संपत आलीं होती. वाचनालयांत बसून वाचतां येईल तेवढं मी वाचीत होते. अशीच एक दिवस मी वाचनालयांतून बाहेर पडत असतांना जयंत माझ्याजवळ आला आणि मला म्हणाला,

"तुझं अभिनंदन करतो तें आतां मनापासून. तुझ्या प्रीतीला मी पात्र नाहीं हें मला जाणवलं. त्याच दिवशीं सारं संपलं. आपण कुणावर तरी प्रेम केलं आणि त्या प्रेमासाठीं वेडे झालो हा एकच आनंद माझ्या आयुष्यांत आतां उरला आहे...."

हें सारं जयंत मोठ्या कष्टानं बोलत होता हे समजत होतं. माझ्या संगतींत गेलेले क्षण त्यानं आपल्या मनाच्या गाभाऱ्यांत सांठवून ठेवले होते हें मला माहित होतं. त्या साऱ्या स्मृती त्याच्या-अंतःकरणांत अजून कशा ताज्या होत्या ! त्यामुळें बोलतांना त्याचा स्वर घोगरा झाला होता, पापण्या थरारल्या होत्या. आणि डोळ्यांत आँसवं जमलीं होतीं......

पण त्याची कशी तरी समजूत घालायला हवी म्हणून मी म्हणाले होते,

"असं कांहीं तरी वेड्यासारखं बोलूं नकोस !......."

"वेडाच आहे मी, मधु ! वेडाच आहे !!!....."

मग तिथून गेला होता तो सावकाश, मंद मंद पावलं टाकीत. शरीरांतला सारा उत्साहच गेल्यासारखा...एक शब्दहि न बोलतां......

विभाकरसारख्या देखण्या, हुषार, श्रीमंत तरुणाशीं आपलं लग्न होणार याचा आनंद एकीकडे होत असतानांच जयंतची मलूल, व्याकुळलेली चर्या माझ्या दृष्टीपुढें येई आणि मला वाटे, 'गरीब विचारा !'

माझं लग्न होऊन माझ्या संसारांत मी रमले, सुखाच्या पाय-घड्यांवरून मी चालूं लागले, विभाकरांच्या सान्निध्यांत माझी तहान-भूक हरपूं लागली तरी एखाद्या वेळेस माझ्या मनांत यायचं, जयंत एकदां मार्गाला लागायला हवा. त्याचं लग्न व्हायला हवं.

पण तसं कधींच झालं नाहीं. तो कधीं भेटला नाहीं कीं, दिसला नाहीं आणि म्हणूनच मंडईतून बाहेर पडतांना 'मधु !' असे ओळखीचे शब्द कानावर येतांच मी मागं वळून पाहिलं होतं आणि जयंताला पाहातांच क्षणभर दचकले होते......

वैवाहिक जीवनांतली तृप्ति माझ्या अंगांगांतून निथळत असलेली त्याला दिसली होती कीं, काय कुणास ठाऊक, पण तो अवाक् होऊन नुसता माझ्याकडे पहात होता. त्याला कांही तरी बोलायचं होतं हें त्याच्या ओठांच्या पाकळ्यांची जी हालचाल झाली त्यावरून माझ्या लक्षांत आलं, पण तो कांहीं बोलण्याच्या आंतच मी त्याला म्हणाले,

"मला वाटलं होतं तू पुण्यातनं गेलास कुठें तरी !...."

"गेले नाहीं, पण जाणार आहे. कायमचा !......"

कायमचा ?'....."

"होय, कायमचा ! तूं कधींच दृष्टीस पडणार नाहींस अशा ठिकाणीं जाऊन राहाणार आहे मी आतां......."

तो असं म्हणाला तेव्हां काय बोलावं हेंच मला समजेना. त्याच्या वाणींतली आर्तता माझं काळीज् चरचर कापीत होती. ती ऐकवत नव्हती. मी कांहींच बोलत नव्हते हें पाहूनच कीं काय तो म्हणाला,

"पण......."

मी नुसतं प्रश्नार्थक मुद्रेनं त्याच्याकडे पाहिलं. तो काय सांगणार आहे हें न समजल्यामुळं तो जें सांगणार होता तें ऐकायला माझं मन अधिकच उत्सुक झालं.

तो कष्टानं सांगूं लागला,

"पण जाण्यापूर्वीं वाटतं कीं, एकदां आपण भेटावं मोकळे-पणानं बोलावं. तुझ्या सहवासाचं जें सुख आयुष्यांत यानंतर कधींच मिळणार नाहीं तें घेतां येईल तेवढं घ्यावं आणि त्याच्या आठव-णीवर उरलेलं आयुष्य काढावं."

त्याचे शब्द मला ऐकवत नव्हते. माणूस एवढा हळवा असतो हें मला खरंच वाटत नव्हतं आणि म्हणूनच त्याच्याविषयीं एक विचित्र करुणा माझ्या मनांत दाटून आली होती. तो म्हणतो तसं वागणं—आणि विशेषतः माझ्यासारख्या विवाहित स्त्रीनं वागणं किती कठीण आहे हें लक्षांत येतांच माझं मन क्षणभर गांगरलं होतं, पण त्याला दुःखविणंहि जीवावर येत होतं. विशेषतः पुण्यां-तून कायमचं निघून जाण्याच्या वेळीं त्यानं नुसत्या भेटीची इच्छा व्यक्त करावी आणि त्याची तेवढी इच्छाहि पुरी करण्याचं आपण मान्य करूं नये हें मला निष्ठुरपणाचं वाटलं.

"बुधवारांतल्या पोस्ट ऑफिसच्या बस स्टॉपजवळ दीड वाजतां थांब" असं जयंत म्हणाला होता, तें त्याचं वाक्य त्या दिवशीं








अनुक्रमणिका

## युद्धबंदीसह ब्लॅक-आऊट झालाच पाहिजे !




वरं झालं नेमकं दिवाळीच्या मोक्यावर ब्लॅकआऊट आला. अहो ! रजा न घेतां मी यंदा 'पंचवीस टाकल्या.

रात्रभर डोक्यांत घिरट्या घालीत होतं. माझं कुठेंच लक्ष लागत नव्हतं. विभाकर कांहीं तरी विनोद करीत होते आणि तो न समजतांहि मी हंसत होते. जयंतला भेटावंसं तर वाटत होतं, पण विवाहित स्त्रीनं असं वागणं योग्य नव्हे असाहि विचार माझ्या मनांत येत होता. हा विचार मनांत आला कीं जयंतची दीन मूर्ति माझ्या दृष्टीसमोर येत होती. त्याची अखेरची इच्छा तरी पूर्ण करावीअसं वाटत होतं. . . .

"माझी एक मैत्रिण दिल्लीला जाणार आहे तिला पोंचवायला मी स्टेशनवर जाऊन येते हं !" असं सासूबाईंना सांगून मी घरातनं बाहेर पडले होते. आपण केवढ्या सफाईनं खोटं बोललो याचा अचंबा माझ्या मनाला वाटत होता. अजून दीड वाजला नव्हता. जयंतला वाट पाहायला लावूं नये असं वाटून मी थोडी लवकर तिथं गेले, तो जयंत तिथं उभा !

मला आलेली पाहातांच तो हंसला होता. खरखरीत उन्हांत त्याच्या मनांत शीतल चादणं झालं होतं. त्या उल्हसित वृत्तींतच मग त्यानं एका रिक्शावाल्याला थांबविलं होतं आणि मी बसलें तसा तोहि आंत बसला होता. . . . माझ्या शेजारीं. . . पण थोडं अंतर ठेवून. . . . .

'कुठे जायचं आपण ?' असं विचारायची संधीच त्यानं मला दिली नव्हती. 'आपण कँपातल्या एका हॉटेलांत जाऊं या, थोडा वेळ बसूं या, बोलूं या' रिक्शा चालूं झाल्यावर जयंत मला म्हणाला होता. पण मग हॉटेल येईपर्यंत तो कांहीं बोललाच नव्हता. नुसता माझ्याकडे पाहात होता. त्याच्या दृष्टींतला तो केविलवाणा भाव मला पाहवेना. तो पुणं सोडून कुठें तरी जाणार होता तो अखेर माझ्यामुळंच हें लक्षांत येतांच माझं मन हेलावलं होतं. 'त्याच्या जीवनाची अशी वाताहत झाली याला कारण तूंच !' असं माझं मन अखेर मला म्हणालं तसं त्याच्याकडे पाहायचं धैर्यहि मला होईना. . . .

हॉटेलांत गेल्यावर आम्ही 'फॅमिली रूम'मध्यें बसलों. त्यानं कसलं तरी थंड पेय मागविलं आणि तें घेऊन वेटर येईपर्यंत त्यानं माझं आपाद निरीक्षण केलं होतं. तो असा कां पाहातो आहे हें मला कळेना तशी मी त्याला म्हणाले होतें,

"असा काय पाहातो आहेस ? . . . ."

"तुझी मूर्ति डोळ्यांत सांठवून ठेवतो आहे. . . ."

त्याच्या त्या शब्दांनीं माझं मन कळवळलं. प्रीति म्हणजे काय हें आजपर्यंत मला कधीं कळलं नव्हतं, पण जयंतच्या या शब्दांनीं प्रीतीचा साक्षात्कार मला घडविला होता. त्याचं समाधान मी या जन्मांत तरी कधींच करूं शकणार नाहीं या विचित्र जाणीवेचं शल्य माझ्या मनांत प्रथमच ठुसठुसलं होतें. जें झालं आहे तें बदलतां येत नाहीं हें माझ्या मनाला प्रथमच उमगलं होतं. .

मग किती वेळ तरी आम्हीं बोलत बसलो होतो. उगीचच. कोणताहि विषय नसतांना. तरी ही जयंतचं बोलणं संपत नव्हतं. फार दिवसांनी आमची गांठ पडली होती याचा आनंद त्याच्या शब्दांत होता, तसंच ही आतां अखेरचीच भेट याचा विषादहि ! एक विषय संपला कीं, मोठ्या चातुर्यानं तो दुसरा सुरू करीत होता. तें बोलणं संपवावंसंच जणुं त्याला वाटत नव्हतं. . . .

याच्या या वेडाला म्हणावं तरी काय हेंच मला समजत नव्हतं. हें कुठलं याचं मुलखावेगळं प्रेम असं मला वाटत होतं. पण त्याची एक तरी इच्छा आपणाला पुरी करतां आली याचा आनंद माझ्या मनाला वाटला होता. त्याच्या निरपेक्ष प्रीतीनं माझं मन व्याकुळ झालं होतं. . . . .

अखेर आम्हीं उठलो ते उठायलाच हवं म्हणून.

तीन वाजायला झाले होते. विभाकर साडेपांचाला घरीं यायच्या आंत मला घरीं जायला हवं होतं. घरातनं बाहेर पडले होते, खोटं बोलले होते, पण एकदां तरी जयंतच्या मनासारखी मी वागले होते, अखेरच्या ताटातुटीच्या क्षणीं तरी त्याचं मन निवलं असेल या आशेनं मी घरीं परत आले होते. . . . .

आणि दचकले होते ! . . . . .

बाहेरच्या लोखंडी रॅकवर विभाकरांच्या बुटाचे जोड मला दिसले होते !

'म्हणजे विभाकर आज लवकर घरीं आले तर !' असं मनाशी म्हणत मी माझ्या खोलींत शिरले, तों उशींत डोकं खुपसून झोंपलेले विभाकर माझ्या दृष्टीस पडले होते !

क्षणभर मी चपापले, पण जाणारा तोल सावरीत मी त्यांना म्हणाले होते,

"नाटक तर छान केलं आहे झोंपल्याचं ! . . . . ."

निद्रिस्त माणसाच्या अंगावर उकळत्या पाण्याची धार सांडली तर तो ज्या तिरीमिरीनं उठेल तसेच उठत विभाकर म्हणाले होते,

"नाटक कोण करतंय् ? तूं कीं मी ?" . . . . ."

त्यांच्या शब्दांचा आघात माझ्यावर झाला तसं मला भोंवळ आल्यासारखं झालं. माझ्या तोंडातून शब्दच फुटला नाहीं. मी गप्प राहिले तसं नवं अवसान आल्यासारखे ते कडाडले,





अनुक्रमणिका

"दिल्लीला मैत्रिण जायची आहे. तिला पोंचवायला स्टेशनवर जाते म्हणून आईला खोटं सांगितलंस ? कशासाठीं तूं हें खोटं बोललीस ? मला ठाऊक आहे! मला फसविण्यासाठीं ! माझ्या डोळ्यांत धूळ फेंकण्यासाठीं ! . . . . . . . ."

"पण मी कुठें गेले होते तें तरी ऐकाल ? . . . . . ."

"सांग, सांग. आणखी खोटं सांग . . . . . . . . . . ."

"कांहीं सांगितलं तरी तुम्हीं खोटंच सांगते आहे म्हणणार असाल तर कशाला सांगूं ? . . . . . ."

"पण तूं सांगितलं नाहींस तरी माझ्या डोळ्यांनीं पाहिलंय, कानांनीं ऐकलंय तूं काय करीत होतीस आणि काय बोलत होतीस तें ! . . . . . . . . . ."

आमचं हें बोलणं चाललं होतं तोंच शेजारीं गेलेल्या सासूबाई आल्या होत्या. मला भीति वाटली कीं, विभाकर त्यांच्या देखत कांहीं बोलतात कीं काय. पण तसं झालं नव्हतं. जणुं कांहीं घडलंच नव्हतं असं कुणालाहि वाटावं असे विभाकर वागले होते . . . .

पण रात्रीं सारी निजानीज झाल्यावर ते उठले होते, ताड ताड बोलूं लागले होते. त्यांच्या शब्दांना विलक्षण कंप आला होता. त्याचं सारं शरीर थरथरत होतं. संतापानं त्यांच्या शब्दांना धार आली होती. नेहमीं शांत, प्रसन्न, शालीन दिसणाऱ्या त्यांच्या चर्येवर राग, तिरस्कार यांचं तांडव मला दिसलं, तशी मी हादरले.

"तुला वाटलं असेल आपणांला कुणी पाहात नसेल, पण ज्या हॉटेलांत तूं कुणाबरोबर तरी बसली होतीस तिथं मीहि होतो. तुझ्या आवाजासारखा आवाज ऐकूं आला तरी माझा विश्वास बसेना, 'छे, ही मधुमती नव्हे' असं मी माझ्या मनाला बजावलं, पण मग तुम्हीं काऊंटरजवळून जोडीनं बाहेर पडलांत तेव्हां माझ्या डोळ्यांवरच माझा विश्वास बसेना. वाटलं होतं, ताडकन उठून तुझ्याजवळ जावं आणि तुला विचारावं, 'मधुमती, तूं ? पण माझं मन मला आवरावं लागलं. कोहिमाला बदलून जाणाऱ्या एका अधिकाऱ्याला निरोप देण्यासाठीं आम्ही जमलो होतो, त्या समारंभाचा बेरंग होईल अशी भीति मला वाटली . . आणि घरी आलो तर आईनं सांगितलं कीं, तुझी मैत्रिण दिल्लीला जाणार आहे तिला निरोप देण्यासाठीं तूं स्टेशनवर गेली आहेस ! . . ती तुझी मैत्रिण होती होय ? कां फसवलंस मला तूं असं ! . . .

"पण माझ्याबरोबर होता तो कॉलेजांत. पुणं सोडून कायमचा—"

"नाहीं, ऐकवत नाहीं मला हें ! तो पुणं सोडून जाणार होता, त्याला निरोप द्यायचा होता तर तूं मला कां नाहीं सांगितलंस ? माझ्यापासून हें सारं तुला लपवावंसं वाटलं याचा अर्थ एकच आहे . . . . याचा अर्थ एकच आहे . . . . . ."

विभाकरना अश्रु आवरले नव्हते. त्यांच्या हुंदक्याचा आवाज बाहेर जाईल, सासूबाई उठून येतील, सारे शेजारी जमा होतील या भीतीनं मी गांगरले आणि विभाकर असहाय्यपणानं स्फुंदूं लागले तेव्हां तर 'काय झालं हें' या विचारानं माझं डोकं भणाणलं पाय थरथर कांपूं लागले. घशाला कोरड पडली. तोंडातनं शब्द फुटेना . . .

[ पिवळ्या बांबूच्या बनांत मर्ढेकर पुन्हां येतील काय ? ]
मन बाबूचे काळ्या गाते
रेडिओंतलीं फिल्मी गीतें
चाळींचाळींत एकच ठेका
रम्पम् पो इना (मिना) डिका
नवकवि करितो चंगी मंगी
नवकविता पण आंखुड शिंगी
त्या शब्दांतुन अर्थ न फुटतो–
खुद्द कवीला, म्हणून रडतो
घराघरातिल रेडिओतुनी
गीत उमटतें म्हणुनि सिलोनी
पोरांचा अन् उभा घोळका
ऐकत असतो गीत बिनाका
उडती चाल मिरवते तोरा
गाता हा हाऽऽहि हो ऽऽहू हू ऽऽ
मन बाबुचे म्हणुनि गातें
शिटींत राहुनी जंगली याऽहू !



**मन बाबूचे काळ्या गाते**

आपलं डोकं दोन्ही हातानीं घट्ट धरून स्वतःशींच बोलल्यासारखे विभाकर म्हणत होते,

"आयुष्यांत मी सांभाळलं एकच ! चारित्र्य ! पण त्याचाच तूं बाजार मांडलास. हा व्यभिचार आहे असं लोक म्हणणार नाहींत कदाचित्. शरीरानं केलेला हा व्यभिचार नव्हे, पण मनानं केलेला हा व्यभिचारच आहे. आपल्या हातून घडलेल्या पापाला पुरावा लागत नाहीं, कारण मन त्याला साक्षी असतं. तूं मला फसवशील, पण तुला स्वतःला फसवतां येणार नाहीं. मला फसवूं नकोस, स्वतःला फसवूं नकोस आणि या घरांत राहूंहि नकोस. या घरांत राहाण्याचा तुला हक्क नाहीं. आपल्या आचरणानं तो तूं गमावला आहेस . . . . . . . ."

मी काय ऐकत आहे हेंच मला समजत नव्हतं. विभाकरांच्या मनांत माझ्याबद्दल जो गैरसमज झाला होता तो कसा घालवावा आणि त्यांची समजूत कशी घालावी हा विचार मला अस्वस्थ करीत होता. मी त्यांना किती तऱ्हेनं सांगून पाहिलं. त्यांच्या विनवण्या केल्या, दोन्हीं घराण्यांच्या अब्रूचा प्रश्न आपणांपुढें कसा आहे हें सांगून पाहिलं पण ते कांहीं ऐकायला तयार नव्हते. "या घरांत पाप कधीं नांदणार नाहीं. तूं या घरातनं बाहेर जा. उगीच त्रागा करायला लावूं नकोस, पण तुला तें हवं असेल, तर तेंहि मी सारं करीन . . . . ."

सारा युक्तिवाद संपला होता. विभाकर कुणाचंच ऐकायला तयार नव्हते. अनुतापाच्या अग्निदिव्यानंतरहि मी शुद्ध झाले असं मानायला ते तयार नव्हते. त्यामुळं जीवनाचा नवा मार्ग आतां

अनुक्रमणिका

सुरू झाला होता. या रस्त्यावर कुणाची सोवत नव्हती, संगत नव्हती. परित्यक्तेचं जिणं नशिवी आलं होतं......

पण काकानीं यांतून मार्ग काढला होता. मी मुंबईला आलें होतें. नोकरीला लागलें होतें. सारं विसरण्याचा प्रयत्न करीत होते म्हणून बाबानीं चालविलेले सारे प्रयत्न निष्फळ झाले होते. तसा तो मार्ग कायमचा वंद झाला या खात्रीनं मी नव्या जगांत रमूं लागले होते. नव्या ओळखी झाल्या होत्या, नव्या ओळखी वाढत होत्या... अंत:करणांतलीं शल्यं वोंचेनाशीं झालीं होती. पण गळयांतलं मंगळ-सूत्र मला पुन: पुन्हां सांगत होतं, तूं विवाहित आहेस, पराधीन आहेस......विशेषत: कचेरींतल्या वरोवरीच्या इतर मैत्रिणी रोज संसारांतल्या गोष्टी वोलत, आपल्या 'मिस्टरां'चं कौतुक करीत आणि मी या सगळ्या चर्चेपासून अलिप्त राही तेव्हां वरोवरीच्या मैत्रिणी आपापसांत कांहीं तरी कुजवुजत. 'अशी कशी ही मधुमती आठवले!' असं म्हणत तेव्हां त्यांना सारं कसं समजावून सांगावं हें मला कळत नसे....आपण विवाहित आहों या विचारांचं ओझं तेवढंच शिरावर होतं, त्या जीवनांतल्या साऱ्या सुखांना मात्र मी पारखी झाले आहे या विचित्र जाणीवेची टोंचणी अहर्निश माझ्या मनाला लागलेली असे; त्यामुळं माझ्या कामाकडेहि माझं मन कधीं कधीं लागेनासं होई....... असं झालं कीं मला वाटे,

'हें असं आतां जन्मभर तर चालणार नाहीं?....'

हा विचार माझ्या मनांत पुन: पुन्हां येऊं लागला तशी मी वेचैन झाले. माझ्या मनाची ती अवस्था प्रथम लक्षांत आली ती काकांच्या. महिनेन् महिने मी घरांत वावरत होते ती एखाद्या निर्जीव वाहुलीसारखी हें त्यांनीं मनानं टिपलं होतं. कचेरींत



शी: हे काय 'न्युड' आहे?

माझ्यावद्दलची जी कुजवुज चाले ती मला असह्य होऊं लागली तशी मी काकांना म्हणालें,

"मला एखादी नवी नोकरी नाहीं मिळायची कां हो?..."

माझ्या वोलण्यांतला अभिप्राय त्यांच्या लक्षांत आला होता कीं, काय कुणाला ठाऊक? पण ते मला म्हणाले,

"तूं नोकरीला कंटाळली आहेस कीं, तिथली नोकरी तुला नकोशी झाली आहे?......"

"खरं सांगायचं तर मला या ठिकाणीं जायचं नाहीं. कुणी कांहीं वोलत नाहीं, पण नवऱ्यानं टाकलेली एक वाई या दृष्टीनं–"

"समजलो. समजलो. पण खरं सागूं तुला, मधु? तूं कुठेंहि गेलीस तरी आतां हें असंच चालणार! माणसाचा स्वभावच असा कीं, नाहीं नाहीं त्या गोष्टींची चर्चा आणि चौकशी करण्यांत त्याला मोठी गंमत वाटते. तुला हवीच असेल तर नवी नोकरी पाहातां येईल, पण हा कांहीं मार्ग नव्हे या कटकटीतून वाहेर पडण्याचा—"

"मग काय करूं म्हणतां? नोकरीच सोडूं आणि पुण्याला जाऊं?"

"तसं तर मुळींच करूं नकोस—"

"मग काय करूं?....."

"मी सांगीन तें करशील?......"

"तुम्ही सांगाल तशीच वागते ना मी?...."

"आजपर्यंत वागलीस——"

"तशी पुढेंहि वागेन. माझ्या कल्याणासाठीं तर तुम्ही सारं सांगतां!"

"माझं या पुढेंहि ऐकणार असलीस तर एकच कर आतां!.."

"काय करूं?....."

"तुझ्या गळ्यातलं तें मंगळसूत्र काढून पेटींत ठेवून दे!..."

काकांच्या तोंडचे ते शब्द ऐकतांच मला धक्का वसला. मी गोंधळलें. माझ्या गळ्यातलं मंगळसूत्र मी उगीचच चांचपून पाहिलं आणि म्हणाले,

"काय सांगताहां हें तुम्ही....."

"मला वाटलंच होतं तूं म्हणणार म्हणून. पण फार दिवस विचार केलाय् मी यावद्दल....."

"पण काका, मंगळसूत्र हा स्त्रीचा अलंकार...."

"होय. तूं म्हणतेस तें खरं, पण मंगळसूत्र हा अलंकार असतो तो स्त्री स्वेच्छेनं घालते तेव्हां! ती तो स्वेच्छेनं घालते तेव्हां तिला अभिमान सुद्धां वाटतो त्याचा, पण केवळ उपचार म्हणून तो घालण्याचा प्रसंग येतो तेव्हां त्याची अडचण होते. आतां तुला होते आहे ना, तशी! म्हणून म्हणतो तें काढ आणि ठेवून दे पेटींत...आणि मग जा नव्या नोकरीवर मिळाली म्हणजे..."

किती दिवस तरी काकांच्या म्हणण्यावर मी विचार करीत होते, काका म्हणतात त्यांत पुष्कळच अर्थ आहे हें मला पटलं होतं.














अनुक्रमणिका

## युद्धबंदीसह ब्लॅकआऊट झालाच पाहिजे !




आतां धक्का लागला तर 'सॉरी' म्हणायची 'सोय' राहिली नाहीं

सुदैवानं मला नवी नोकरी मिळाली ती काकांच्याच प्रयत्नानें ! गळ्यांतलं मंगळसूत्र काढतांना जुन्या संस्कारांत वाढलेल्या मनाची समजूत काढणं कठीण गेलं होतं. पण एकदांचा मनाचा निर्धार केला होता......

आणि नव्या नोकरीवर जाऊं लागले होते, ती नव्या उत्साहानं. नव्या उमेदीनं. मी आतां 'मिसेस मधुमति आठवले' राहिले नव्हते. 'मिस् मधुमति काळे' हें माझं नांव सर्वांना माहित झालं होतं.. आणि यांतूनंच नवा संघर्ष निर्माण झाला होता.......

आतां वर्ष दीड वर्ष मी मुंबईत काढलं होतं. मुंबईच्या जीवनाला मी आतां सरावलें होतें. मुंबईतली घाई, धांदल, गडबड माझ्या आतां परिचयाची झाली होती. कचेरीची वेळ संपल्यावर माणसं सहसा थांबायला तयार नसत. पण याला एकच अपवाद असलेला मी पाहात होते. प्रसन्नकुमार जोशींचा... त्यांच्या वागण्यांतली सफाई आणि त्यांच्या वाणींतला गोडवा माझ्या लक्षांत आला तसं त्यांच्याकडे माझं लक्ष पुनः पुन्हां जाऊं लागलं. कांहीं तरी कामाच्या निमित्तानं मला त्यांच्याकडे जावं लागे तेव्हां ज्या सौजन्यानं ते माझ्याशीं वागत त्याचा मोह माझ्या मनाला आवरतां येईनासा झाला.....

मला वाटे, छेः, असं होतां कामा नये. गळ्यांत मंगळसूत्र नसलं म्हणून काय झालं ? मी एक विवाहित स्त्री आहे हें इतरांना माहित नसलं तरी मला तें विसरून कसं चालेल ?.. आणि, तरीही नकळत प्रसन्नकुमारांच्याकडे माझी दृष्टि जाई. जें करूं नये असें मन ठरवी, तें करण्याकडे मनाची ओढ सारखी सरूं होई...

किती दिवस तरी हें असं चाललं होतं. मी विवाहित असूनहि अशा विचित्र रीतीनें कां वागते याबद्दलची कुजबुज एके ठिकाणीं सुरू झाली म्हणून ती नोकरी मी सोडली आणि नवी धरली, तर त्या ठिकाणीं आतां नवीच अडचण निर्माण होऊं पहात होती.

प्रसन्नकुमार ज्या आपुलकीनं मला वागवीत तिचा अर्थ माझ्या लक्षांत येऊं लागला तशी नवी भीति माझ्या मनांत निर्माण झाली. आणि ही भीतीहि अशी होती कीं, तिचा उच्चार काकांच्याजवळ सुद्धां करण्याची सोय नव्हती. हें सुख असं होतं कीं, जें घ्यावंसं वाटत होतं, पण घेतां येत नव्हतं. जें करूं नये असं मनाला वाटतं, पण जें केल्यावांचून माणसाला राहावतच नाहीं, त्याचा प्रतिकार माणसानं करायचा तरी कसा हें न समजल्यामुळं माझं मन गोंधळल्यासारखं होऊं लागलं होतं....

त्यांतच एक दिवस प्रसन्नकुमार मला म्हणाले,

"तुम्हांला कंटाळा कसा येत नाहीं या कामाचा ? गेल्या चार महिन्यांत तुम्ही कधीं एक दिवससुद्धां रजा घेतलेली पाहिली नाहीं...."

त्यांचं हें बोलणं ऐकून मी नुसती हंसले होते. मला रजेची गरजच कधीं वाटली नव्हती. माझं मन मुंबईत रमावं म्हणून दर रविवारीं किंवा सुटीच्या दिवशीं कुठें तरी गंमतीनं जायचा कार्यक्रमच काकांनीं आंखल्यासारखे ते वागत होते, त्यामुळं मुद्दाम रजा घेऊन कुठें जायचा प्रश्नच कधीं निर्माण झाला नव्हता. पण 'तुम्हांला कंटाळा कसा येत नाहीं या कामाचा !' असं प्रसन्नकुमारांनीं म्हटलं तेव्हां त्यांच्या शब्दांचा नवाच अर्थ माझ्या लक्षांत आला. माझ्या वागण्यावर त्यांचं एवढं बारीक लक्ष आहे हें माझ्या प्रथमच लक्षांत येत होतं. त्यांच्या बोलण्यावर मी स्वतःशींच हंसले होते आणि म्हणाले होते,

"नोकरी करायची तर कंटाळा येऊन चालत नाहीं कधीं !.."

'मोठं जगावेगळंच आहे तुमचं वागणं आणि बोलणं !' असं म्हटल्यासारखी त्यांची चर्या झाली, पण तो विषय बदलण्यासाठींच कीं काय ते मला म्हणाले,

"तुम्हीं चित्रपटाचं शूटिंग पाहिलंय कां कधीं ?...."

हा प्रश्न सर्वस्वी अनपेक्षित होता, पण मी सहज बोलून गेले होते,

"नाहीं. कधींच नाहीं....."

"मग उद्यां जाऊं तर आपण–शनिवार आहे तेव्हां अडीचतीनला सहज जातां येईल आपल्याला ...आयत्या वेळीं नाहीं म्हणायचं नाहीं हं ! मुद्दाम आज सांगतोय तें एवढ्यासाठींच.."

प्रसन्नकुमारांच्याबरोबर दुसऱ्या दिवशीं 'प्रतिभा पिक्चर्स'च्या शूटिंगला गेली ती काकांना न सांगतां. मला वाटलं होतं, तास दोन तास शूटिंग पाहातां येईल आणि जाऊं आपण घरीं. पण तसं झालं नव्हतं. मी घरीं परतले तेव्हां सात वाजून गेले होते आणि घरांत पाऊल टाकतांच काकानीं विचारलं होतं,

"हें काय ? आज उशीरसा झाला ?...."

"मी एका मैत्रिणीबरोबर सिनेमाला गेले होते. सोडीनाचती !"

मी उत्तर दिलं होतं तें मान वर न करतांच. आपण उघड उघड खोटं बोलत आहों हें मला समजत होतं, पण तसं करण्या-






वांचून गत्यंतर नव्हतं. खरं बोलायची सोयच उरली नव्हती.

"बरं झालं. तुला आता तरी चित्रपट आवडायला लागतील!" असं काका म्हणाले तेव्हां मी हंसलें होते. 'चित्रपटाला जाऊं या' असं काकांनीं म्हणावं आणि मीच 'नको' म्हणावं असं अनेकदां घडलं होतं.

पण त्या दिवसापासून हळुंहळुं सारंच बदललं होतं. चित्र-पटाचं शूटिंग हें केवळ निमित्त झालं होतं. प्रसन्नकुमारचं वागणं थोडं थोडं धिटाईचं होऊं लागलं होतं. या धिटाईची मला प्रथम भीति वाटत होती, पण मग तिची गोडी मनाला जाणवूं लागली तशी एक नवीच भीति मनांत मूळ धरूं लागली. त्यांना उत्तेजन देण्यांत आपण फार मोठी चूक करीत आहो असं मला वाटूं लागलं. त्यांची फसवणूक आपण करीत आहो असा विचार माझ्या मनांत येऊं लागला. आपण विवाहित स्त्री आहोत हें संधि साधून त्यांना एकदां सांगायला हवंच हा विचार माझ्या मनांत सारखा घोळूं लागला. तसा त्यांचा सहवासच टाळावा असं मला वाटूं लागलं. तसं एक दोनदां मी करून पाहिलंहि. त्यांची हिरमुसलेली चर्या पाहिली कीं, मला वाटूं लागलं 'मोठी लहरी मुलगी आहे ही' असंच त्यांना वाटणार. कां कुणास ठाऊक, पण आपल्याबद्दल त्यांचं असं मन व्हावं असं मला वाटेना आणि म्हणूनच कधीं लंचला जातांना किंवा ऑफिस सुटतांना 'येणार ना' असं ते म्हणाले कीं, माझीं पावलं चालूं लागत. कधीं तरी संधि साधून प्रसन्नकुमारांना सारं सांगायचंच आहे, आजच त्यांना कशाली दुखवा अशा विचारानं मी त्यांच्याबरोबर जाऊं लागले होते. एकदां खरा प्रकार सांगितला कीं, हा सहवास संप-णार होता, हें मला समजतं पण 'लंच'ची किंवा ऑफिस सुटायची वेळ झाली कीं ते येणार? 'येणार ना'? असं विचारणार हेंही मला आतांशा माहीत झालेलं होतं.

पण एके दिवशीं मी ठरविलं कीं, आपणच त्यांना विचारावं, 'येणार ना?' घरातनं निघतांनाच हा बेत मी मनाशीं केला होता. पण मी कचेरींत आलें आणि प्रसन्नकुमारांना पाहतांच अधिकच गोंधळलें. त्यांना टाळण्यापेक्षां त्यांना सारं सारं खरं तें सांगून टाकावं म्हणजे त्यांच्या गैरसमजहि होणार नाहीं आणि सहवासहि वाढणार नाहीं असा हिशोब मी मनाशीं केला होता.

मी वरवर माझ्या ऑफिसच्या कामांत गुंतले होते पण माझं सारं लक्ष होतं घड्याळाकडे. एक वाजायला दोनचार मिनिटं उरलीं कीं, मी उठून प्रसन्नकुमारांच्याकडे जाणार होते आणि धीटपणानं त्यांना विचारणार होते, 'येणार ना?'...जें कधींतरी करायचं आहे तें आतां आजच करायचं हा निश्चय आतां मनांत कायम झाला होता. जें सांगायचं आहे तें सांगून झालं कीं, प्रसन्न-कुमार निराश होणार होते, हताश होणार होते. पण त्यांची फसवणूक करीत, खोट्या भ्रमांत त्यांना ठेवावं हा निर्दयपणा आहे अशी माझ्या मनाची खात्री झाली होती.

एक वाजायला झाल्याबरोबर मी उठलें आणि प्रसन्नकुमा-रांच्या टेबलाकडे वळले. तों माझ्या लक्षांत आलं कीं, ते तिथं नाहींत...! 'कुठे गेले असावे हे?' हा विचार माझ्या मनांत










आला, पण कांहीं न बोलतां मी पर्स हातांत घेतली आणि बाहेर पडलें. आतां नाहीं जमलं तर संध्याकाळीं जाऊं असा विचार माझ्या मनाने निश्चित केला.

पण कां कुणास ठाऊक, आज त्यांच्याबरोबर जायची भीति माझ्या मनाला वाटत होती. आज भेटले, बोललें कीं, सारा सहवास संपणार होता हें उघड होतें. तेंहि कदाचित् म्हणणार होते, 'आपण वेळींच सावध झालों हें बरेंच झालं. ही सावधानता तुम्ही बाळग-लीत, मी नव्हे. पुरुषापेक्षां स्त्रीच सावध, हुषार, व्यवहारी असते ती अशी!' पण ते असंच म्हणतील अशी खात्री वाटेना. एकदां वाटे ते म्हणतील 'मला वाटलंच होतं असं कांहीं तरी असेल म्हणून?' सरळ मार्गानं जाईल ती स्त्रीच कसली? ते काय म्हणतील याचा अंदाज माझ्या मनाला घेतां येत नव्हता. तरी पण हें संपवायचं होतं. आणि म्हणूनच ऑफिस सुटायच्या वेळीं मीच त्यांना म्हण-णार होते, 'येणार ना?'

पण आश्चर्य असं कीं, ही संधि त्यांनीं मला दिलाच नाहीं. मी माझ्या कामांत गुंतलें होतें तोंच ऑफिसचा शिपाई मला सांगत आला,

"जोशीसाहेब बोलावताहेत तुम्हांला!"

सखाराम शिपाई असा बिरोप नेहमींच आणायचा. तसा तो आजहि घेऊन आला आहे असं वाटून मी उठले आणि त्यांच्या टेबलाजवळ गेले तों ते म्हणाले,

"बसा..."

मी बसलें.

"मी अजून कुणाला सांगितलं नाहीं—" प्रसन्नकुमार मला म्हणाले होते, "पण प्रथम तुम्हांला सांगणार आहे. उद्यापासनं मी इथं नाहीं, कलकत्त्याला बदली झालीय माझी. पण जाण्यापूर्वी तुमची भेट हवीय निवांतपणें. तुमची क्षमा मागण्यासाठीं! येणार संध्याकाळीं? येणार ना? यायलाच हवं माझ्यासाठीं."

प्रसन्नकुमार काय बोलत होते मला समजत नव्हतं. "तुमची भेट हवीय निवांतपणें. तुमची क्षमा मागण्यासाठीं—" असं ते कां म्हणत होते. मला कळत नव्हतं. त्यांना सारं एकदां खरं काय आहे तें सांगून टाकावं म्हणून मी संध्याकाळीं भेटायचं असं मनाशीं ठरवून मी येतें काय आणि "संध्याकाळीं तुमची भेट हवीय" असं प्रसन्नकुमार म्हणतात काय कांहींच कळेना. मनांतला गोंधळ शक्य तेवढा लपवीत म्हणाले,

"येतें. पण माझी क्षमा तुम्ही कशासाठीं मागणार आहांत?"

"सारं सांगतो संध्याकाळीं!"

प्रसन्नकुमार संध्याकाळीं काय सांगणार आहेत याची कांहींच कल्पना मला नव्हती. पण मी अस्वस्थ झाले होते. अगदीं प्रसन्न-कुमार भेटेपर्यंत...

पण भेटल्यावर मात्र त्यांनीं फार वेळ मला संशयांत ठेवलं नाहीं. ते म्हणाले.

"माझी कलकत्त्याला बदली झाल्यामुळं एका फार मोठ्या संकटांतनं मी वांचलों आहे!...."

"संकटांतनं?"...

"होय. तुम्हांला फसवीत राहण्याच्या. तुम्हांला माहित नाहीं पण तुमच्या विश्वासाचा मी गैरफायदा घेत आहे अशी टोंचणी आज फार दिवस माझ्या मनाला लागली होती. मी मनांत म्हणत होतो कीं, माझं लग्न झालेलं नाहीं असं यांना वाटत असणार—"

"म्हणजे?"...

"मिस् काळे, माझं लग्न झालं त्याला आतां दोन वर्षं तरी झालीं. चार महिनेसुद्धां आमचा संसार टिकला नाहीं. दोष कुणाकडे होता मला माहित नाहीं, पण आम्हीं सोडलं खर एकमेकांना—हें सारं तुम्हांला सांगायचा धीर होत नव्हता. पण शल्य मात्र मनाला बोंचत होतं. बदलीची बातमी कानावर आली तसं मला वाटलं कीं, एका संकटांतनं वांचलों..."

मी जें ऐकत होते तें सारं नवलाचं होतं. म्हणजे अखेर आम्ही एकमेकांना फसवीत होतो आणि ही फसवणूक संपवावी कशी ही एकच विवंचना दोघांच्याहि मनांत होती हें लक्षांत येतांच मी हंसले आणि म्हणाले,

"फसवणूक तुम्हींच करीत नव्हतां. मीहि करीत होते!..."

"तुम्हीं?..."

"होय, होय!. मीहि!"

आणि म्हणून सांगतां येतील तेवढ्या स्पष्टपणानं मी सगळ्या गोष्टी सांगितल्या होत्या. आणि म्हणाले होते,

"मी आज हें सारं तुम्हांला सांगायचं असं ठरवून आले होतें, पण तुम्हींच मला धक्का दिलात—"

"खोटं सांगून जोडण्यापेक्षां खरं सांगून तोडणं चांगलं असं मला वाटतं—"

"पण तें तुटायचं नव्हतं अशीच विधिघटना होती असं दिसतंय्. दोन समदुःखी माणिसं जवळ येतात. तेव्हां त्यांना एक नवा मार्ग दिसायला लागतो असं माझे काका म्हणतात तसंच होईल आतां—"

"म्हणजे तुम्हांला नवा मार्ग दिसतोय् यातनं?"

"होय! कलकत्त्याचा! दोघांनाहि तिथं जाण्याचा!..." असं म्हणत मी खुदकन् हंसले तसा तो अधिकच निकट आला होता आणि म्हणाला होता, "सुख कशांत असतं मला माहित नाहीं, पण तें एकमेकांनीं एकमेकांना समजून घेण्यांत असावं, अक्षय सुखाची ही एकच वाट मला दिसते. तूं म्हणतेस तर त्या वाटेनं जाऊं या..."

त्याच्या मुखातनं बाहेर पडलेले ते शब्द आणि तो उल्लेख ऐकतांच माझं सर्वांग मोहरलं आणि मी त्याच्याकडे मान वर करून पाहिलं तेव्हां तोहि संतुष्ट मनानं हंसत असलेला मला दिसला आणि मग कुणीच कांहीं बोललं नाहीं! बोलण्या-सारखं जणुं कांहीं उरलंच नव्हतं...! • • •





अनुक्रमणिका




# Our Well-known English Publications

**Introduction to Chemistry** 5.00
*(Bombay and Poona Universities)*
*Prof. Dole, Ghate, Jawadekar, Nadkarni*

**General Chemistry** 10.00
*(Poona University)*
*Prof. Ghate, Nadkarni, Jawadekar*

**Elements of Chemistry** 10.00
*(Shivaji University)*
*Prof. Shingte, Jawadekar, Kulkarni*

**Elementary Practical Chemistry—Part One** 2.50
*(Poona University)*
*Prof. Dole, Ghate, Jawadekar, Nadkarni*

**Intermediate Practical Chemistry** 5.00
*(Bombay University)*
*Prof. Kulkarni, Pandit, Nadkarni, Ghate*

**Animal Life** 4.00
*Prof. Kshirsagar, Devdhar, Purohit, Shreenivasan*

**Plant Life** 4.00
*Prof. Kshirsagar, Patil, Shinde*

**Practical Biology** 3.50
*Prof. Kshirsagar, Raje*

**Foundations of Physics** 12.00
*(Poona and Bombay Universities)*
*Prof. Patil, Joshi, Rajopadhye, Purohit*

**Foundations of Physics** 15.00
*(Marathwada and Karnatak Universities)*
*Prof. Joshi, Patil, Purohit, Rajopadhye*

**Practical Physics**
*(Bombay, Poona, Shivaji Universities)*
*Prof. Purohit, Joshi, Joshi, Lagu*

**Introductory Practical Chemistry** 3.25
*(First Year Diploma in Engineering)*
*Prof. M. D. Nadkarni, P. S. Jawadekar, R. D. Shingte, B. W. Kelkar*

**Engineering Chemistry** 12.00
*Prof. Shingte, Ghate, Jawadekar, Kelkar*

**Organic Chemistry** 20.00
*(All Universities)*
*Dr. Shingte, Kulkarni, Ghate, Nadkarni*

**A Text Book of Botany** 4.00
*Prof. Chikkannaiah*

**Animal Life** 4.50
*Prof. Kshirsagar, Mathad*

**Plant Life** 4.50
*Prof. Kshirsagar, Tilak*

**Animal Life** 7.00
*Prof. Kshirsagar, Naravane*

**Plant Life** 4.50
*Prof. Kshirsagar, Belekar*

**Outline of Organic Chemistry** 8.00
*(Poona and Bombay Universities)*
*Prof. Ghate, Nadkarni, Jawadekar, Kelkar*

**Elements of Organic Chemistry** 8.00
*(Shivaji University)*
*Shingte, Kulkarni, Ghate, Nadkarni and Javadekar*

**College Chemistry** 6.50
*(Poona and Bombay Universities)*
*Prof. Ghate, Nadkarni, Jawadekar, Kelkar*

**Elementary Practical Chemistry—Part Second** 2.50
*(Poona University)*
*Prof. Dole, Ghate, Jawadekar, Nadkarni*

**Experimental Organic Chemistry** 4.25
*(Poona and Bombay Universities)*
*Prof. Ghate, Kulkarni, Nadkarni*

**Experimental Physical Chemistry** 4.25
*(Bombay and Poona Universities)*
*Prof. Ghate, Jawadekar, Bavadekar, Kelkar*

**Fundamentals of Physics** 20.00
*(Poona University, Shivaji University and Bombay University)*
*Prof. Joshi, Patil, Purohit, Rajopadhye*

**Principles of Physics** 20.00
*(Bombay University)*
*Prof. Purohit*

**A Class Book of Botany** 12.00
*Prof. Parandekar, Tare, Patil*

**A Class Book of Zoology** 12.00
*Prof. Kshirsagar, Purohit, Varute*

**A Text Book of Zoology** 10.00
*Prof. Kshirsagar*
*(Bombay, Karnatak and other Universities)*

**Elementary Design of Steel Structures** 6.50
*(5th Edition) (All Universities)*
*By G. P. Nagarkar*

**Illustrative Examples in R. C. C. Design** 8.25
*(Eighth edition)*
*By G. V. Vartak*

**Applied Mechanics**
*Degree Course and Polytechnic*
*(All Universities)*
*By G. P. Nagarkar*

**Applied Mechanics**
*Polytechnic*
*(All Universities)*
*By Dadhe, Vakawalkar, Jamdar*









अनुक्रमणिका

( पृष्ठ ९२ वरून–सुझी )

"किती पेग घेतले कीं चढेल?"

"चार–पांच."

"मग आपली तयारी आहे. पण एका अटीवर. सुझीनं बीअर-ऐवजी मॅनहॅटन घेतली पाहिजे."

तावडतोब तो स्वतः जाऊन 'बार-टेंडर-की' करणाऱ्या केंडल-कडून मॅनहॅटचे दोन ग्लास आणतो. सुझी आपला ग्लास उंचावते. रे त्याचा "टू हूज हेल्थ?"मी विचारतो. " टु द हेल्थ ऑफ अवर लिट्ल डेव्हिलस् ग्रँड आयडिया–" सुझी मला कोपरानें ढुशी देते. मॅनहॅटनचे घुटके घेत घेत अर्मी, हेलन, पॅट, मेरि-ॲन वगैरेंशीं गप्पांचीं फुलपांखरें सोडलीं जातात. डेव्हचा बराचसा वेळ किचनमध्यें पाहुण्यांची ड्रिंक्स करण्यांत जातो. सुझी एकेकाचे फोटो घेत राहते.

मग कॅरोलीन–केंडलची बायको–एका टेबलावर सगळे पदार्थ मांडून ठेवते. आमच्या हातीं डिशेस देऊन जाते. एकेक पदार्थाचा समाचार घेतला जातो. सुझी मला म्हणते,

"ए–हें सँडविच छान आहे. चाखलंस का?"

मी सुझीला सांगतो, "माझ्या तीन मॅनहॅटन तर झाल्या. चौथी आणतेस का?"

ती माझ्या ग्लासांत मॅनहॅटन आणून देते.–एकदम दोन पेग.

डोकं गरगरायला लागलेलं असतं. पण त्यामुळं गप्पा आणि पार्टीहि रंगत जातात.

रेला जिन फार चढते म्हणून त्याला घरीं नेतात. रे जाता जाता म्हणतो, "डेव्ह, शंकरची पांचवी मॅनहटन चालू आहे. त्याच्यावर लक्ष ठेव."

सुझी म्हणते, "अजून शंकरला कांहीं चढलेली दिसत नाहीं."

रे मागोमाग इतरहि अनेक जण जातात. बाराच्या सुमारास अवघे सात-आठ जण उरतात मग आमची खरी पार्टी सुरू होते.

"ए आतां आपण जरा म्युझिक लावूं या की." अर्मी सुचवते.

केंडल घराच्या दारं–खिडक्या नीट लावतो. शेजारपाजारी डिस्टर्ब होऊं नये म्हणून.

"शंकर, कुठलं ड्रिंक आणूं?" कॅरोलिना विचारते.

मॅनहॅटन तर केव्हांच संपलेली असते. त्यानंतर मी दोनदां स्कॉच संपवलेली असते.

मी डेव्हला सांगतो, "डेव्ह, हें बघ पांच मॅनहॅटन झाल्या, दोन स्कॉच. काय घेऊं तें सांग."

तो आणखी स्कॉच आणायला कॅरोलिनाला – केंडल तिला लुव म्हणतो–सांगतो.

केंडलला तोपर्यंत थोडी चढलेली असते. तो म्हणतो, "ए, आपण जरा डान्स करूं या." तो ग्लास घेऊन आलेल्या लुवला जवळ ओढतो.

डेव्ह असतो. तो घेऊन कोचावर ताणून देतो. इकडे आर्मीहि जॉनबरोबर नाचूं लागलेली असते.

सुझीला मी म्हणतो, "तुझ्या कॅमेऱ्यांत फोटो अजून शिल्लक आहेत ना? आपण डेव्हचा फोटो घेऊं." तेवढ्यांत केंडल म्हणतो, "अरे, त्याच्या हातांत आपण हें फूल देऊं या." तो फुलदाणींतलें फूल काढतो. व डेव्हच्या हातांत बसवतो. "सुझी–चटकन् घे." सुझी क्लिक दाबते. अगदीं जहांगीर बादशहासारखा दिसणार डेव्ह–

सुझी माझा हात धरून म्हणते, "शंकर, चल डान्सला ये." तिच्या सूचनेचें मला नवल वाटतें. बाईनें नृत्यासाठीं आपण होऊन पुरुषाला विचारायचें नसतें, पुरुषानेंच तें विचारायला हवें.

मी म्हटलं, "मला फारसं जमत नाहीं नृत्य अजून."

"चल रे–" तिनें उजवा हात माझ्या कमरेभोंवतीं वेटाळला. रेकॉर्डच्या ठेक्यावर पावलें पडूं लागलीं. तूं पावलं बरोबर टाकतो-यस कीं–" ती अधिकच बिलगत आपलें तोंड माझ्या खांद्या-वर टेकते. मानेवर ओठांच्या ठसा उमटवीत. ईपत्कालच. अंगअंग मोहरून येते.

"अगदींच खुळी आहे रे मी–शंकर" तिचे पुसट शब्द माझ्या-कानांत शिरतात. तें सारें जणुं एक स्वप्न असतें. समाधि असते.

तेवढ्यांत रेकॉर्ड थांबते. पावलंहि थांबतात. एकमेकांवर पड-तात. आम्ही अलग होतों.

मी मग अर्मीला म्हणतो, "आतां तुझी पाळी," जॉन लुव-बरोबर पावले टाकतो. डेव्ह अजून कोचावरच पडलेला असतो.

सुझी त्याच्याजवळ जाऊन बसते. त्याच्या कपाळावरून हात फिरवते.

मी तिचा कॅमेरा हाती घेतो.

"मारूं कां एक स्नॅप?"

"हो जरूर."

"मी कॅमेरा ॲडजस्ट करतो. फ्लॅशचा बल्ब लाव. ती एकदम डेव्हचें चुंबन घेते. फोटो तसाच येतो.

मग ती जॉनला म्हणते, "जॉन तूं अर्मीचें चुंबन घे. मी तसा फोटो घेते."

ती त्यांचा फोटो घेते. तसाच लुव केंडेलचाहि.

"शंकर–तूंच एकटाच राहिलास कीं." डेव्ह जागा झालेला असतो.

"तो बरा एकटा राहिल?" सुझी डोळा मिचकावते. मी तिला जवळ ओढतो. तिच्या गालांवर ओठ टेकतो. डेव्ह तेवढ्यांत स्नॅप मारतो.

"हा फोटो मी निर्मलाला पाठवणार–" अर्मी मिस्किलपणें म्हणाली. "अन् लिहिते कीं बघ, तुझा नवरा तुझ्या गैरहजेरीत काय काय करतोय्?"

"पाठव बाई, पण सुझी तो तुझ्या हातीं लागून देईल तर ना–!"

तोपर्यंत पहाटेचे साडेतीन झालेले असतात. "आतां निघूं या बुवा–" मी डेव्हला सुचवतो.






अनुक्रमणिका

"शंकर–हें कांहीं खरं नाहीं. थांब ना–" केंडल म्हणतो.

पण आतां थांबण्याचा मुड कुणालाच नसतो.

आम्ही केंडलचं घर वरचस आवरून टाकतो.

डेव्हचं मला राइड देणार असतो. माझं घर आल्यावर उतरतो. डेव्ह व सुझी पुढें जातात.

☆ ☆ ☆

सुझी–डेव्हची व माझी गांठ अनेक वेळां पडते. एकदां डेव्ह तिला काव्याची भारी भारी पुस्तकें घेऊन देतो. "माझी आठवण." सुझी ती मला मोठ्या अगत्यानें दाखवते.

केंब्रिज सोडून डेव्हच्या गार्डीनेंच न्यूयॉर्कला जाण्याचें माझें ठरते. तिला ट्रेलर जोडून कॉरी आपले बिऱ्हाड हलवणार असतो. सुझीहि आलेली असते भली सकाळ असूनहि.

सामान भरून होते. गाडीजवळ डेव्ह व सुझी असतात. मीहि असतो. सुझीचे डोळे सुजलेले असतात. विमनस्क डेव्ह मला म्हणतो, "शंकर, जॉयचं आणखी कांहीं सामान आणायचं असलं तर बघतोस का? प्लीज्." माझ्या ध्यानांत येतं. मी पटकन् माझ्या अॅपार्टमेंटमध्यें जातो.

कांहीं वेळानें डेव्हची हांक मला ऐकू येते. मी खाली येतो. जॉन–अर्मीहि असतात. सुझी हमसा हमशीं हुंदके देत असते. माझा जीव गलबलतो.

ती माझ्याकडे बघते. माझा हात दाबते. "बरंय् शंकर,–" फार तिला बोलवत नाहीं.

–आणि मग डेव्ह गाडी स्टार्ट करतो. ती त्याचं आवेगानं चुंबन घेते.

गाडी चालवतांना डेव्ह अगदीं मूक असतो. त्याला इतका गंभीर झालेला मी कधीं पाहिलेलें नसतं.

गाडी मॅस–टर्नपाइकच्या हायवेला लागल्यावर एका मोटेल-जवळ, डेव्ह थांबवतो. ट्रेलर वगैरे व्यवस्थित जोडला गेलाय् कीं नाहीं तें पाहतो. आणि मग समोरच्याच फोन बूथमध्यें जातो. बराच वेळ तो बूथमधून बाहेर येत नाहीं. बोलत असतो.

अर्मी– जॉन व मी–आम्ही गाडीजवळ उभे असतो. मी म्हणतो, "आज डेव्ह फारच टेन्स दिसतोय्. इतकी स्लो गाडी त्यानं कधीं चालवलेली नव्हती.",

"सुझीनं त्याला खरंच मोठी माया लावली होती–" अर्मी कुठंतरी बघत पुटपुटते.

☆ ☆ ☆

परदेशी माणसाच्या प्रेमांत जीवेंभावें पडणाऱ्या त्या अमेरिकन पोरीचें मन मला कळत नाहीं. तिच्या कृतीचा अर्थ मला उलगडत नाहीं. तो उलगडावा असें वाटतहि नाहीं. त्यांतली उत्कटता मात्र विसरतां येत नाहीं. तिनें त्याला खेळवलें असतें तर मी समजू शकलों असतों. पण—हें आपल्या ताकदीबाहेरचें आहे. विसरायला अवघड आहे.

—शंकर रा. सारडा

# पण हें श्राद्ध तुझेंच आहे



[ विंदा करंदीकरांची क्षमा मागून उरकलेले ]

उधारीच्या संवयीवरती कर्जाची रास रचून
तूं खातीच्या खातीं विसरलास

ह्याची माडी चढूं नका; हा माणूस शेवटपर्यंत खाली होता, पडणाऱ्या उमेदवाराच्या 'डिपाझिट'सारखा. ह्याच्या हाताच्या मुठी खोला;

घेऊं नका त्याच्या हातांतील सर्व पैसे खास त्याच्याच मित्राचे आहेत.

त्याचे उघडे तोंड घट्ट आवळून टाका, बाटलीच्या बूचासारखें, मेला असला तरी मारवाडी आहे....पटकन् पैसे खाईल ! आणि असे ( दिलेल्या ) उसन्या पंनाशासाठीं खिसा फाटेपर्यंत ओढूही नका,

तो अगोदरच फाटलेला आहे ......

पहा दारांवर 'खटखटले' आहे आणि आजची ताजी बाटली दारु पिऊन झिंगली आहे.

उधारीच्या संवयीवरती कर्जाची रास रचून तूं खातीच्या खातीं विसरलास.

ती खाती तुला विसरणार नाहींत. भिकेची निदान वहिणीला भोंड आहे.

ह्या शेवटच्या कवितेचा आधार घेऊन एक टिकोजीराव अजून हात चोळीत राहील

तुझ्या स्वभावाजवळ मी अजून उभा आहे, उधार आणि अधिक उधार

यांच्यामधील बुडत्या खात्यांत उजवा हात पसरून मी अजून उभा आहे...... पण हें श्राद्ध तुझेंच आहे.

'काका कुवा'ला प्रमोशन मिळतें.
'चिमणी'च्या पोटांत भुकेनें
कावळे कोकावतात.
पोपटाला 'मिरची' बाधते
आणि 'कोंबडी'चें पोट 'जड'
होतें.



# चार जादूच्या गोष्टी आणि एक तात्पर्य

—जयवन्त दळवी

जादूगार देवराव कदाचित् आपल्या माहितीचे नसतील ! वहुधा नसतीलच ! कारण अंगावर काळें जाकिट चढवून आणि त्या जाकिटावर खोटे-नाटे बिल्ले लावून त्यानीं कधीं जाहीरपणें जादूचे प्रयोग केलेले नाहींत. जादूचा त्यानीं कधीं व्यवसाय असा केलाच नाहीं. तो त्यांचा छंद होता. एक गंमती करायचें साधन म्हणून ते जादूकडे पाहात. त्यांच्या घरीं येणाऱ्या शेजारच्या व्रात्य पोरांचेसुद्धां कुत्रा, मांजर करून ते त्यांचीं भांडणें गंमतीनें पाहात बसत.

त्यांची पत्नी बऱ्याच वर्षांपूर्वी निवर्तली. त्यामुळें तर ते या जादूच्या गंमतींत अधिकच लक्ष घालूं लागलें. त्यांची मुलगी लहान होती तेव्हां ती खेळण्यासाठीं हट्ट धरायची. पण खेळणीं विकत घेण्याच्या फंदांत ते कधीं पडलें नाहींत. मुलीनें पोपट हवा म्हटला कीं, शेजारीं सांपडेल ती वस्तु घेऊन ते कांडी फिरवीत आणि पोपट करून देत. असे जादूचे पोपट, चिमणी, कुत्रे त्यांच्या घरीं सदैव असत.

पुढें त्या मुलीचें लग्न झालें आणि ती नागपूरला गेली. कालान्तरानें तिच्या नवऱ्याला म्हणजे देवरावांच्या जांवयाला थोडासा बाहेरख्यालीपणाचा छंद लागला. जांवई चार घटका घरीं बसेनासा झाला. उठल्या सुटल्या बाहेर भटकायचा. बिचारी देवरावांची मुलगी दुःखी कष्टी झाली. ती मुंबईस आली आणि तिनें सारी हकिगत देवरावांच्या कानीं घातली. तिचें सांत्वन करण्यासाठीं त्यानीं तिच्या पाठीवर प्रेमानें हात फिरवला आणि ते म्हणाले, "मुली, अशी कष्टी होऊं नकोस. हे सारे संवयीचे परिणाम असतात. घरीं बसण्याची त्याला तूं संवय केली नाहींस. म्हणून त्याला बाहेर भटकण्याची संवय लागली. पण चिंता करूं नकोस. आपण इलाज करूं !"

ते मुलीला घेऊन तात्काळ नागपूरला गेले. जांवयाच्या कचेरींत जाऊन त्यांनीं अधिकाऱ्यांची भेट घेतली. त्यांना सारी हकिगत सांगितली. आणि सहा महिन्याची भरपगारी रजा मंजूर करून घेतली. (सुदैवानें ती नगरपालिकेची कचेरी असल्यामुळें हवी तेवढी रजा मिळायला अडचण पडली नाहीं !)

मग एकदां सकाळीं जांवई डाळिंब खात बसला असतांना त्यांनीं पाठीमागून गुपचूप कांडी फिरवली. जांवयाचा तात्काळ काकाकुवा झाला. देवरावांनीं त्या पक्ष्याला मानगुटीला धरून उचललें आणि पितळेच्या एका रिंगवर बसवून ठेवलें, 'कॉं कॉं कुव्वॉं कॉं कॉं कुव्वॉं' असे उद्‌गार काढीत जांवई तब्बल सहा महिने त्या रिंगवर बसून राहिला.

रजा संपण्याच्या आधल्या दिवशीं देवरावांनीं मुलीला विचारलें, "कॉं कॉं कुव्वॉंची रजा वाढवायची काय ?"

मुलगी म्हणाली, "नको—नको ! खूप झालं !"

"कां ? डाळिंबांचा खर्च खूप आला ना ?"

"तसं नव्हे ! पण . . . . ."

"कळलं !"

देवरावांनीं कांडी उचलली. काकाकुव्वाला कोचावर आणून बसवलें आणि त्याच्या डोक्यावरून कांडी फिरवली.

डाळिंब खात जांवई कोचावर बसलेला !

देवरावांची मुलगी मात्र खूप घाबरली होती. एक तर तिला वाटत होतें, हा कायमचाच काकाकुवा राहिला तर काय करायचें ! आणि दुसरी गोष्ट, पुनः माणसांत आल्यावर आपल्याला काकाकुवा केला म्हणून तो भडकला तर तोंड कसें



अनुक्रमणिका

द्यायचें ? पण ते दान्हीं संशय खोट ठरले. एक तर कांडी फिरवतांच तो जांवई झोला. आणि दुसरें म्हणजे आपण सहा महिने काकाकुवा होतो हें त्याला कळलेंच नाहीं.

पुनः माणूस होतांच तो फक्त एवढेंच म्हणाला, "देवराव, काय जादूविद्र केली होती काय ?"'

"कां बुवां?" देवरावांनीं वेड पांघरलें.

"किती वेळ झाला, हें डाळिंब संपतच नाहीं." तो डाळिंब खातच होता.

पण या संवयीचा परिणाम असा झाला कीं, जांवई घराबाहेरच पडेनासा झाला. रोज सकाळीं जेवण झाल्यावर त्याला अक्षरशः ढकलून बाहेर काढावें लागलें. तो कसावसा कचेरींत जाई आणि सहा-सात तास काकाकुवासारखा वसून राही. (अर्थात त्याचा फायदा असा झाला कीं, त्याला लगेच प्रोमोशनच मिळून गेलें!) एकूण आपली मुलगी पुनः सुखी झालेली पाहून देवरावांना आनंद वाटला. आणि मग ते मुंबईस आले.

मुंबईस आल्यावर त्यांना एक कल्पना सुचली.

त्यांच्या परिचयांतलीं अनेक माणसें या ना त्या कारणानें असंतुष्ट असतात असें त्यांना दिसून आलें. त्यामुळें त्यांना वाटलें, या माणसांना कांहीं काळ त्यांच्या असंतोषांतून बाहेर काढावें. तसें केलें तर हीं माणसें सुखी होतील.

म्हणून त्यांनीं कांहीं परीचित लोकांना आपली कल्पना सांगितली. ती आवडली सर्वांना. पण आपल्यावर जादू करून घ्यायला कुणी तयार होईना. प्रत्येकाला भीति वाटूं लागली. प्रत्येकाला वाटलें, जादूच्या साहाय्यानें आपण मांजर झालों आणि कायम मांजरच राहिलों तर काय घ्या ?

त्यावर देवराव म्हणाले, "तुमचा विश्वास कां नाहीं माझ्यावर ? तुम्ही परत या आणि माणूस होण्याची इच्छा व्यक्त करा. तुम्हाला पुनः माणूस करीन."

पण कुणालाच तें खरें वाटेना.

देवरावांनीं विचार केला. समोर बसलेल्या मंडळींत सोळा सतरा वर्षांची एक अवखळ पोरगी होती. तिचें नांव चिमा.

देवराव तिला म्हणाले, "चिमे, तुला कोण व्हावेंसें वाटतें ?"

चिमा म्हणाली, "चिमणी !"

"कां ?"

"जमिनीवरच्या गर्दीचा मला वीट आला आहे."

देवराव हंसले. मनांत म्हणाले, ही पोरगी उपजतच तुडतुडी आहे. तिला चिमणी व्हावेंसें वाटतें हें योग्यच आहे. त्यानीं मेजावरली कांडी उचलली आणि तिच्या मस्तकावर फिरवली. ती पोरगी



रजा संपली तरीही घरांतून हलत नाहींत.

तात्काळ चिमणी झाली. चिमणी होतांच ती त्या खोलींत गरगर फिरली. आणि खिडकीवाटें बाहेर उडून गेली. तिला पाहाण्यासाठीं सारी मंडळी बाहेर धांवली. पण चिमणीला धीरच नव्हता. ती गरगर गिरक्या घेत उडून गेली. डोळ्यांवर हात धरून सर्वांनीं आकाशांत पाहिलें. एक ठिपका गरगर उडत दृष्टिआड झाला. मग ती मंडळी आंत येऊन वसली. आतां ती चिमणी कुठें असेल, कुठल्या फांदीवर वसली असेल वगैरे तर्कवितर्क चालू झाले. तासाभरांतच चिमणी पुनः देवरावांच्या खिडकींत दिसली.

"देवराव, पुरे झालं !" ती चिव चिव करीत म्हणाली.

"का ग ?"

"भूक लागलीय उडून उडून–"

"मग? खावं चिमणीसारखं!"

"शी: शी:! सगळीकडे किडेच कीं हो खायला, आणि मी आहे स्ट्रिक्टली व्हेजिटेरियन. मला नाहीं चालायचं तें. चिव-चिव–चिव चिव !"

"ये तर मग आंत–"

असें म्हणून देवरावांनीं तिच्यावरून कांडी फिरवली. चिमा पंख हालवल्यासारखे हात हालवीत उभी होती.

"कित्ती गंमत वाई sss !" असें म्हणत ती हांसत सुटली.

तें पाहून सर्वांनाच गंमत वाटली.

"आम्ही सुद्धां एकदां बघूं प्रयत्न करून–" असें म्हणत त्या दिवशीं सर्व मंडळी आपापल्या घरीं गेली.

* * *

एकदा देवरावांच्या घराचें दार वाजलें.

"कोण आहे ?"

"मी विठ्ठलराव !"

"या विठ्ठलराव ! काय विचार आहे?"

विठ्ठलराव तर अक्षरशः रडकुंडीला आले होते. तुळतुळीत डोक्यावर हात फिरवीत ते म्हणाले, "आतां विटलो या म्हातारपणच्या आयुष्याला ! देवराव कांहीं तरी एकदां वरं वाईट करून टाका !"

"पण झालं काय विठ्ठलराव ?"

"काय सांगणार कपाळ ? पोरं मोठीं झालीं आहेत. त्यांना बापाची किंमत नाहीं. घरीं शान्तपणें वसतां येत नाहीं. दोन घटका विठ्ठलनाम घेतां येत नाहीं. त्यांतच एका नातवानें एक पोपट आणलाय. तो लेकाचा पिंजरा घाण करतो. तो धुवायचं काम टाकलंय माझ्या बोडक्यावर. आज सकाळीं पिंजरा धुतां धुतां पोपट गेला उडून. आतां सर्वजण माझ्या नांवानं आग पाखडताहेत. नको हें म्हातारपण, नको हा जन्म ! कांहीं तरी करा आता !"

देवरावांनीं क्षणभर विचार केला, आणि म्हणाले, "ठीक आहे, विठ्ठलराव ! तुम्हाला पुनः पोपटच करतो. उडत जा आणि पिंजऱ्यांत जाऊन वसा. म्हणजे विठ्ठल विठ्ठल म्हणत शान्तपणें वसतां येईल, आणि पोरांनाच पिंजरा धुवावा लागेल. तुम्ही तो खूप घाण करा."





अनुक्रमणिका

"तें जमेल !" विठ्ठलराव आनंदानें म्हणाले, "नाहीं तरी मला क्रॉनिक डिसेंट्री आहेच."

"वा : फारच उत्तम !" असें म्हणून देवरावांनीं कांडी फिरवली.

क्षणांत लालबुंद चोंचीचा, लाल कंठाचा, हिरवागार पोपट तयार.

कीर्र कीर्र कीर्र असा चित्कार करीत पोपट भर्रकन उडून गेला. आणि आपल्या घरच्या पिंजऱ्यांत जाऊन बसला. पण घरीं कुणाच्या तें लक्षांतच आलें नाहीं. म्हणून पोपट मोठ्यानें ओरडला, "विठ्ठल .. विठ्ठल"

"अगबाई, आमचा राघू आला !" एकदम ओरडत सूनबाई आल्या आणि त्यांनीं पिंजऱ्याचें दार तावडतोब बंद केलें.

त्या पुन: मोठ्यानें ओरडल्या, "आपला राघू आला हो !"

"माझं नांव राघू नव्हे, विठ्ठलराव !" पोपट मनांतल्या मनांत म्हणाला आणि गळ्याकडून त्यानें टक् टक् आवाज केला.

घरांतलीं सारीं माणसें पिंजऱ्याभोंवती जमा झालीं.

"भारी हो इमानी जात !" असें सूनबाई म्हणाल्या.



"खरंच, पाहा ना कसा परत आला !" विठ्ठलरावांचा मुलगा म्हणाला.

"अहो, बाहेर कोण एवढं खायला घालतंय ?"

"पोपटाला कळलं तेवढं विठ्ठलरावांना कळलं तरी पुरे ! गेले आहेत मारे चिडून."

"शट अप् !" विठ्ठलराव पिंजऱ्यांतून ओरडणारच होते. पण आपण पोपट आहों हें त्यांच्या ऐनवेळीं ध्यानीं आलें. त्यामुळें त्यानीं फक्त टक् टक् आवाज केला.

"पोपट पोपट, विठ्ठू विठ्ठू म्हण !" नातू म्हणाला.

"मुळींच नाहीं चोंच उघडणार !" पोपट आपल्या मनाशींच म्हणाला. आणि त्यानें वांकडी मान करून एका पायानें डोकें खाजवलें. अरेच्या ! डोक्यावर केस कसे ? क्षणभर हर्ष झाला आणि मग एकदम ध्यानांत आलें, हें पोपटाचें डोकें, विठ्ठलरावाचें नव्हे !

तेवढ्यांत कुणीसे म्हणाले, "अग त्याला डाळ तरी आणून घाला."

घाला–घाला ! विठ्ठलरावांच्या पानांत मूठभर भात वाढायला जड होत होतं, आतां पोपटाला वाटीभर डाळ घाला... घाला . . . घाला ! पोपट स्वगत टक् टक् करीत होता.

पिंजऱ्यांत वाटीभर भिजवलेली डाळ ठेवतांच पोपट ताव मारूं लागला. पण दुसऱ्या क्षणांतच तो एकदम दचकला. कारण जवळची डाळ त्याला स्पष्ट दिसली. त्याला वाटलें, मूळचा चष्मा चोंचीवर चुकून राहिला आहे कीं काय ? म्हणून त्यानें पटकन पायानें चोंच चांचपली आणि सुटकेचा श्वास टाकला. सुदैवानें चोंचीवर कांहीं नव्हतें.

त्या रात्रीं भरपूर डाळ खाऊन पोपटानें पिंजरा खूप घाण केला. सकाळीं पिंजरा साफ करण्याची आपत्ति थोरल्या मुलावर आली. तें पाहून पोपटाला बरें वाटलें. पूर्वीं रोज पिंजरा साफ करतांना बिचाऱ्या विठ्ठलरावांना काय बरें वाटलें असेल ? आतां कर तूं साफ ! मी अशीच घाण करणार !. . . .पोपट मनाशींच टक् टक् करीत म्हणाला.

एक दिवस तर चांगला गेला. मस्त डाळ

ऊन 'विठ्ठल-विठ्ठल' असा जप करीत तो
डीवर बसून राहिला.

दुसऱ्या दिवशीं पुनः पिंजरा घाण.
घाण ? तुला सोडतो कीं काय ?
र मुकाट्यानें साफ ! पोपट मनांतल्या
नांत हुकूम देत होता.

पण विठ्ठलरावांचा थोरला मुलगा मात्र
क्षरशः वैतागून गेला होता. तो मोठ्यानें
ारडून म्हणाला, "सर्वांनीं आळीपाळीनें
तलात तर ठीक. रोजच्या रोज मला
मायचं नाहीं. मी दार उघडून पोपटाला
ालवून देईन !"

हो हो ! म्हणे घालवून देईन ! मी
ायला हवं ना ? मी विठ्ठलराव नव्हे...
ापट बंद चोंचीत तडतड जीभ आपटत
ाता.

"काय रोग बसलाय या पोपटावर कोण
ाणे !" मुलगा वैतागला.

जसा काहीं माहीत नाहीं ! आपल्या
ापाला क्रॉनिक डिसेंट्री होती तें तुला
ाहीत नाहीं ?– पोपटाला खूप मोठ्यानें
ारडावेसें वाटलें.

"हा डाळीचा हो परिणाम !" सुनबाई
ःणाल्या, "पोपटाला वाटीभर डाळ काय
ायची ?"

हिला कळलें कीं काय हा विठ्ठलराव
ाहे म्हणून ! –पोपटाची छाती धडधडली.

"खरें म्हणजे पोपटाला डाळ नकोच"
नबाई म्हणाल्या.

मग ? घालणार काय ?

"मिरच्या, पेरू, डाळिंब असलं खाणं
ं पोपटाला !"

तें ऐकून पोपटाला बरें वाटलें. रोजच्या
ज डाळ खाण्यापेक्षां फळें खावींत. नाहीं
री डाळ सुद्धां निवडलेली नसतेच घड.
ाखे खडे लागतात. आणि खडा चावतांना
तांचा सेट फटकन् मोडला तर ? त्यापेक्षां
ळें बरीं. . . पोपट विचार करतां करतां
ार कीर्र हंसला.

"ठेवलाय पेरू आणि डाळिंब ! काय
ाळं काढायचंय ?" मधली सून म्हणाली.

"आतां चर्चा नको ! सध्यां चार
ारच्या टाका. पुढचं पुढें !" हा मधला
लगा.

नंतरचे दोन दिवस पिंजऱ्यांत सारख्या
मिरच्याच पडल्या. आपलें कर्तव्य म्हणून
थोरली सून चार मिरच्या पिंजऱ्यांत
टाकायची. मग मधलीं नातवंडें प्रत्येकीं
किमान एक एक मिरची. आणि एकूण
दहा बारा नातवंडे. म्हणजे पिंजऱ्यांत एकूण
मिरच्याच मिरच्या. बरें तिखट लागलें तर
पिंजऱ्यांत चिमूटभर साखर नाहीं. एक
दिवस त्यानें भूक लागतांच दोन तीन



जिकडे तिकडे मेले किडेचे किडे-शी ऽऽ!!

मिरच्या खाल्ल्या. पण तें जडच गेलें.

दुसरे दिवशीं सर्वांची नजर चुकवून
मोठ्या शिताफीनें पोपटानें पिंजऱ्याचें दार
उघडलें आणि तो धूम उडत सुटला.
उडत उडत तो देवरावांच्या खिडकींत
जाऊन बसला. कीर्र. . . कीर्र. . कीर्र..!

"काय विठ्ठलराव ?" असें विचारीत
देवराव पोपटाकडे बघत राहिले.

पोपटाची मूळची लाल चोंच खूपच
लाल बुंद झाली होती. डोळेहि पाण्यानें
भरले होते आणि चोंचींतून जीभ बाहेर
लोंबत होती.

"काय झालं ?"

"बोडकं माझं ! कीर्र. . कीर्र. . कीर्र !"

"का हो ?"

"कार्टी नुसत्या मिरच्या खायला घाल-
ताहेत ! चोंचीची आग होते आहे."

"मग खा ना ! पोपटाला मिरच्या
आवडतातच !"

"काय खा ?" मिरच्या खाऊन खाऊन
जुनी मूळव्याध सुरू झालीय. लवकर कांडी
फिरवा."

देवरावांनीं कांडी फिरवतांच विठ्ठल-
विठ्ठल म्हणत विठ्ठलराव तिथेंच थोडा वेळ
बसले. आणि "आतां डॉक्टरकडे धांवतो"
असें म्हणत ते खरोखरच धांवत सुटले.

★★★

त्या दिवशीं शनिवार होता. सकाळची
शाळा सुटल्यावर काशीबाई हळूच देव-
रावांकडे आल्या. त्या वयानें पंचेचाळीसच्या
सुमारास होत्या. प्राथमिक शाळेंत शिक्षिका
होत्या आणि अनेक मास्तरणींप्रमाणें त्या
अविवाहितहि होत्या. अंगानें जाडजूड
आणि ठुसक्या. शाळा सुटली कीं रस्त्यावरील
पुरुषांचे धक्के चुकवीत घरीं जायचें.
खोलींत खुडूक बसायचें. वह्या पेपर्स

युद्धबंदीसह ब्लॅकआऊट झालाच पाहिजे !

प्रेमिक



अय्या ! संपला ब्लॅकआउट ? आतांच तर कुठें आमची सुरुवात झाली होती.

तपासण्याचें काम करायचें. जेवायचें आणि झोपायचं. या जीवनाचा तिला फार कंटाळा आला होता.

"कसं काय काशीताई ? काय म्हणतां ? कोंबडी व्हायचा विचार आहे ?"

"इश्श ! मी कसं सांगू ?" असें म्हणून काशीताईनीं लाजून पदरांत तोंड लपवलें.

"पण तुमचा विचार तर सांगा. पुढचं मी बघतो." जादूची कांडी हातावर आपटत देवराव म्हणाले.

"जेवण करण्याचा त्रास नको. पेपर-वह्या तपासणार नाहीं. रस्त्यावरून फिरणार नाहीं. कुठं तरी गप्प आराम बसायला मिळायला पाहिजे." काशीताई लाजत लाजत म्हणाल्या.

"ठीक आहे !" असें म्हणून देवरावांनीं कांडी उचलली.

तेवढ्यांत एकदम दचकून काशीताई म्हणाल्या, "पण आज आणि उद्यांच ! सोमवारीं सकाळीं मला शाळेंत गेलंच पाहिजे हो !"

"ठीक आहे !" असें म्हणून देवरावांनीं मंत्र म्हणत कांडी फिरवली आणि एकदम काशीताईंची गुबगुबीत कोंबडी झाली.

"जा—मागच्या परसांत खुराडा आहे." देवराव म्हणाले.

क्लक—क्लक—क्लक करीत कोंबडी परसांत गेली. तिथल्या खुराड्यांत चढून एका कोपऱ्यांत अंग आवळून बसली. खुराड्यांत दाणे होते. त्यावर चोंच मारून तिनें पोट भरलें. रात्र वरी गेली. सकाळीं पहाट होतांच शुद्ध लेखन घातल्यासारखी ती

मिरच्या बाधल्या

आखडली. रविवारचा सबंध दिवस तिला तसाच आराम करायचा होता.

पण कुठली शान्तता मिळायला ? एक भरदार छातीचा आणि लालबुंद दाढीतुऱ्याचा कोंबडा मुसंडी मारून धांवत आला आणि 'येऊं कां ?' असें न विचारतां तडक खुराड्यांत शिरला. गेट आऊट—वर्गाबाहेर जा— असें ती ओरडणार होती. पण आपण कोंबडी आहे हें एकदम तिच्या लक्षांत आलें आणि ती अधिकच घाबरली. घाबरून ओरडलीहि. पण तो कोंबडा कुठला ऐकायला ? त्यानें कोंबडीचीं पिसें चोंचींत धरलीं आणि तो ताकद दाखवायला धडपडूं लागला. पण मोठी धडपड करून कोंबडी तेथून निसटली आणि क्रॉऽऽक्रॉऽऽ क्रॉऽऽ क्रॉऽऽ अशी ओरडत जीव घेऊन धांवली. आकान्तून देवरावांच्या खोलींत शिरली. तसा कोंबडा मागें राहिला.

"झालं काय कोंबडीताई ?" देवराव चमकून म्हणाले.

पण कोंबडीला धाप लागली होती. त्यामुळें तिला बोलतां आलें नाहीं. ती थोडा वेळ कलकलत्या छातीनें क्लक क्लक क्लक क्लक करीत राहिली.

"काय झालं ?"

"झालं कपाळ ! आधीं माझं रूप बदला !"

"अहो वेळ आहे अजून ! रविवारीं रात्रीं ना बदलायचं रूप ?"

"नको— नको ! तो कोंबडा सतावतोय !"

"मग त्यांत काय झालं ?"

"इश्श ! हें हो काय देवराव !" कोंबडीनें मान मुरडली.

हंसत हंसत देवरावांनीं जादूची कांडी हातीं घेतली. आणि ते क्षणभर कोंबडीकडे बघत राहिले. कारण कोंबडी एकदम गप्प झाली होती.

"काय हो ? काय झालं ?"

"जरा पोट जड वाटतंय—" कोंबडी घाबरली.

"आणि बिचाऱ्या कोंबड्याला शिक्षा देताय ?"

"इश्श ! हें हो काय ?"

असें म्हणून तिनें क्षणभर पोट आवळल्यासारखें केलें. आणि एकदम एक पांढरें शुभ्र अंडें खालीं पडतांच ती अक्षरशः क्लकऽऽ क्लकऽऽ क्लकऽऽऽ करीत किंचाळली. देवराव मात्र गंमतीनें मोठ्यानें हंसले. त्यासरशी ती ओशाळली आणि रडूं लागली. तिच्या डोळ्यांतून टप टप टिपें पडलीं.

"झालं काय एवढं रडायला ?"

"मी खरोखरच गरोदर नव्हते हो ! त्या मेल्यानं नुसता विनयभंग केला. दुसरं कांहीं नाहीं. यापेक्षां पुरुष खूप बरे ! क्लक क्लक क्लक..."

देवरावांनीं कांडी फिरवली.

कोंबडी उभी होती तिथें काशीताई उभ्या राहिल्या.

कोंबडीसारखे आपले फांकलेले पाय त्यानीं एकदम आवळून घेतले.

"तो कोंबडा खरा होता कीं जादूचा ?" तिनें हळूंच चौकशी केली.

"खरा. . ."

"मग हरकत नाहीं !"

असें म्हणत त्यानीं लुगड्याच्या निऱ्या मांडींत आवळून धरल्या. अजूनहि अंडें



अनुक्रमणिका

पडेल अशी त्यांना भीति वाटत होती. पण तसें कांहीं झालें तरी देवरावांच्या पुढ्यांत शोभा नको म्हणून त्या अंग चोरून तेथून धांवत सुटल्या.

धावतां धावतां सुद्धां त्या हळू हळू क्लक क्लक क्लक क्लक क्लक असा घुत्कार करीतच होत्या.

असा क्लक क्लक आवाज आतां करण्याची गरज नाहीं असें देवरावांना त्यांना सांगायचें होतें. पण त्या कधींच दृष्टिआड झाल्या !

शाळेंतलीं पोरें हंसली म्हणजे त्या क्लक क्लक करायचें थांबवतील असा मनाशी विचार करीत देवराव खुर्चीवर बसले.

★★★

पण देवरावांना खरें आश्चर्य वाटलें तें दिगंबर हताश होऊन आला तेव्हां ! वास्तविक दिगंबर म्हणजे मुलखाचा उडाणटप्पू ! पंचविशींतला हा पोरगा टारगटपणें पोरींच्या मागें फिरण्यांत आणि त्यांची चेष्टा करण्यांत पटाईत. तो आपल्याकडे यावा याचें त्यांना नवल वाटलें.

"काय रे दिगंबर ? तूं इथं कसा काय ?"

"कंटाळलों हो देवराव !"

"पण कां ?"

"आजकालच्या पोरी मोठ्या वस्ताद झाल्या आहेत. चक्क टाळतात."

"मग काय करायचं ?"

"काय करूं ? पोरगी मिळत नाहीं. लग्न होत नाहीं. स्त्रीसुख नाहीं. किती दिवस असा राहूं ?"

"मग काय जादू करूं ?"

"तुम्हीच काय तें करा !"

"ठीक आहे ! जमिनीला हात टेकून ओणवा रहा."

दिगंबर ओणवा राहिला.

देवरावांनीं जादू केली. दिगंबर एकदम कुत्रा झाला. भांक भांक करीत भुंकूं लागला.

"बाबा, माझ्यावर भुंकूं नकोस. जा, बाहेर जाऊन काय तें कर !"

कुत्रा बाहेर पडला. फिर फिर फिरला आणि अखेर दोन तीन दिवसांत पुनः देवरावांच्या घरीं हजर झाला.

"काय रे ? कांहीं जमलं कीं नाहीं ?"

"छे ! कांहीं जमलं नाहीं !"

"मग दोन दिवस केलंस काय ?"

"फिर फिर फिरलों. पण फार सतावलं हो लोकांनीं. रस्ता ओलांडतांना दोनदां तर मोटरखालींच सांपडणार होतो. फूटपायरीवरून चालावं तर लेकाचे लाथा मारतात. गळ्यांत पट्टा हवा होता बघा !"

"मग पट्टा देऊं कां ?"

"नको, नको ! खूप झालं !"

"रस्त्याच्या बाजूला लोक मनावनान म्हणून काल मैदानांत गेलों. तर तिथं शाळेची ट्रिप आली होती. मी गरीब दिसलों म्हणून एका मास्तरानें मला धरलं आणि माझं शेपूट नळींत घालून ठेवलं. मग नळी बाहेर काढून तो मुलांस म्हणाला, "पहा, कुत्र्याचं शेपूट नळींत घातलं तरी तें वाकडं तें वाकडंच. शिक्षणासाठीं आपला थोडा उपयोग झाला म्हणून थोडं बरं वाटतं न वाटतं तोंच त्या मास्तरानें माझ्या पेकाटांत सरळ लाथ कीं हो घातली. कां ? गरीब दिसलों म्हणून कीं गळ्यांत पट्टा नाहीं म्हणून ? मी चिडून मास्तराच्या अंगावर धांवलों. चांगला चावाच घेणार होतो. पण मास्तर पळाला आणि पोरांनीं दगड मारले. करतां काय शेवटीं शेपूट घालून पळालों झालं."

"तिथून कुठं गेलास ?"

"तिथून वडाळयाच्या दत्त मंदिरात एक रात्र काढली. आणि पहाटे उठून हा इथं आलों."

"हात् तुझी ! एवढं करून तुला एक सुद्धां कुत्री मिळाली नाहीं ? रस्तोरस्तीं साली किती कुत्रीं पडलेली असतात."

"पाहिली हो ! खूप पाहिली. पण तिच्याकडे जावं ती शेपूट घालून पळ काढते. एक का दोन डझनावारी कुत्र्या पळाल्या."

"पण कां ?"

"त्या म्हणाल्या, तूं कसला कुत्रा ! कुत्रा आहेस कीं माणूस आहेस ? भलत्या सलत्या वेळीं येतोस लाज नाहीं वाटत ? जा– श्रावण भाद्रपदांत ये !"

"मग काय ?"

"मग काय ? श्रावण भाद्रपदाला आतां किती तरी वेळ आहे. तोपर्यंत हें वाकडं शेपूट घेऊन कुठं फिरूं ? मग पुढं बघू ! आतां तुम्ही कांहीं फिरवा. थँक्यू हं ! भांक भांक... !"

तात्पर्य : देवराव म्हणतात, या सर्व गोष्टींचें तात्पर्य एकच–मनुष्याला कुठेंहि कसाहि ठेवा. तो असमाधानीच रहाणार !



नुसता 'विनयभंग' हं ! ●●●

**सुमित्रेची बोटं त्याच्या कपाळपट्टीवरून हळुवारपणं फिरत होती. आणि त्या बोटांना विचकत विचकत त्याच कपाळ-पट्टीखालीं ब्रह्मेला संकटांत टाकणारा एक प्रश्न शतपावली करीत राहिला होता— —आतां हा जानकीचा अंगारा सुमित्रेला पोंहचवायचा कसा?**




--सुरेश वेंगुर्लेकर

अनंत, विष्णु ब्रम्हे—हा तसा चांगला कुटुंबांतला मनुष्य. चांगल्या कुटुंबांतला. वरी वायको आणि भली मुलं लाभलेला. शिवाय, आजच्या धकाधकीच्या मामल्यांतहि पुष्कळच लौकर यशस्वी झालेला. समृद्ध संसारांतला आणि पनः संसारांत चांगला रमलेला.

अगदीं ब्रम्हेच्या शेजाऱ्यालाही ठाऊक आहे तो ब्रम्हे म्हणजे—वायको मुलांना घेऊन फिरायला जाणारा. मुलांसाठीं खाऊ–खेळणी घेऊन येणारा. कधींमधीं डॉक्टरकडून त्यांचं औषधसुद्धां आणणारा. ऑफिसांतून येतांना लॉंड्रीतल्या कपड्यां-वरोवर वायकोसाठीं वेणीची पुडीही स्मरणपूर्वक घेऊन येणारा....

यज्ञोपविताच्या सूताइतक्या शुद्ध अशा या अनंत विष्णु ब्रम्हेला संसारावाहेर आणखी कसला अनुभव असण्याचं वास्त-विक कांहीं प्रयोजन नाहीं. पण वस्तु-स्थिती तशी नाहीं. लोकांना ठाऊक नाहीं, पण संसारावाहेरहि ब्रह्मे वडा अनुभवी माणूस आहे.

उगाच इकडल्या तिकडल्या गप्पा हव्या आहेत कशाला? खुद्द वायकांच्या विपयांत ब्रम्हे हा पुरुष अननुभवी नाहीं. अगदीं आज मितीला म्हणजे वय वर्षे एकोणचाळीसाव्या वर्षी ब्रम्हे तीन स्त्रियांशीं संबंध ठेवून आहे.

अर्थात एक आहे खुद्द त्याचीच वायको. वायकोशीं संबंध नसून कसं चालेल? ते असायलाच हवेत. ती आपली जन-रीतच आहे.

दुसरीही वायकोच आहे. पण दुस-ऱ्याची. याची प्रेयसी. ही कांहीं जनरीत नव्हे. मात्र 'सोसायटींत' आतांशा असाही एखादा संबंध असूं शकतो म्हण-तात. असूं द्यात वापाडा!

पण तिसरी—?

ती आहे सरळ सरळ 'वाई!' खुशाल अगदीं तियली 'वाई!'

ब्रम्हेच्या वायकोचं नांव—सुमित्रा. सुमित्रा ब्रम्हेचा संसार चांगला करते. एकोणचाळीसाव्या वर्षीही ब्रम्हे आपल्या संसारांतल्या वायकोवर खूप आहे. रात्रीं साडेनवालाच ब्रह्मेची शहाणी मुलं झोंपीं जातात. ब्रम्हे यावेळीं नुकत्याच पोटांत गेलेल्या सुग्रास अन्नाची सुखावह हालचाल अनुभवत आराम खुर्चीत पहुड-लेला असतो. हातांत एखादं शृंगारिक मासिक. वहुतेकवेळां यांतल्या गोष्टींचा त्यांची सुखकारक सुस्ती पोसायला वरा उपयोग होतो. वाचतां-वाचतां काय वाचतो आहोंत हेंच ब्रम्हेला कळेनासं होतं...मग वाचत असलेली गोष्ट ब्रम्हेवर झोपेची शानदार दुलई पांघ-रून जाते.

आतांसुद्धां ब्रम्हे असाच आराम खुर्चीत पहुडला आहे. हातांत शृंगारिक मासिक आहेच. मात्र आज वाचतां-वाचतां नेह-मींची डुलकी तेवढी लागलेली नाहींय्. किंवहुना झोंप उडालीच आहे. एका चावट गोष्टीनं ब्रम्हेला छेडलं आहे. त्यामुळं खर्चीतल्या खुर्चीत त्याची चुळबुळ चालू आहे.

पण उगाच चुळबुळत राहणं ब्रम्हेला फारसं मानवत नाहीं. तो सरळ सरळ एकदम वायकोला हाक मारतो——,

"सुमित्रा?ऽऽऽ...."

"हं ऽऽ..."

"तिकडे काय करते आहेस?"—

"काय हवं आहे—?"

"तूं हवी आहेस—."

ब्रम्हेचा जबाव नेहमींच असा रोख असतो. सुमित्रा मात्र यावर कांहीं वोलत नाहीं. हंसते. नुसतीच खट्याळ हंसते. वायकोचं हें खट्याळ हंसणं आणि लगेच धांवत न येणं ब्रम्हेला विशेष पसंत आहे. कारण त्याला ठाऊक आहे कीं, ती आंत कांहींतरी करते आहे. कांहींतरी म्हणजे त्याच्याचसाठीं कांहीं.

म्हणजे त्याला आवडणारं मिरचीचं लोणचं...नाहींतर थंडी पासून त्याचं संरक्षण करणारं स्वेटर...किंवा कुंडींत त्यानें मोठ्या हौसेनें आणून लावलेल्या चित्रगंधेच्या वेलाला खतपाणी...असलंच कांहींतरी करत रहाण्यांत तिचं वःसलंसं आभाळाएवढालं सुख सामावलेलं असतं याची ब्रम्हेला कल्पना आहे. म्हणूनच अशावेळीं ब्रम्हेला वायकोजवळ असावींशी वाटली तरी तो तिच्या त्या आभाळा-एवढाल्या सुखाआड कधीं येत नाहीं.

पण आतां तसंच आरामखुर्चींत पडून रहाणंही ब्रम्हेला शक्य नसतं. तो उठतोच.















अनुक्रमणिका

तच एकदम पसंत पडली. पहिल्याच भेटींत, 'ब्रह्मे इज अ परफेक्ट रिस्पॉन्स टू माय ब्युटी' असं बाईनीं ब्रह्मे विषयीं आणि 'अमिता इज अ मोस्ट डेलिकेट गर्ल' असं ब्रह्मेनें बाईविषयीं मत बांधलं. अनुभवानें एकमेकांविषयींचं हें मत 'डेव्हलप' केलं.

तेव्हां अशा या आपल्या डेलीकेट गर्लच्या फ्लॅटवर ब्रह्मे पोहोंचला आहे. आणि त्यांच्या ठरलेल्या सांकेतिक पद्धतिनें त्यानें दारावरची कॉलबेल वाजवली आहे. अमिताच दार उघडायला येईल अशी ब्रह्मेची अपेक्षा आहे. . .

पण दार उघडलंय गंगाजीने. हा उत्तर प्रदेशीय अवसरे साहेबांचा ऑर्डर्ली आहे. शेपटासारखा त्यांच्या मागून असतो. शेपूट इथें आहे म्हणजे साहेबही आंतच आहेत म्हणायचे.

पण कपाळावर उमटू पहाणारी आंठी आटोक्यांत आणून चेहेरा सस्मित करीत ब्रह्मे आंत येत म्हणतो—

"दॅट्स फाइन! पुष्कळ दिवसांनीं आज साहेब घरीं सांपडताहेत म्हणायचे."

"नहीं, साहब घर में नहीं है."

"साहेब नाहींत! तर मग तूं इथें काय करतो आहेस?"

"यह सम्हान बांधके मैं भी अभी निकला."

"कुठें जाताहेत साहेब?"

"कलकत्ता जायगे. कान्फरेन्समें."

"बाई कुठें आहेत?"

"अभी, अभी स्नान करने बाथरूम गयी"

"स्नान—यावेळीं?"

"सीमींगपूलसे अभी तो आआं. उनकी कुछ रेसीस थी आज."

"आय् सी!"

"साव—"

"काय रे?"

"मैं तो तय्यार बन गया."

"मग मी काय करूं म्हणतोस?"

"बाई अभी अभी बाथरूम गयी है."

"जाऊं दे की."

"हमको देरी हो रही है."

"तुम जाव."

"हां हमको जानाही होगा. आप जरा बाईजीको समझा देना. . .देरी होगी तो साहब घुमा करेंगे, करके मैं चला गया."

"हां, हां, सांगतो. . ."

गंगाजी निघून गेलाय.

स्वीमींग पुलावरनं आतांच बाई आल्या म्हणाल्या. ओ, हाऊ फाईन ईट् वुड हॅव बीन टू विटनेस हर इन् अ बेदींग सूट? अमिता तरी कशी गाढव आहे. सांगितलंन् सुद्धां नाहीं. बेदिंगसुटां-तल्या अमितेपुढें गोल्डीनची ओली बाई जर् मानते. गोल्डीनची ओली बाई . . . ओली अमिता...आय् सी! आतां सुद्धां अमिता बाथरूमांत आहे. ओली आहे. गोल्डीनची बाई ओली होती पण तिच्या अंगावर वस्त्रं होतीं. अमिता ओली आहे—आणि तिच्या देहावर निश्चित यावेळीं वस्त्रं नाहींत . .गंगाजी निघून गेलाय . . .

वेगानें बाथरूमपाशीं पोहोंचून ब्रह्मे बोटानें दार टकटकावतो. अमिता आंत-डून विचारते—



(दीपा. १६)

अनुक्रमणिका

"काय रे गंगाजी—?"

गंगाजी? ब्रह्मेला हंसू आवरत नाहीं. त्याच्या हंसण्यानें अमिता गोंधळांत पडते. पुन: ओरडून विचारते—

"कोण आहे—?"

"इट्स मीऽऽ... अमिता. घाबरलीस काय ?"

"यूऽऽ नॉटी बॉय. काय फाजील आहेस रे?"

"फाजील आहे म्हणून तर तुला आवडलो आहे."

"नो..नो..नॉट अॅट ऑल."

"नाहीं काय?"

"तूं मला बिलकुल आवडलेला नाहींस. आज मी तुझ्यावर खूप रागावले आहे."

"नक्की?"

"येस्, येस्. नक्की म्हणून काय विचारतोस?"

"दॅट्स् प्रेटी फाईन्. तर मग आतां दार उघड पाहूं. कसं पटकन्..."

"कशॅला?"

"तूं रागावली आहेस...तशांत पूर्ण ओली आहेस...इतकं सुंदर दृश्य मला पुन्हां कसं पहायला मिळेल?"

"यूऽऽ अनु...यु आर सच अ.."

"अमिता जरा दार उघडून सांगना मी कसा आहे तो..."

"अडलंय् माझं खेटर."

"यॅस्. येस् खरंच अडलय् कीं. तुझ्या स्लिपर्स इथं बाहेर दाराशींच आहेत बघ. हव्यात कां तुला? जराशी फट उघड. पटकन् देतो मी...उघडतेस ना ?"

"नो—आय् ओन्ट."

"प्लीज् अमिता..देअर इज समथिंग सोऽऽ स्वीट टू गिव्ह यू..."

"ठाऊक आहे मला. स्वीट तुझं. आधीं आज होतास कुठें सांग ?

"मी ? कुठें होतो ?

"तें मी तुला विचारतेय ?"

"अग पण केव्हां ?"

"साडेचार वाजतां"

"ऑफीसांतच होतो."

"डोन्ट लाय. पत्ता चुकलाय तुझा."

"कसला ?"

"थापा मारायच्या जागेचा. तुझ्या बायकोला मारायच्या थापा मला मारूं नकोस."

ब्रह्मेला एकदम ठेंच लागल्यासारखं झालं. यावेळीं...या...ठिकाणी....कुठल्याच कारणानें त्याच्या बायकोचा उल्लेख होणं त्याला उचित वाटलं नाहीं. पण अमिताच्या या उद्गारांवर काय बोलावं तेंहि ब्रह्मेला पटकन् समजलं नाहीं. तो बोलत नाहींय असं पाहून अमिताच पुन्हां म्हणाली—

"आतां गप्प कां झालास? म्हणजे खोटंच बोललास ना..?"

"नो अमिता. ऑफिसांतच होतो मी. तूं फोन करायचा होतास".

"मी प्रत्यक्ष आले होते."

"हाऊज् दॅट् पॉसिबल! केव्हां आली होतीस तूं?"

"चार-साडेचार वाजतां."

"आय सी! आय् वॉज बिझी वुईथ दॅट ब्लडी लॉंग बोअर्ड मिटींग ऑन द टॉप फ्लोअर. पण तूं नीट चौकशी तरी करायचीस."

"आय डीड. तुझ्या डिपार्टमेंटमधल्या अगदीं दारांतल्याच क्लार्कला विचारलं मी."

"दॅट न्यू रिक्रूट! काय सांगितलंन् त्यानं ?"

"साहेब दुपारींच बाहेर गेले म्हणाला."

"ब्लडी ब्रूट! आय विल् मेक हिम टू क्विट माय डिपार्टमेंट. बाय द वे—काय झालं तुझ्या रेसीसचं ?"

"विचारूं नकोस मला."

"न विचारण्यासारखंच झालं काय ?"

"होईल नाहीं तर काय? तूं आला होतास थोडाच मला चिअर करायला. आय लॉस्ट इट् बिकॉज् ऑफ यू."

"आय अॅम सॉरी अमिता. सो व्हेरी सॉरी. तूं आतां दार उघड पाहूं. आय विल मेक यू हॅपी नाव. उघडतेस ना ?"

"उघडते रे, पण आधीं गंमत ऐक एक."

"नंतर सांगना तुझी गंमत..."

"नाहीं. ऐक आधीं. इट्स सो व्हेरी इंटरेस्टिंग."

"अच्छा सांग, लवकर."

"तूं भेटला नाहींस..मग आलेच होते म्हणून तुमच्या ऑफिसच्या वेल्फेअर सेंटरमधल्या लायब्ररीला व्हिजिट दिली मी. अॅंड इट हॅपन्ड देअर...सो व्हेरी फनी."

"काय झालं ?"

"तूं बीलीव्ह करणार नाहींस..."

"सांगशील तर..."

"तुझी बायको पाहिली मी."

आणि अमिता खळाळून हंसली.

पुन्हां एकदां ब्रह्मे ठेंचाळला. इथं... या जागीं पुन्हां सुमित्रेचा उल्लेख होत होता. सुमित्रेबद्दल इथं कांहींही बोललं जाणं त्याला कमालीचं अडचणीचं होत होतं. त्याला तें आवडत नव्हतं. अमिताला तसं सांगतांहि येत नव्हतं. पुन्हां एकदां न बोलतां तो स्तब्ध राहिला आणि अमिता पुढें बोलत राहिली—

"मी म्हटलं नाहीं तूं बिलीव्ह करणार नाहींस म्हणून. पुस्तकं घ्यायला आली होती वाटतं...कृष्णायन...कर्णायन असलंच काय काय होतं हातांत. यु












शुड् मेक हर रीड अॅटलीस्ट पेरी मॅसन अनु...तुझ्या वेल्फेअर इन्स्ट्रक्टरनी इंट्रोडयूस केलं मला.... शेक हँड करायला हात पुढें केला मी तर कमालच केली कीं रे तिनें, चक्क आपण त्या साईबाबाला करतोत तसला नमस्कार केलान् तिनें मला. ओफ् ! इट् वॉज सो ऑक्वर्ड फॉर् मी.. पहातच राहिलें मी तिच्याकडे...पण वरं कांर तेवढी भट्टीण काकूसारखी वागली नाहीं तर दिसायला बरीय् कीं रे तुझी बायको. एऽऽऽ पण हें काय ? तूं बोलतच नाहींस कांहीं ? आय सी ! मी दार उघडत नाहीय् म्हणून रागावलास काय ? ओ. के. वॉय आय् विल् जस्ट ओपन इट फॉर माय स्वीट मून.. एऽऽपण अंगावर टॉवेल तरी घेणार मी हां कारे..आणि तूं आधी डोळे मिटून रहा..मी डोळे उघड म्हटल्यावर मगच पहायचं मला...सो, आर यू रेडी–? उघडते मी आतां दार..."

अमितानें हळूंच दार उघडलं. आधीं फटींतून पाहिलं. ब्रह्मे दिसला नाहीं. दार संपूर्ण उघडलं तरी दिसला नाहीं. हा गेला कुठें इतक्यांत ?

"व्हेअर आर् यू अनूऽऽ?..."

अमिताच्या हांकेला ब्रह्मेकडून उत्तर आलं नाहीं. तिच्या फ्लॅटचा बाहेरचा दरवाजा मात्र जोरानें ओढून घेतल्याचा आवाज तेवढा आला.

ब्रह्मे रस्त्यावरच्या मोकळ्या हवेंत आला तरीहि त्याला खूपच गुदमरल्यासारखं वाटत होतं. डोकं कमालीच चढलं होतं. मनावर चमत्कारिक ताण आला होता.

भेटली असेल तिला सुमित्रा–पण अमितानें तिचा उल्लेख करावाच कां हें ब्रह्मेला समजेना. अॅटलीस्ट शी शुड नॉट हॅव् मेन्शन्ड हर इन धीस मॅनर...हें सरळ सरळ अपमानास्पद होतं...सो व्हेरी इन्सलटींग ! अशा परिस्थितींत तिथं थांवतां येणंच शक्य नव्हतं.

पण तो रागानें नुसताच तिथून निघून आला होता. निदान अमिताचं हें बोलणं आपल्याला आवडलेलं नाहीं हें उघड उघड तिला बजावून मगच निघून यायला हवं होतं. तसं न केल्याबद्दल त्याला आतां अपराध्यासारखं वाटूं लागलं.

कोपऱ्यावरचा इराणी अजून उघडा होता. तो आंत शिरला. चहा मागवला. पोऱ्याकडे पैसे देऊन काऊंटरवरनं अॅनॅसिनही आणायला सांगितलंन. चहाच्या घोटावरोबर अॅनॅसिनची एक गोळी त्यानें गिळली. दुसरी खिशांत टाकली. सिगरेट शिलगावून जोरानें छातींत धूर ओढून घेतला. हळूं हळूं सिगरेटच्या तमाखूनें थोडें फार काम केलं. डोक्यांत मंद वलयं चढूं लागली. त्याला किंचित् आराम वाटला.

पुन्हां ब्रह्मे रस्त्यावर आला. कुठें जावं त्याला कळेना. घरीं जावंसं मात्र बिलकुल वाटत नव्हतं. फूटपाथवर तो थांवला. उभ्या उभ्या सिगरेट फुंकत राहिला.

त्याला जानकीची आठवण झाली. आणि तिची आठवण होतांच खूप आवेगानें जाणवलं–यावेळीं तिच्याचकडे जायला हवं.

समोरून टॅक्सीवाला रेंगाळत चालला होता. ब्रह्मेनें त्याला हात केला. जानकीच्या घरासमोर त्यानें टॅक्सी थांबवली. टॅक्सीवाला मीटरपेक्षां बायाच चवीनें पहात होता. ब्रह्मेनें मीटर पाहून त्याच्या हातीं नोट कोंवली. शिलकीची मोड परत घेण्यासाठीं न थांवतां तो जानकीच्या घराच्या पायऱ्या चढून वर गेला.

इथं आल्यावर ब्रह्मेची व्यवस्था नेहमींच विशेष दक्षतेनें होते. अगदीं आंतली, त्यांतल्या त्यांत बरी खोली त्याच्यासाठीं ठरलेली असते. या खोलीचा वापर सरसकट सगळ्याच गिऱ्हाईकांसाठीं होत नसतो.

मात्र या खोलीकडे जातांना एका व्हरांडेवजा भागांतून जावं लागतं. आणि असं जातांना खोली रिकामी नाहीं म्हणून थांवून राहिलेल्या एखाद दुसऱ्या गिऱ्हाईकाची नजर चुकवून त्याच्या अंगावरून जाणं भाग पडतं. इतक्यावेळां इथं येऊनहीं या व्हरांड्यांतून जातांना तेवढं अजूनही ब्रह्मेला अवघडल्यासारखं होतं.

पण या व्हरांड्यांत आज एकटीच 'घरवाली' आहे. ब्रह्मेला बरं वाटतं. म्हातारीहि ब्रह्मेला पाहून उठते. आदबीनं म्हणते–

"जावा तुमी खोलींत. जानकीला लावून देते मी."

खोलींत पलंगापाशीं एकुलती एक खुर्ची आहे. या खुर्चीत बसल्या बसल्या शिलगावलेली नवी सिगरेट अर्धी संपून गेलीय तरी अजून जानकीचा पत्ता नाहीं.

कुळल्याशा देवीला जाण्यासाठीं जानकी बाहेरगांवीं गेली होती–ती परतलीय ना ? उगाचच ब्रह्मेच्या मनांत शंका आली. या शंकेचं पुन्हां त्यालाच हंसूं आलं. ती परतल्याशिवाय कां म्हातारी तिला पाठवून देते म्हणाली.

तेवढ्यांत जानकी आलीच. पण आल्या आल्या नेहमींसारखं दार लोटून

न घेतां उंबरठ्यावरच थांबून राहिली. तिथूनच म्हणाली–

"सायबानला वरं आजच यायला फावलं ?"

ब्रह्मेच्या कपाळावर आधींच आंठी होतीच. जानकीच्या दारांतच थांबून राहण्यानं आणि या चमत्कारिक प्रश्नानं त्याचा चेहरा जास्तच त्रासदायक झाला.

पण जानकीकडे त्यानें थोडं नीट पाहिलं आणि त्याच्या चेहेऱ्यावरची सगळी चिडचीड नाहींशी झाली. जानकीचा आजचा सगळा अवतारच निराळा होता.

पांढरी वस्त्रं ती नेसली होती. हातां-पायांत... कानांत चांदीचे दागिने होते. कमरेलाहि चांदीचा पट्टा लखलखत होता. केंस धुतलेले होते. तेलपाणी न करतां त्यांना नुसतीच एक सैलशी गांठ घातली होती. आंबाड्याच्या या गांठींत बंदिस्त न झालेले केंस तसेंच भुरभुरत राहिले होते. कपाळावर कुंकवाच्या जागीं आणि भांगांत हळदीची मळवट भरली होती.

जानकीच्या या दर्शनानें ब्रह्मेला हंसू आलं.

"कुठल्या देवीला गेली होतीस ?"



"हाय आमच्या गांवाकडली."

"आतां गांवाकडच्या लोकांनीं काय करायचं ?"

"कशाचं काय करायचं ?"

"त्यांना आतां देवी कुठली ?"

"कुठली म्हंजे ? हाय कीं तिकडे गांवाकडल्या देवळांत."

"त्या देवळांतली देवी अजून तिथेंच आहे म्हणतेस—?"

"आतां काय करायचं वाय ! कुठं हिंडायफिराय जाती काय ती ?"

"तर मग आतां माझ्या समोर कोण उभी आहे ?"

"कोण हाय ?"

पण तेवढ्यांत जानकीच्या डोक्यांत प्रकाश पडला. ब्रह्मे तिची थट्टा करतोय हें तिच्या लक्षांत आलं. जोरानें मान वेळावून ती म्हणाली—

"वरे हाय की वो तुमी सायेब. मस्करी करताय काय गरीबाची. देवी कोप करील की आमची".

"कोपलीच आहे कीं. तिची ही सजा संपायचीय केव्हां तेवढं सांग."

"म्हंजे वो काय ?"

"म्हणजे त्या दारावरचा पहारा सोडून तूं आंत केव्हां येणार आहेस ?"

जानकीनें खूप घाईनें मान हलवली.

"नाहीं, नाहीं, आज यायची नाहीं मी."

"म्हणजे काय जानकी ?"

"आजचा एवढा शेवटला दिस हाय माझा !"

"कसला शेवटचा दिवस ?"

"नवसाच्या उपासाचा. घराकडे आल्यावर तीन दीस कडक उपास करून तुजी सेवा करीन म्हून सांगून आलेय मी देवीला."

"तर मग मला परत जायला सांगणार आहेस तूं ?"

"माज्या तोंडानं मी नाई सांगायची. पर आपल्या मनानं तुमी आजचा दीस सांवाळून घ्या."

"पण कशासाठीं हा सगळा प्रागलपणा जानकी ?"

"आसं म्हणू नका सायेब. भाव मिलीटरींत हाय माजा. सरकारानं लडायवर धाडला त्येला–"

"तुला भाऊ आहे जानकी ?"

जानकी मानेनेंच 'हो' म्हणाली.

"इथें येतो ? कधीं तुझी चौकशी करतो ?"

"हितं ना येऊ दे तो पन वायकापोरं हाईत त्या जीवाला. त्येना उगडं करून नाई चालायचं. येवी माजी नुवसाला पावली आन् त्येच्या वायकापोरांत त्येला सुखरूप आणून सोडलं...."

ब्रह्मेच्या अंगावर सरसरून कांटा उभा राहिला. जानकीच्या या दर्शनानें तो थिजून गेला. या घरांतल्या बायांत वागायला तुलनेनें जानकीच सगळ्यांत मऊ होती. पण तिच्या काळजांत असली कांहीं भावना दडलेली असेल अशी कल्पनाही ब्रह्मेनें कधीं केली नव्हती. हा अनुभव....ही घटना इथल्या वातावरणाशीं विसंगत होती... विचारशक्तीला क्षीण आणणारी होती...

क्षणभर जानकीकडे ब्रह्मे टक लावून पहात राहिला. मग जड झालेलं डोकं जोरानें हालवत म्हणाला–

"नाहीं जानकी, तुझ्याकडून कांहीं घेतल्याशिवाय या घरांतून मी परत जाणार नाहीं.

जानकी दचकली.

उत्तर न करतां त्याच्याकडे पहातच राहिली.

"तूं मला आज कांहीं...कांहींही देणार नाहींस जानकी ?"

त्याचे शब्द–त्याचा स्वर खूपच जाणवणारा होता. जानकी जास्तच अनुत्तरीत झाली. त्याच्यावरची नजर काढून केविलवाणें चेहेऱ्यानें दुसरीकडे पहात राहिली.

तिची स्तब्धता ब्रह्मेलाही फारच जाणवली. त्यानें पुनः आवर्जून विचारलं–'

"पिण्यापुरतं पाणीसुद्धां देणार नाहींस ?"

एकदम मान वर करून तिनें ब्रह्मेकडे पाहिलं. उभीच्या उभी ती शहारली. पहातां पहातां तिच्या ओठांत हांसू आणि डोळ्यांत पाणी भरून आलं.

लगबगीनें ती दारांतून हलली. ग्लासांतून पाणी घेऊन आली. तोंवर ॲनॅसिनची गोळी ब्रह्मेनें तोंडांत टाकली होती. पाण्याचा घोटावरोबर ती गिळून टाकली. ग्लास जानकीच्या हातीं परत दिला. हातरुमालानें तोंड टिपून घेतलं. मग म्हणाला–

"निघतों मी आतां जानकी."

पण दारांतून जानकी हलली नाहीं.








'ही दिवाळी व नूतन वर्ष आमच्या ग्राहकांस व हितचिंतकांस सुखसमृद्धीची व आनंदाची जावो.'




# बेअरींग्ज व बुशेस्






## किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि.

एल्फिन्स्टन रोड, पुणें-३ (भारत)

TOM & BAY








## एक झिंदाबाद कविता



आपले कान बंद करा
आपले ओठ घट्ट मिटा
आपले डोळे झाकून घ्या.
सावधान. गल्लीच्या नाक्यावर
एक मोठा दादा असतो
बारा भट्ट्या आहेत त्याच्या
मालकीच्या. खून पडेल.
सावधान. खालीं मान.
बंद डोळे. बंद कान.

पुढारी आले. नमस्कार.
झिंदाबाद. जयजयकार.
पुढारी साधे असतात.
त्यांच्या नांवें बँकेमध्यें
खातें देखील असत नाहीं
पुढाऱ्यांना वूड असतें
बुडाखालीं खुर्ची असते.
खुर्चीखालीं सत्ता असते
सत्तेखालीं गुंड असतात
गुंडांखालीं पोलीस असतात
पोलिसांखालीं..... खबरदार.

आधीं ओठ घट्ट मिटा
सावधान. खालीं मान
बंद डोळे. बंद कान.
उद्यांच्या पेपरामधें
पुढाऱ्यांचा फोटो येईल.
मला खूप भीति वाटते
तुला खूप भीति वाटते
त्याला खूप भीति वाटते
तिला खूप भीति वाटते
भीति ज्वा थांबवण्यासाठीं
केमिस्टकडे गोळ्या असतात
गोळ्या घेतांच झोप येते
झोप येतांच भीति थांबते
लहान भीति दोन गोळ्या
मोठी भीति सहा गोळ्या
वीस गोळ्या घेतल्या तर
भीति थांबते कायमची.
खबरदार. ओठ मिटा.
त्या अर्ध्या गोळ्या गिळा.
सावधान. खालीं मान.
बंद डोळे. बंद कान.
काळोखाच्या रांगेमधें

निमूटपणें उभे रहा ...
पण राव, एक सांगा :
ही रांग कुठें जाते ?
खबरदार. प्रश्न नको.
जो प्रश्न विचारील
त्याची पटकन नोकरी जाईल
माणसाला बायको असते
बायकोला पोरें होतात
पोरांना भूक लागते
भुकेला नोकरी लागते
नोकरीला मनाचें मढें लागतें.
ही रांग कुठें जाते ?
ही रांग कुठें जातें ?
सावधान. खालीं मान.
बंद डोळे बंद कान.
तरीपण ही रांग कुठें जातें

—मंगेश पाडगांवकर

"आतां मला कशासाठीं थांबवते आहेस ?"

"द्यायचंय तुमाला काई."

"काय द्यायचं आहे ?"

"देवीचा अंगारा हाय."

"काय करूं मी याचं जानकी ?"

"काय वी करून मालकीणबाईच्या कपाळाला पोचवा."

"जानकी !"

"न्हाई म्हणूं नका साहेब. एवडं करीन म्हणा."

"म्हटलं आणि केलं नाहीं तर ?"

"करीन म्हणून न करायचं हुनार नाहीं तुमाला.."

"बरं लावला तिच्या कपाळाला अंगारा म्हणजे काय होईल ?"

"त्यानला नजर लागनार नाई माजी मेलीची."

"जानकी ?"

"हां सायेब खरं सांगत्ये मी."

"काय म्हणते आहेस तूं ?"

"आठ दिवसामागं बोरीबंदरवर कुणाला घालवायला आला व्हता तुमी ?"

"तुला कसं ठाऊक जानकी ?'

"त्याच गाडीनं गावाला गेली मी."

"मी कसं पाहिलं नाहीं तुला ?"

"वरच्या फळीवर निजली व्हती मी. कसं बगनार तुमी. पर मी बगितलं तुमाला....आन् बाईनला वी. आक्का डबा नजर लावून हुता त्यंच्यावर. माजी बी नजर गाडी सुटस्तवर हालली नाई बगा. वाईट आसते सायेब नजर आसली."

अवाक् होऊन ब्रह्मे जानकीकडे पहात राहिला.

तो बोलत नाहीं असं पाहून जानकी कोमेजली. पडल्या स्वरांत म्हणाली.

"नका नेऊ सायेब..तुमच्या मनांत नाई तर..."

"आण ती पुडी इकडे जानकी."

घाईनें ब्रह्मे म्हणाला. तिच्याकडून अंगाऱ्याची ती पुडी घेऊन ब्रह्मे त्या घरांतून बाहेर पडला.

सुमित्रेनं त्याला दार उघडून आंत घेतलं तेव्हां रात्र बरीच उलटली होती. पुन्हां त्याचं डोकं जड झालं होतं. सपाटून शिकासुद्धां यायला लागल्या होत्या. तो तसाच पलंगाकडे जाऊं लागला तशी सुमित्रा म्हणाली—

"फार जागरणं करूं नका म्हणाले होते...पण ऐकलं नाहींत. आतां तसेंच झोपूं नका. विक्स चोळून देते तेवढं आधीं करून घ्या."

ब्रह्मेपाशीं यावर कांहीं शब्द नव्हते. शिवाय शिका त्याला कांहीं बोलायला सवडही देत नव्हत्या. तो मुकाट पलंगावर पडून राहिला.

सुमित्रेचीं बोटं त्याच्या कपाळपट्टीवरून हळुवारपणें फिरत होतीं...आणि त्या बोटांना बिचकत बिचकत त्याच कपाळपट्टीखालीं ब्रह्मेला संकटांत टाकणारा एक प्रश्न शतपावली करीत राहिला होता...आतां हा जानकीचा अंगारा सुमित्रेला पोहोंचवायचा तरी कसा—? ●●●

अनुक्रमणिका








--अरविंद ताटके

"ईश्वरानें राज्य घालविण्यास मला उत्पन्न केले, माझा काय इलाज आहे. राज्य गेले त्यांत लोकांचे मी काय नुकसान केले?" असें विनदिक्कतपणें म्हणणारा....

# दुसरे बाजीराव

पेशवाईचा इतिहास पाहिल्यास एक गोष्ट दिसून येते ती ही कीं, बहुतेक पेशवे अल्पायुषी निघाले. थोरले बाजीराव अन् नानासाहेब पेशवे चाळीशीच्या घरांतच निवर्तले. माधवराव, नारायणराव (याचा तर खूनच झाला) नि सवाई माधवराव या त्रिवर्गाचा अंतहि तरुणपणींच झाला. राघोबादादांचे चिरंजीव अन् थोरल्या बाजीरावांचे नातु (यांना उपहासानें रावबाजी म्हणतात) दुसरे बाजीराव यांनीं इंग्रजांच्या हातावर मराठेशाहीचे उदक सोडले, त्यांना मात्र दीर्घायुष्य लाभावें ही नियतीनें केलेली एक क्रूर थट्टाच होय.

दुसऱ्या बाजीरावाला स्वतःचा अमृतोत्सव करण्यापर्यंत आयुष्य लाभलें अन् तें त्यानें मोठ्या मिजाशीनें, रसिकतेनें अन् राज्य गेल्याबद्दल कसलाहि मनांत विषाद न बाळगतां भोगलें. ब्रह्मावर्तास् उर्वरित आयुष्य त्यानें चैनींत अन् स्वास्थ्यप्रियतेंत घालविलें. त्याचा बापाला—राघोबाला मिळालेलें पेशवेपद औटघटकेचे ठरलें. याची आई आनंदीबाई नारायणरावाच्या वधामुळें, बदनाम झाल्यानें दुःखानें होरपळून निघाली. पण याला कशाचेंच सोयर-सुतक नव्हते. याचे आजोबा, थोरले बाजीराव योद्धे अन् पराक्रमी म्हणून गाजले तर हा पळपुटा अन् प्रणयाराधनेंत सदा मशगुल होणारा वीर म्हणून गाजला. वयाचीं वीस वर्षे यानें उनाडकींत घालविलीं. पण याचें नशीब थोर म्हणून एकविशींत याला पेशवेपद लाभलें. वयाच्या त्रेचाळिसाव्या वर्षी मराठी राज्य इंग्रजांच्या स्वाधीन करून हा ब्रह्मावर्तास चालता झाला. बत्तीस-तेहेत्तीस वर्षें तिथें त्याच्या जीवनाला कसलाच धरबंद नव्हता. अन् मग १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाच्या सहा वर्षें अगोदर यानें इहलोकाचा निरोप घेतला. पंतप्रधान कसा नसावा याचें उत्तम उदाहरण म्हणजे याचें चरित्र. स्वतःच्या जबाबदारीची यत्किंचितहि फिकीर न करतां यानें सारें आयुष्य सुखोपभोगांत घालविलें, म्हणून याची कुणालाहि चीड येईल. पण पेशवाईची धुरा पेलण्यास तो किती नालायक होता, त्याचे पुरावे त्याच्या चरित्रांत जागोजागीं दिसून येतात. अन् म्हणून त्याचें सारे जीवन चीड आणणारे असलें तरी अत्यन्त चटकदार अन् मनोरंजक आहे यांत शंका नाहीं.

सवाई माधवरावाच्या कारकीर्दींत (स. १७७४–१७९५) पेशव्यांचे सरदार हरिपंत फडके राघोबाच्या हात धुवून पाठीस लागले त्यावेळीं त्याची आवडती बायको आनंदीबाई गरोदर होती. म्हणून त्यानें तिला धार येथें ठेवलें. तिथें १७ जानेवारी १७७५ रोजीं तिला जो मुलगा झाला तो दुसरा बाजीराव या नांवानें प्रख्याती पावला. शिवाजीचा जन्म अशाच परिस्थितींत शिवनेरीवर (स. १६३०) झाला होता. त्यानें स्वराज्य स्थापन केलें. धारला जन्म पावलेल्या या बाजीरावानें—नव्हे रावबाजीनें—या पेशवेकुलोत्पन्नानें, मात्र स्वराज्याला चूड लावली. याच्या जन्मासंबंधीं खरेशास्त्र्यांनीं आपल्या नाना फडनवीस चरित्रांत पुढीलप्रमाणें उद्गार काढलेले आहेत ते पाहण्यासारखे आहेत 'बाई...तिथे प्रसूत होऊन मराठी राज्य बुडविणारे दिवटे बाजीरावसाहेब जन्मास आले.' बाईनें नाना फडनवीसांकडे साखर पाठविली होती. ती साखर नानांस परिणामीं कडु लागली.

बाजीरावाच्या जन्मानंतर आठ वर्षांनीं राघोबादादा निवर्तले. (स. १७८३) त्याचें वास्तव्य तेव्हां कोपरगांवीं आनंदीबाई-












अनुक्रमणिका

जवळ होते. लहानपणापासून हा उनाडक्या करी. शिक्षणाची याला अजिबात आवड नव्हती. राघोपंत टोसर या गृहस्थांची याचे शिक्षक म्हणून नेमणूक झाली असली तरी हा त्यांना मुळींच जुमानीत नसे. त्यामुळें याच्या द्वाडपणाचा घोर आनंदीबाईला सतत लागलेला दिसून येतो. याच्या चौथ्या वर्षी यांच्याकडून राघोबाच्या कारभाऱ्याला आनंदीबाईनें पत्र लिहिलें त्यांत 'तिला लेक झाला तोहि असाच खोटा निघाला' असे निराशेचे उद्‌गार आढळतात. बारा-तेराव्या वर्षी याला काविळ झाली होती. त्या वयांतहि त्याची वर्तणूक फारशी चांगली नव्हती. याच सुमारास, 'बाजीराव आरबाचगिरी फार करतात, ऐकत नाहीं, हें काय जालें' व बाजीराव थोर झाले असतां, अद्यापि मर्यादेची तऱ्हा नाहीं. कालचर्येस काय म्हणावें.' असे उद्‌गार आनंदीबाईनें काढल्याचें पेशवे दप्तरांत (खंड ४) पहावयास सांपडतात. याचें लक्ष सदा खेळण्यांत. एकदां चातुर्मासांत यानें मौन धरलें. अर्थात आई फार रागावली पण यानें तिला मुळींच दाद दिली नाहीं. पेशवे दप्तराच्या चौथ्या खंडांत, 'बाजीराव यांचे पत्रिकेंत आहे कीं, याजवळ वडिलांचे वेळेचे कांहीं राहूं नये' असा उल्लेख एका पत्रांत आहे. दुर्दैवानें या पत्रांतला भावार्थ बाजीरावानें आपल्या कृत्यांनीं अखेरीस खरा केल्यानें त्याची प्रत्रिका करणाऱ्या ज्योतिषाची कुणीहि पाठ थोपटील.

आनंदीबाई लेकाचे (बाजीरावाचे) थेर पाहून नेहमीं तळतळते अन् मग ती उद्वेगानें म्हणते: 'बाजीराव फार खेळतात. यास कोणी जपत नाहीं. येथें कारभारी आहेत, यांतून कोणी जवळ आसावें तें नाहीं. . .मूल, शाहाणें होऊं नये, असें साऱ्यांस वाटतें' या तिच्या तळतळाटावरून लहानपणींच बाजीरावाच्या मनाचा वारा कसा वहात होता त्याची स्पष्ट कल्पना येते.

लहानपणच्या खोड्या एकवेळ क्षम्य मानतां येतील अगर त्याच्याकडे कानाडोळाहि करतां येईल. पण लहान वयांतच बाजीरावाची वासना फार तीव्र होती. तो पक्का स्त्रैण होता. त्याचें पहिलें लग्न अवघ्या अकराव्या वर्षी (स. १७८६) झालें. बायकोचें नांव भागिरथी. दोन वर्षे उलटलीं अन् मग एके दिवशीं त्यानें तिला एकांतात बोलावलें. त्यावेळीं त्याचें वय होतें तेरा अन् तिचें होतें नऊ. त्यावेळीं तिला रजोदर्शनहि झालेलें नव्हतें. तोंच तिच्यावर याचा जबरीचा गहजब. तशी ती म्हटली तर अगदीं पोर. पण याची विषयवासना याला स्वस्थ बसूं देईना. तेव्हां त्यानें तरी काय करावें ? असा प्रकार एक दोनदां झाल्यावर ही वार्ता आनंदीबाईला समजली. तेव्हां तिनें याची चांगलीच खरडपट्टी काढली. पण तेव्हां मिसरूड न फुटलेला बाजीराव तिला काय म्हणतो तें पहा. 'ती तुमची सवत आहे काय ?' अर्थात मग कहर झाला. अन् तिनें त्या आवेगांत या वासनामूर्तीला लाथाबुक्क्यांनीं चांगलेंच बदडून काढलें. परंतु बाजीराव पक्का निर्लज्ज होता. लहान वयांतल्या बायकोशीं समागम करण्याचा त्याचा एवढा हिय्या. मग बाहेर त्यानें किती पोरी खराब केल्या असतील अन् त्याचा बाहेरख्यालीपणा किती उतू गेला असेल त्याची कल्पना करणें कठीण आहे. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस राजघराण्यांतील मुलें कशी बहकलेलीं असत, त्यांची विषयवासना किती घाणेरडी असे अन् त्यांच्या छोकरेबाजीला किती बहर आलेला असें त्यांचें यथातथ्य वर्णन औंधकरांनीं आपल्या आत्मचरित्रांत केलें असल्यानें बालपणीं बाजीरावानें लहानपणी अनेक चाळे अन् ढंग केले असतील याबद्दल मुळींच आश्चर्य वाटावयास नको. अखेर व्हायचें तेंच झालें. अन् बालपणींच बाजीरावाला गरमीसारखा घाणेरडा रोग झाला. तेव्हाचें आनंदीबाईचें रुदन पाहून कुणासहि हळहळ वाटेल. ती म्हणते, 'बाजीराव यांस गर्मी झाली आहे; बायको थोर नाहीं हेंच बाधा फार आहे' परंतु, तिच्या या अरुण्यरुदनाला बाजीरावानें मुळींच भीक घातली नाहीं. शेवटीं परिणाम असा झाला कीं, त्याची पहिली बायको अवघ्या चवदाव्या वर्षी (स. १७९३) निधन पावली. बाजीरावाच्या पहिल्या पत्नीचा त्याच्या जबर कामवासनेमुळेंच मृत्यु लौकर ओढवला असें अनुमान निघतें. बायको गेली अन् मग वर्षभरांतच त्याला जरबेंत ठेवू पाहाणारी त्याची आई आनंदीबाईहि निवर्तली. (स. १७९४) तेव्हां मग त्याचें सारें जीवन निरंकुश झालें. त्यावेळीं त्याची उमर होती एकोणिस. मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात या म्हणीप्रमाणें त्याच्या चारित्र्याची पारख जाणत्यांना त्याच्या विशींतच झाली. आई-बाप निवर्तले, अन् मातृनिधनानंतर वर्षानेच सवाई माधवरावहि मृत्युमुखीं पडला. अर्थात पेशवेपदाची हांव बाजीरावाच्या मनांत उत्पन्न झाली. येथेंच त्याचें बालपण संपलें नि मग त्याच्या जीवनाच्या दुसऱ्या पर्वाचा प्रारंभ झाला.



अनुक्रमणिका



# आम्ही
# अंतरीची ज्योत
# सतत प्रज्वलित ठेऊं!

भरभराटीचा काळ असो अगर संकट काळ असो भारतीय रेल्वे निस्वार्थ सेवेची ज्योत सतत प्रज्वलित ठेवील. प्रवासी, माल, त्याचप्रमाणें देशची भरभराट व स्वातंत्र्य या शाठीं आवश्यक असणाऱ्या गरजेच्या वस्तू यांची वाहतूक अविरतपणें करून राष्ट्राचा जीवन प्रवाह अखंडित राखील.

यंदाचे दिपावली निमित्तानें आम्ही आमच्या आश्रयदात्यांचे सहकार्यानें भविष्य काळांत आमच्या समोर असलेले भव्य उद्दिष्ट सर्वकषपणें साध्य करूं अशी प्रतिज्ञा पुनश्च करीत आहोंत.

मध्य
व
पश्चिम
रेल्वे द्वारा
प्रसारित



दुसऱ्या बाजीरावाचें वर्णन खरेशास्त्र्यांनीं आपल्या नाना फडनवीस चरित्रांत पुढीलप्रमाणें केलें आहे: 'बाजीराव हा रुपानें बहुत सुंदर असून त्याचें भाषण तर असें मोहक असें कीं, जेणें करून मनुष्य कितीहि शहाणा व सावध असला तरी त्यास भूल पडावी! या खेरीज त्याच्या अंगात नांव घेण्यासारखा एकहि सद्गुण नव्हता. दुर्गुण मात्र इतके होते कीं, त्याचें वर्णन करायचें तर त्याचा एक स्वतंत्र मोठाच ग्रंथ होईल.' पुढें नानासारख्या मुत्सद्यालाहि बगलेंत मारून बाजीरावानें पेशवेपद कसें मिळविलें तें पाहातां शास्त्रीबुवांनीं केलेलें त्याचें वर्णन अगदीं खरें वाटते. त्याचे चरित्र सांगण्यास खऱ्यांच्या वरील उद्गारांची चांगली मदत होते. खरेशास्त्र्यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहाच्या खंडा-तल्या (खंड नववा) एका पत्रांत बाजीरावाचें वर्णन पुढीलप्रमाणें आढळतें: 'श्रीमंतांचें शरीरसामर्थ्य चांगले आहे. गोरे फार नाहींत परंतु नाकडोळे चांगले आहेत. वित्पन्न आहेत. बोलणें फार पाहिजे. . . धर्माविषयीं वासना बहुत आहे. कृपणपणा अगदीं नाहीं.' बाजीराव पेशवेपदावर येण्यापूर्वी त्याच्या रुपाची अन् गुणांची दवंडी त्याच्या भक्तांनीं वरीलप्रमाणें पिटून ठेविली होती. अन् म्हणूनच होनाजी बाळ शाहीरानें त्याच्यासंबंधीं पुढील थाप डफावर मारून ठेवलेली आढळते :

'बालार्क तेज पसरलें। सवाई बाजीराव धर्मरूप गादीवर बैसले।
ऐश्वर गळा साजती। पाहून शत्रु लाजती। जयवाद्य नित्य वाजती।
धार्मिक निती गर्जती। किर्ती या मंडळांत, विसले जीवनी।'

मराठेशाहीचा एक बुरुज महादजी शिंदे १२ फेब्रुवारी १७९४ रोजीं मृत्यु पावला. सवाई माधवरावाचा एक हातच जणुं तुटून पडला. पुढील वर्षी २५ डिसेंबर १७९५ रोजीं रविवारी सवाई माधवरावानें दिवाणखान्यांतून खाली उडी घेतली अन् त्यामुळें त्याचा मृत्यु ओढवला. या प्रसंगाचें प्रभाकर शाहीरकृत हृदयस्पर्शी वर्णन पहाण्यासारखें आहे ते असे : 'उजाडतां द्वादशीस कुणीकुन कुबुद्धि संचरली! तिसरे मजल्यावरुनि घातली उडि कारंज्यावरी! एकाकीं, हालचाल न होतां वार्ता दुसरी! . . . . . रवि मावळतां वरी मरण झडकरी आलें सखयाला! इथुन आतां प्रारंभ दिसंदिस अद्भुत प्रलयाला!!'

सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर प्रलय सुरू झाला ही प्रभाकर शाहीराची वाणी अगदीं खरी ठरली. कारण तियपासूनच बाजी-रावाचे पेशवाई बळकाविण्याचे प्रयत्न सुरूं झाले. या सुमारास बाजीराव जुन्नरास नजरकैदेत होता. आनंदीबाईच्या निधनानंतर त्याला बंदोबस्तांत ठेवणें भाग आहे असें वाटल्यावरून नाना फड-नवीसानें त्याला जुन्नरास आणून नजरकैदेंत ठेविले. खर्ड्याची लढाई तेव्हां चालू होती. (११-३-१७९५) त्यावेळीं नानानें त्यांस पत्र लिहिलें तें असें: 'तुमची पुढील व्यवस्था स्वारी आटोपल्यावर लावून देऊं' पण बाजीरावाच्या मनाप्रमाणें व्यवस्था नानाकडून न लागल्यानें त्यानें सवाई माधवरावाशीं गुप्त पत्रव्यवहार सुरूं केला पण तो नानानें पकडला. पण पुढें अनेक कारस्थानें करून त्यानें नानांना पेचांत आणण्यास कमी केले नाहीं. तरीहि नानांच्या मसलतीस अखेरीस यश येऊन त्यांनीं बाजीरावाचा धाकटा भाऊ चिमाजीअप्पा यास २ जून १७९६ रोजीं पेशवाईचीं वस्त्रें दिली. तेव्हां दौलतराव शिंद्याच्या मदतीनें बाजीरावानें पेशवाई मिळविण्याची खटपट चालूं केली. नंतर नाना व बाजीराव यांच्यात दिलजमाई झाली. अन् त्याचें पर्यवसान ५ डिसेंबर १७९६ रोजीं बाजीरावास पेशवेपद देण्यांत झालें. अखेरीस गंगेत घोडे न्हाले. अन् राघो-बाचा बदफैली मुलगा बाजीराव पेशवा झाला अन् तेव्हांपासून मराठ्यांच्या साम्राज्याचा अस्त होण्यास सुरुवात झाली.

नानानें बाजीरावाला पेशवेपदाची वस्त्रें दिली त्यावेळीं ३१ डिसेंबर १७९६ रोजीं त्यानें त्यांस पत्रानें कांहीं सूचना दिल्या होत्या. पारसनिसांच्या 'इतिहाससंग्रह' मासिकांत हें पत्र छापलें आहे. त्यांतली महत्वाचीं कलमें—सूचना पुढीलप्रमाणें आहेत.

**(१) कैलासवासी नानासाहेब व रावसाहेबपण अंगी आणून त्या दृष्टीनें दौलतींतील लहान मोठ्याकडे पाहून, ज्याचे त्यापरी योग्यतेनुरूप लोभानें चालावें. (२) सांप्रदायाशिवाय ज्यास्त खर्च व रवाजगत खर्च निराळा असें होऊं नये. (३) कोण-तेहि गोष्टीचा संशय येऊं नये. कोणी सांगितल्यास ऐकूं नये. . . . घरांतील गोष्ट बाहेर जाऊं नये. गेल्यानें दौलतीचे कामांत व दाबांत कमी पडून उपहास होतो. खावंदाचे दाबावर दौलतीचे काम करावें लागतें. यास्तव कोणतेही कामास आंतून फूस व गुढघा नसावा. येणेंकडून कारभारी यांचा दाब राहात नाहीं. सर-कारकामास उणे पडतें. (४) हरकोणावर कारणानुरूप रोष व कृपा करणें त्याचा विचार आधीं कारभारी यांशीं होऊन ठरेल तसे होत असावें. राजकारण व कागदपत्र व निरोप परभारें कोणास जाऊं नये. लौकिकांत फूट दिसते. हलक्या माणसांचा सहवास नसावा. येणेंकडून मनांत विपर्यास येणार नाहीं. योग्यता पाहून ज्यासीं जितकें काम तितकेंच बोलावें. कोणतेहि कामाची जलदी नसावी. समजोन उमजोन होत असावें. गैरवांका होऊं नये. . . . सदरहू प्रमाणें धन्यांनी व कारभारी यांनीं वर्तणूक करावी. येणेंकडून दौलतीचा दाब व बंदोबस्त राहून काम चांगलें चालेल."**

यांतील विचार व सूचना विवेक राखून बाजीरावानें अंमलांत आणल्या असत्या तर राज्य घालविण्याचा प्रसंग त्याच्यावर येता ना?

चार वर्षांनीं १३ मार्च १८०० रोजीं नाना फडनवीसाच्या निधनानंतर बाजीरावाच्या मनःपत कारभारास ऊत आला. अन-

मग शेवटीं आपल्या नादानपणानें मराठी राज्यास ३ जून १८१८ रोजीं भडाग्नि देऊन त्यानें ब्रह्मावर्ताचा रस्ता धरला. बावीस वर्षांतल्या त्याच्या पेशवेपदाच्या कारकीर्दीची हकिगत सांगण्यांत स्वारस्य नाहीं. कारण तो इतिहास त्याच्या दुर्लौकिकानें भरलेला आहे. तेव्हां त्याच्या व्यक्तिरेखेंत त्याची गरज नाहीं अन् तो सारा इतिहास सांगायचा तर तो स्वतंत्र ग्रंथच होईल. त्याच्या समकालीन व्यक्तींनीं त्याच्या संबंधीं व्यक्त केलेले अभिप्राय अन् सांगितलेली त्याची दिनचर्या पाहिली कीं, त्याच्या कारभाराची स्पष्ट कल्पना येते. म्हणून त्यासंबंधीं आवश्यक अन् उपलब्ध माहिती सांगणें उचित होय.

लोकहितवादींनी (गोपाळ हरी देशमुख) आपल्या ऐतिहासिक गोष्टींत (भाग १ ला, १८९२) बाजीरावाची दिनचर्या पुढीलप्रमाणें सांगितली आहे : "तो शनिवारवाड्यांत कधीं रहात नसे. कारण, कांहीं लोकांनीं त्याचे मनांत अशी जबरदस्त भीति भरविली होती कीं, 'नारायणराव मारले ते तेथें समंध होऊन फिरत असतात' व याजकरितां त्यानें तो वाडा अगदीं वर्ज केला होता......वाड्यांत दोन तीनशें बायका नित्य न्हावयास येत. त्यांनीं सकाळीं न्हावयाचा समारंभ करावा, तो प्रहर दिवसपर्यंत चाले! नंतर जेवायची तयारी झाल्यावर इच्छेस येईल त्या वाड्यांत बाजीरावाची स्वारी जात असे. पंक्ति भोजनाचे समयीं सर्वकाळ बायका जवळ बसलेल्या असावयाच्या. आश्रित लोकांनीं चार-चार पांच-पांच लग्नें करून घरीं एक बायको ठेवावी आणि सरकारवाड्यांत बाकीच्या बायका पाठवाव्या! आणि याजकरितांच अन्यावा राहतेकर वगैरे यांनीं जास्त लग्नें केलीं! जो गृहस्थ वाड्यांत बायको पाठविणार नाहीं त्याजवर श्रीमंतांची इतराजी व्हावयाची! यामुळें अब्रुदार गृहस्थांनीं वाड्यांत जाण्याचे सोडिलें.......वयाताई दातारीण, शिता शेंडी, काशी दीक्षितीण, उमा फडकीण, ताई पेठीण या प्रकारच्या सुमारें दोनचारशें उनाड बायकांचा थवा नेहमीं वाड्यांत भरलेला असे. तितक्यांचें शृंगार, दागिने आणि सोंगट्या वगैरे गोंधळ घालून त्यांत श्रीमंतांनीं काळ काढावा. शिप्ये, पाणके, वगैरेशीं व्यभिचाराची त्यांस परवानगी असे. ...याप्रमाणें रावबाजींच्या कारकीर्दीत सर्व गृहस्थांचीं घरें खराब झालीं.....एकंदर राज्यकारभाराच्या नांवानें शून्य! फार तर काय? पण दौतलेखणीहि वाड्यांत मिळावयाची नाहीं. बायकांचे हातून सर्व कारभार चालावयाचा.........बाजीरावाची तारीफ करणारे व त्यास कृष्णावतार म्हणणारेहि बहुत होते..........'असा प्रभु होणार नाहीं, त्याची गोष्ट काय सांगावी? तो केवळ कृष्णावतार होता; तो पुन्हां लौकरच येईल' या भ्रांतीत काळ काढीत होते या वर्णनावरून बाजीरावाच्या कारकीर्दीची अन् त्याच्या अनाचाराची चांगली कल्पना येते.

लोकहितवादींनीं केलेलें वरील वर्णन बऱ्याच वर्षांनंतरचें आहे. पण गोडबोलेकृत एल्फिन्स्टन चरित्रांत (स. १९११, पूर्वार्ध) पुण्याचा रेसिडेन्ट (स. १८११-१८१७) माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यानें केलेलें बाजीरावाचे यथातथ्य वर्णन पुढीलप्रमाणें आहे : 'स्नान संध्यादिक कर्मांत त्यांचा जेवढा वेळ जातो तेवढा शिवाय करून, बाकीचा सारा अनाचाराच्या, लाजिरवाण्या गोष्टी करण्यांत जातो. ते बाहेर मोठा सोंवळेपणा दाखवितात परंतु खुषमस्करी मंडळी आणि निर्लज्ज बायका ह्यांत बसून प्रहर सहा घटिका घालविल्यावांचून त्यांचा दिवस जात नाहीं. ज्या मंडळींत जो बीभत्सपणा आणि व्यभिचाराचा अत्यंत निंद्य प्रकार चालतो तो उच्चारहं सुद्धां नये इतका घाणेरडा असतो. हे राजश्री तो पाहून आनंदांत निमग्न होत असतात. ह्या मंडळींत येणाऱ्या बायका पुष्कळ आणि बहुधा थोरथोरांच्या असतात. जे सरदार आपल्या बायका वाड्यांत पाठवीत नाहींत त्यांवर श्रीमंतांची अवकृपा होते.' एल्फिन्स्टनसारख्या समकालीन व्यक्तीनें केलेल्या रावबाजीच्या वर्णनावरून त्याचें चारित्र्य समजून येतें. पण हे कांहींच नाहीं. तात्यासाहेब केळकरांच्या 'मराठे व इंग्रज' ग्रंथात बाजीरावाचे मनोरंजक वर्णन पुढीलप्रमाणें आलें आहे: 'माहुलीच्या वाड्यांत एका आवडत्या स्त्रीस पुरुषाचा पोशाख व जवाहीर घालून गादीवर बसवून स्वतः खिजमतगार होऊन तिच्यावर चवरी वारण्याचा आंबटशौकी खेळ श्रीमंत खेळले' या वर्णनावरून रावबाजीचा अधःपात समजून येतो.

ऑर्थर वेलस्लीनें (नेपोलियनचा पराभव करणारा, व ड्यूक ऑफ वेलिंग्टन या नांवानें प्रख्याती पावलेला वीर) बाजीरावाबद्दल मार्मिक अभिप्राय प्रकट केला आहे तो असा : 'बाजीरावाला कशाची चाड नाहीं. खासगी संबंधांत तर त्याजकडून लोकांचा भयंकर छळ होतो. त्याच्या रक्षणास असलेलें ब्रिटिश लष्कर काढून घ्या, म्हणजे त्यास राज्य नाहीं कीं प्रजा नाहीं. त्याची हाव काय ती एकच. विषयवासना भागविण्यास भरपूर पैसा जवळ असावा आणि ज्यांना तो बंडखोर समजतो त्यांस इंग्रजांनीं पकडून आपले हवालीं करावें, म्हणजे मग हे, राजश्री त्यांजवर आपला सूड उगविणार' या सर्व वर्णनांवरून रावबाजीची मूर्ती आपल्यापुढें ठसठशीतपणें उभी राहते अन् मग त्याच्या हातून राज्य कां गेलें त्याचा अदमास लागतो.

**युद्धबंदीसह ब्लॅकआऊट झालाच पाहिजे!**

सुगृहिणी



कित्येक वर्षांनीं हे 'वेळेवारी' घरीं येऊं लागले होते. पाकिस्तान्यांना मेल्यांना प्रेम माया नाहींच!

## गाण्याची सावली

गाण्याची सावली पडावी
तसा अंधार अ.पल्याशी धुंद
लवलवणाऱ्या जिभेचे मुकेपण
तसा थोडासा उजेड विद्धमंद.
झाडे जरा दूर दूर बहिऱ्या वाऱ्यांच्या
दगडाला अडणारी प चोळचाची हुरहूर
तुटलेल्या सतारीतून उडतात कावळे
तेवढे उभे हे मनीचे काहूर ।। १ ।।
गाण्याची सावली पडावी
तसे कंठरुद्ध तळे
अशब्दागत अर्थमंथर लहर
क.ठाचे काठापाशीच शिळे सूर
(जसा मी माझ्याजवळ ! जवळ असल्यासारखा )
गंधाच्या थडग्याभवती फेर धरणाऱ्या
आठवणींचे ऐक वाढते--वाढते वर्तुळ ।। २ ।।
गाण्यांच्या सावलीत
रात्रीच्या काठी
सून्न ओठी रामनाम दिलाशासाठीं
शब्दांत भरते उगम–कोरडी रेती
झडतात गारगोट्या माझ्या पोकळीत
तेथूनच निघते एकेक शून्य
गाण्याची सावली होते तेव्हां
थोडीशी जखमी थोडीशी धन्य ! ।। ३ ।।

–मधुकर केचे

बाजीरावाच्या बरोबर आणखी इसमाचें नांव पुढें येतें. त्याचें नांव त्रिंबकजी डेंगळे. अलीकडे आपल्या 'झेप' कांदवरीत कांदवरीकारांनीं त्याच्या कर्तृत्वाचे पोवाडे गायल्यामुळें तो एखादा जबरदस्त सरदार अगर मुत्सद्दी होता अशी कल्पना रुढ होऊं लागलेली दिसते. कांदवरीत त्याची व्यक्तिरेखा ठीक असली तरी तो नाना फडनवीसाप्रमाणें मुत्सद्दी अगर महादजी शिंद्याप्रमाणें खरा शिपायीगडीहि नव्हता ही गोष्ट सांगितली पाहिजे. तसा तो असता तरी बाजीराव एवढा घसरता ना ! असो. राज्यनाशास बाजीरावाप्रमाणें तोहि कारणीभूत असल्यानें त्याच्यासंबंधींची मतें सांगणेहि इष्ट वाटतें.

एल्फिन्स्टन त्र्यंबकजीबद्दल म्हणतो : 'येवढ्या थोरल्या पदावर विराजमान होण्याला तो खरोखर अगदीं अयोग्य मनुष्य आहे. तो आधीं अक्षरशत्रु आहे. वाचावयाला सुद्धां शिकलेला नाहीं. त्याची रीतभात, समज अक्कल वगैरे तो ज्या वर्गातला आहे, त्यातल्या इतर माणसाप्रमाणें आहे. हिंदुस्थान देशाची स्थिति काय, त्यांचे राज्य केवढें, त्यांचा आणि इंग्रज सरकारचा जो तहनामा झालेला आहे वगैरे गोष्टींची त्याला कांहीं एक माहिती नाहीं.' त्र्यंबकजी डेंगळे अक्षरशत्रु होता असें एल्फिन्स्टन म्हणतो. हें तेवढें विधान वादग्रस्त असून त्याचा बाकीचा अभिप्राय बरोबर वाटतो. त्र्यंबकजीचें हें वर्णन इंग्लिश माणसानें म्हणजे पर्यायानें शत्रूपक्षाचें, म्हणून हवें तर बाजूस ठेवूं. तात्यासाहेब केळकरांनीं आपल्या 'मराठे व इंग्रज' ग्रंथात त्र्यंबकजी डेंगळयाबद्दल पुढील उद्‌गार काढले आहेत : 'बाजीरावास पुष्कळ कुटिल मंत्री होते पण त्या सर्वांत त्रिंबकजी डेंगळा हा श्रेष्ठ होता. वास्तविक त्र्यंबकजी हा अत्यंत शूर, धाडसी, हजरजबाबी, कल्पक व कर्ता असा पुरुष होता. इंग्रजांचा वैराचा स्पर्श त्याला लागला नसता किंवा नाना फडनविससारख्या मुत्सद्याच्या पदरीं तो असता तर इतिहासांत त्याचें नांव झाले असतें. . . . . . .पण त्याची मिजास जरी पातशहाची होती तरी नांदणूक कैकाड्याची होती ! आधीं कुळ थोर नाहीं, त्यांतून स्वभाव तापट, कडक; न्यायान्यायाची क्षिती नाहीं; काय करावें काय न करावें याचा विवेक नाहीं; दरबारी हलकटपणाचें पुट अंगावर पुरें चढलेलें, त्यामुळें ब्राह्मण किंवा मराठे सरदार लोकांत मान नाहीं; असा प्रकार त्र्यंबकजीचा असल्यामुळें त्याच्या महत्वाकांक्षेस ऐश्वर्य मुळींच नव्हतें. खुपमस्कऱ्या किंवा अंतरंगातला सल्लागार म्हणजे नर्मसचिव या नात्याने बाजीरावाच्या मनावर त्यानें चांगलाच पगडा बसविला होता. तथापि त्र्यंबकजीच्याहि धाडसाला, 'डाक' घालील असा बाजीरावाचा नादानपणा असल्यामुळें त्या दोघांच्या जोडीपासून परस्परांचा नाश तर झालाच पण शिवाजी महाराजांनीं स्थापन केलेल्या मराठेशाहीचाहि झाला' बाजीरावाचा सर्वश्रेष्ठ कुटिक मंत्री अशी संभावना केळकरांनीं त्र्यंबकजी डेंगळ्याची केली आहे ती खोटी कशी मानावी ?

आतां रियासतकार सरदेसायांचा त्र्यंबकजीबद्दलचा अभिप्राय पाहूंया. ते म्हणतात : 'विद्येचा किंवा राजकारणाचा उच्च संस्कार त्याला नव्हता तरी खटपटी व तरतरीत वृत्तीमुळें बाजीरावाचें बरे वाईट हुकूम न्यायान्याय न पाहतां अंमलांत आणण्यास तो कचरणारा नव्हता. हजर जबाब, हिकमत, साहस व धोरण इत्यादि गुणांनीं बाजीरावाचा त्याजवर अत्यंत लोभ जडला, आणि त्याच्याच पायीं बाजीरावास आपल्या पदास मुकावें लागलें' अशा रीतीनें सरदेसायांनींहि मराठेशाहीच्या नाशास त्र्यंबकजीहि कारणीभूत होता असें म्हटलें आहे. त्र्यंबकजींत थोडेसे गुण होते तथापि त्याचे दोषहि अव्वल दर्जाचे असल्यानें बाजीरावाचें अन् राज्याचे तो रक्षण तर करूं शकला नाहींच पण त्याच्या राजकारणामुळें बाजीरावाचा अन् मराठी राज्याचा शेवट मात्र जवळ आला. त्र्यंबकजी मराठेशाहीच्या अखेरच्या अन् पडत्या काळांत बाजीरावाचा एकनिष्ठ अन् इमानी सेवक होता ही गोष्ट खरी पण त्याची खरी लायकी अन् स्वरुप कशा प्रकारचें होतें तें सांगण्यासाठीं एवढें उपलब्ध अन् अधिकारी व्यक्तींनीं त्याच्याबद्दलचे दिलेले अभिप्राय सांगणें जरुरीचें होते.

३ जून १८१८ रोजीं बाजीरावानें माल्कमला शरणचिठ्ठी लिहून दिल्यावर इंग्रजांनीं त्याला आठ लाखांचें वर्षासन नेमून दिले. नंतर त्यानें बनारसला रहावें अशी अटही त्याच्यावर घालण्यांत आली. पण त्यानें कानपूर नजिक असलेलें बिठूर हें गांव आपल्या वास्तव्यासाठीं पसंत केलें. या गांवास ब्रह्मावर्त असेंहि म्हणतात. १७ ऑगस्ट १८१८ रोजीं बाजीराव बिठूर येथें रहावयास आला. इथेंच त्याच्या जीवनाचें मध्य पर्व संपून उत्तर पर्वास प्रारंभ झाला.

[उत्तरार्ध डिसेंबर अंकांत वाचा]



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




**'ही बाई ह्या गांवात नको. हिची बदली व्हावी' म्हणून सरकारांत अर्ज गेला—त्यावर कृष्णा पाटलाची सही होती....'गांवाला हीच बाई हवी' म्हणून दुसराही एक अर्ज गेला....त्यावरही पाटलाची सही होती—वळसेदार ! पण कां ?....**

ग्रामपंचायतीची पहिली निवडणूक झाली—आणि कृष्णा पाटील सरपंच म्हणून निवडून आले...आतां गांवचा कारभार या पंचायतीच्या हातीं आला. विकासाच्या नाना योजना पाटलांच्या डोक्यांत घोळूं लागल्या. आपल्या मागासलेल्या गांवाची संपूर्ण सुधारणा करायची त्यांनीं मनावर घेतलें. त्याला आणखीहि एक कारण होतें....देवपूजेच्या वेळीं ताम्हनांत देव घ्यावेत तसं छोटसं दिसणाऱ्या या गांवचा एक सामान्य माणूस पार मिनिस्टर झाला होता....प्रत्यक्ष शास्त्रीजींच्या मांडीला मांडी लावून त्यांच्याशीं गप्पा मारत होता. प्रसंगीं तंटा करून आपली बाजू मांडत होता...व शास्त्रीही त्याला उत्तेजन देत होते. महिपतराव मोरे त्याचें नांव. अशा या भल्या आणि कर्तृत्ववान माणसानें स्वतःच्या गांवासाठीं खूप कांहीं करायचें ठरवलें होते...गांवकऱ्यांच्या समोर भाषण करतांना ह्या थोर माणसानें जाहीर वचन दिलें होते कीं, 'मी आपल्या गांवाची मुंबई करीन..आणि ती व्हायलाच पाहिजे आहे.' गांवकऱ्यांनीं फेटे उडवून त्यांच्या बोलण्याचें स्वागत केले होते. त्या "अनेकवचनी" माणसानें थोड्याफार प्रमाणांत ते खरेंही केलें होतें...शाळा काढली होती, कॉलेज काढले होते...जुने रस्ते तर नवे केलेच पण मुंबईहून थेट गांवांत आपलें विमान उतरायला छोटासा विमानरस्ताहि तयार केला...गांवकऱ्यांनीं तोंड भरून त्याला आशीर्वाद दिले होते.

आतां एवढ्या मोठ्या माणसानें गांवासाठीं इतक्या गोष्टी केल्या, तेहि भलेपणानें. मग पाटलांनीं त्यांच्या आवाक्यांतील तरी गोष्ट करायला नकोत कां ?

त्यांनींहि सुधारणा करायला सुरुवात केली. पाणी वाहून जायला गटारांची व्यवस्था केली. जागजागीं शोष खड्डे तयार करण्यांत आले...कंदिल...दिवाबत्तीची सोय झाली..गांवच्या विहीरींत महिन्याला जंतुनाशक औषधं पडूं लागलीं. एकेक सुधारणा चहुं अंगानें येऊं लागली. आणि गांव बदलूं लागलें. गांवानें कात टाकली.

एका मिटिंगला खुद्द महिपतरावांनीं पाटलांना विचारले,

"काय पाटलानू, आतां काय अडचन हाय तुमची ?"

एक अडचण पाटलांच्या मनांत लई दिवस डाचत होती... शिवाय ती अडचण दूर करण्याचें वचन महिपतराव मोऱ्यांनीं जाहीर सभेंत मागे दिले होते. त्याची आठवण करून द्यायचा पाटलांचा मानस होता. गुळमुळ करून ते म्हणाले,

"म्हटल्यास अडचन हाय, म्हटल्यास न्हा..."

"असं हुखान्यांत कां बोलतां...??"





अनुक्रमणिका

# डोकेदुखी

—पद्माकर गोवईकर

"शाळा झाली, दिवं लागलं हें समदं चांगलंच झालं..."

"मग आतां आणि काय व्हायला हवंय ?"

"गावाला येक हास्पिटल व्हायाला पायजेल वघा. लई आवदा हुती या..."

मिनिष्टरास्नी आठवण झाली. त्यांची म्हातारी आई वेळेवर औषधपाणी मिळालं नाहीं म्हणून दोन वर्षांमागं वारली..गांवांत तिच्या नावानें एक हॉस्पिटल बांधायचें वचन तेव्हांच त्यांनीं दिलें होतें.

पाटील बोलतच होते,

"येक चौर खाटांचं कां होईना इस्पिताल व्हायला–पायजेल...'

"बांधु या की..." मिनिस्टर म्हणाले.

"कवा पन ते...आज मरा न् उद्यां बांधा व्हय ?"

पाटलाच्या विनोदावर सगळे हंसले, मिनिष्टर तर फारच हंसले....खूप हंसून झाल्यावर ते म्हणाले,

"गावाची तयारी हाय का ?"

"आता आनी कसली तयारी ? तयारीला काय कुस्त्या लावायच्यात काय ?"

"कुस्त्या न्हवं."

"मग काय ?"

"हेंच कीं...मी दहा हजार रुपये देतो..."

"दहा हजारानं काय चुना होनार ?"

"ऐका वाईच–"

"हं–"

"मी दहा हजार देतो. निम्मं सरकारचं पैसं आणि गांवकऱ्यांनीं श्रमदान करावं..."

पाटलाला पक्कं माहित होतं कीं, गांव लई हरामीचा.. खारुटीच्या अंगावरलं पट्टे काढून घेणारे लोक कापल्या बोटावर मुतायचे नाहींत. तरी त्यानें दाबून सांगितलं,

"श्रमदानन न कराय झालं काय? अवं, हिकडचीं दगडं तिकडं करायची...रामाचा शेतू हितल्याच मंडळींनीं बांधून दिला कीं...!"

"आं ?"

"आं न्हवं...पैसा दाखवा...श्रमदान आत्ता तय्यार..."

मिनिष्टरांनीं मान डोलावली. आपण गांव सोडल्यापासून लोकांत भलतीच प्रगति झाली असें वाटून ते फारच खूष झाले.... वसल्या बैठकीला त्यांनीं दहा हजाराचा चेक फाडून पाटलांच्या हातावर ठेवला. सरकारच्या पैशासाठीं स्वत: हातांनीं अर्ज लिहून त्यावर पाटलांची सही घेतली. आणि उठतां उठतां म्हणाले,

"....महिन्याभरांत कामाला जुपी हुईल...श्रमदानाची माणसं तयार ठेवा..."

"त्यांत कोंच तयार ठेवायचीत..काय करीक-चोवरे खायला घालायचं काय त्यास्नीं!"

मिनिष्टर मोटार उडवीत निघून गेले.

दुसरें दिवशीं कृष्णा पाटलांनीं गावकऱ्यांची सभा घेतली... आणि प्रगतीची योजना समजावून सांगितली–,

"महिपतराव सायवानी दहा हजार दिल्येत..निम्मे पैसे सरकार देनार हाय आनि निम्मे गांवकऱ्यांचे श्रम...आपनाला आता स्वातंत्र्य मिळालं हाय. सरकाराला हात देऊन आपली कामं करून घ्याला पायजेलात..."

सरपंच हे बोलत असतांना मागची मंडळी आपसांत बोलत होतीं.

"म्हायला, पाटलाची मूठ दाबली वाटतं काल महिपतनीं"

"ह्या हास्पिटलच्या कामात पाटील आपली माडी बांधनार वगा...."

"ह्याची घरं बांधायला आमाला पळीवनार व्हय ह्यो !"

"लेका, घरचं खाऊन गांवचं बांधायला जातोस व्हय ?"

"कोन मरायला टेकलंय तवा दवाखाणा बांधायचाय् ?"

मतामतांचा गलका वाढला तेव्हां पाटील उभे राहून ओरडले,

"आरं, चलपत्या, टोप्या...का हायरं ?"

"कुटं काय ?"

"मंग सभेचा खाटीकखाना का कराय लागलाय ?"

"...आन् कोन करतंय ?"

"मजी खाटीकखाना न्हाई होय? मंग काय मानळीबाजार ?"

"अवो पन कुनी केलाय ?"

"काय हाय त्ये उटून, हुभं न्हावून सांग की..."

"सांगनार सांगत्याल.."

"तूं येनार का न्हाई श्रमदानाला ?"

"कोन ? ...आपुन...? येऊं या की..."

"तूं र वान्या ?"

"मी काय तुमच्या भाईर हाय का ?"

"ह्ये आंत-भाईर नगं: येनार हायेस कां ?"

"मी मजी वगा.."

"हां..."

"काल धरनं मोट धरलीया..."

"आसं व्हय ?..चलपत्या तूं रं ?"

"पाटील....आइच्यान्...काल धरनं माजी पाठ धरलीया...."

"चन्हाना, तूं रं काय धरलंयस ?"

"म्यां काय धरल्यालं न्हाई...पन बघा...घरांत समदं गोतावळा जमलाय बघा..."



अनुक्रमणिका








"पाव्हणं आलं असत्याल !"

"व्हय्..."

"मंग तूं कशाचा येनार ?"

"न्हाई...मजी...वघा..."

"वघटलं समदं...तुजं काय येवल्या ?"

येवल्या कानांतला मळ चवीनें काढत होता...त्याचं नांव घेतल्या-बरोवर ते यडवाडलं...

"माजं कुटं काय ?" करीत उभं राहिलं...

"तुजं काय न्हवं...तूं येनार कां न्हाई ?"

"कुठं जायाचांय् ?"

"खुळचाऽऽ, शर्मदम्नाला येनार का न्हाई ?"

"आतां कुटं हाय आपल्याकडे येवडी शरम याला....?"

या गड्याला सारखी तिरकेच वोलायची संवय होती..त्याला परस्पर कुणीतरी झाडलें,

"अरं विनअक्कल्या, ती शरम न्हवं..

आणि मग वराच वेळ श्रम आणि शरम् यांतला फरक येव-ल्याला समजावून सांगण्यांत आला....येवल्याहि एवढा हुषार कीं, तासभराच्या अल्पमुदतीनंतर त्यानें फरक समजल्याचें जाहीर केले आणि वर,

"आमच्या वानं आमाला हे शिकवलं न्हाई..." असे म्हणून नकारहि दिला....

गांवातली वरीच थोर थोर मंडळी या फुकटच्या श्राद्धाला एकूण तयार नाहींत हें समजण्याइतकें पाटील हुषार होते....

पण तेहि त्या थोर लोकांतलेच पाटील होते. त्यांनीं शांतपणें निवाडा द्यायला सुरुवात केली.

"टोप्या–"

"जी...."

"सरकारांत त्वां अर्ज केलायस् न्हवं काय तगईसाठीं...."

"व्हय् व्हय्.."

"तुजं काम हुईत न्हाई..."

"आँ...?"

त्याचें आश्चर्य पुरें होण्याच्या आंत पाटलांनीं दुसरा निर्णय दिला..

"वाऱ्या—"

"जी..."

"त्वां खतासाठीं अर्ज केलायस..."

"व्हय...."

"सरकारकडचं खत संपल्यालं हाय..."

....पांचच मिनिटांत मंडळींच्या डोक्यांत प्रकाश पडला आणि 'वंदे मातरम्' ला उभं ऱ्हावं तसं उभं राहून सगळ्यांनीं एक सुरांत 'आमी शर्मदानाला तय्यार हाय...अशी शपथ घेतली

☆ ☆

कामाला सुरुवात झाली...गवंडी–सुतारांची धादल सुरू झाली. दगड, वाळूचे भुसकाट पडूं लागले. माती विटांचें ढीग लागले... लोखंडी गर्डर्स सळचा येऊन पसरल्या... गावानं कंबर कसली... आरडाओरडा करीत गांवकरी कामाला लागले आणि हां हां म्हणतां हॉस्पिटलची इमारत उठली...गावाला आनंद झाला, सरपंचांना अत्यानंद झाला... शहरगांवाकडच्या पुढाऱ्यांना फारच आनंद झाला. त्यांनीं वोलवून घेऊन सरपंचास्नी शाबासकी दिली. ते म्हणाले,

"भले कृष्णा पाटील, विनातक्रार श्रमदान करून तुमच्या गांवानें सहकार्याचा एक वस्तुपाठच दिला आहे."

जाहीर सभेंत पाटलाची पाठ थोपटली गेली... गांवकऱ्यांचे कौतुक केले गेले. त्यानिमित्तानें पुन्हा-भारताची स्वातंत्र्यानंतर सुधारणा, पंचवार्षिक योजना यांचे लचके तोडले गेले..हॉस्पिटलचें 'उद्घाटण' झाले... उगाचंच महात्मा गांधी आणि पं. नेहरूंचा जयजयकार झाला ....सभा संपली...

पंधरा दिवसांत काच्या, चमचे, चिमटे येऊन पडले... रंगीत पाण्याच्या उग्र वासाच्या वाटल्या येऊन पडल्या. औषधं कुटायची खलवत्ते आले...डॉक्टर, कम्पाउन्डर आणि नर्स यांच्याखेरीज सगळे येऊन पडले... दवाखान्याची दारें अजून लोकांस्नी उघडण्याची चिन्हें दिसेनात....

एक दिवस दुपारला धुरळा उडवीत, आवाज करीत मोटार स्टँडवर येऊन धडकली. दुपारी तीनचा सुमार होता...दिवस उतरत होता...तापलेले रस्ते निवत होते..स्टँडवरची माणसें दाटीवाटीनें पत्र्याच्या शेडमध्यें सांवलीला वसलीं होतीं.

गाडी थांवल्यावरोवर वसलेली माणसें गाडीकडे धांवली..दारापाशीं सांचून राहिली...उतरणारे उतरतां येईना म्हणून उतरेनात.. चढणारे ते उतरत नाहींत म्हणून चढेनात....नुसता गोंधळ झाला.










महा'भयंकर 'आशावादी'
चीन
युध्द नको
कच्छ हें लढाईचें
ठिकाण नव्हे
युध्दोन्माद
नको
पाकीस्तान
'युध्द
आमुचें
सुरु'
कायमचें ?
नवा
काळ
पत्रकार
टेबलो
करून करून भागले, चिंतनाला लागले
'आलमगीर'
(छाप विडी)


अनुक्रमणिका

आम्हाच पाहीजे

# मराठा गडी यशाचा (!) धनी

याने 'फ्री' अमुचा देश महाराष्ट्र हा....

बहु असोत सुंदर संपन्न की महा- प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा

हिमालय की चोटीपर

गगन भेदी गिरी विण अणु नच जिथे उ

मि. भट तुमाला दो रुपया वाडवला येते वरीस पासून

आकांक्षा पुढती जिथे गगन ठेंगणे

पाणी द्या नाही तर खुर्ची सोडा

तेथ अडे काय जलाशय- नदाविणे

अरे थांबा हनुमतराव

पौरुषासी 'अटक' गमे जेथ दुःसह

महाराष्ट्र गृहनिर्माण मंडळ

शिवाजी नगर

क. मुर्थी

जे. सिंग

सी. शाह

साला ये मराठी लोक आता आमच्या कॉलनीच्या शानमंदी पण बिगाड करू लागला काय ?

प्रासाद कशास जेथ हृदय मंदिरे

चोर बाजार

टॉकिज

हाऊस फुल्ल

रुपये का दस रुपया

रु 10

रत्ना वा मौक्तिके काही मुल्यमुली नरे

रूप पाहता लोचनी। सुख झाले हो साजणी॥

जीवनाचा आनंद लुटायचा असेल खूप तर आधी बसवून घ्या लूप.

रमणीची कूस जिथे नृमणी खनी ठरे



शुध्द तिथे शील हि उजळवी गृहा गृहा



पतुरंग चमूचेही शौर्य मावळे



दौडत चहुकडुनी जवे स्वार जेथले




विक्रम वैराग्य एक जागी नांदती



धर्मराजकारण समवेत चालती




गीत मराठ्यांचे श्रवणी मुखी असो




...चनी लेखनी ही मराठी गिरा दिसो




सतत महाराष्ट्र धर्म मर्म मनी वसो




देह पडो त्कारणी ही असे स्पृहा



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका







या कालव्यांतून कशी बशी सुटका करून घेत एक म्हातारा डॉक्टर, खाकी हाफ् पँट घातलेला एक काम्पौंडर आणि त्यांच्यामागोमाग फुल् ज्वानीनं भरलेली एक नर्स खाली उतरली....स्टँडवरून बाहेरच्या रस्त्याला लागली.

वातमी गांवभर पसरली.. डॉक्टर आणि काम्पौंडरचें कुणाला विशेष वाटलें नाहीं. पण मालाशिंहावाणी गच्च भरलेल्या नरसंविषयीं लोकांत फारच चर्चा झाली...घराघरांत तोच विषय सुरू झाला...बायका तोंडाला पदर आणि म्हातारी माणसें चिलीम लावून तिचा आस्वाद घेऊं लागलीं....तरण्या पोरांनी तर कहरच केला. शाळा–तालमी, आपापले उद्योगधंदे सोडून सगळीं कार्टीं हॉस्पिटलभोंवतीं फेऱ्या घालूं लागलीं. घिरट्या घालतां घालतां पिंजऱ्यांत ठेवलेलें जनावर बघावं तशी कांचेच्या तावदानांतून आंत काम करणाऱ्या नर्सकडे पाहात होती....ती बाई आंत कामांत असायची. इकडून तिकडे हिंडत असायची .... तिकडून हिकडं आली.....की तिकडची पोरं,

"....अरं, गेली गेली....ती बग ती बग...." करीत ह्या अंगाला यायची... आणि इकडून तिकडे गेली कीं इकडची पोरें अगदीं तसेंच म्हणत पलिकडे पळायची...एक क्रेझ लागल्यागत पोरें पळापळ करीत होती...अगदींच कुणी हटकलें तर बाजूला होत होती. बुजार आवाजांत एकमेकांना सांगत होती,

"लई देखणी हाय..."

"देखणी ? खुळ्या, मंलमा हाय, मलमा..."

"मालाशिन्हा हाय..."

"हयॅ: लई मजा ईऽल..."

"लेका, शाळा कवावी घावल....ह्यो शिणिमा घावल कां फिरून ?"

पोरांनी हा असा दंगा घातला होता...थोरांचे निराळेच. कैंक धडधाकट माणसास्नी एकाएक मोठमोठे रोग झाले...कधी नव्हे जें गांव चांगल्या चांगल्या रोगानीं भारून गेलें. हॉस्पिटलच्या चार खाटांवर नंबर लागाय लागले...बघायला आलेला माणूस आजाऱ्याला सांगायचा,

"लेका, बास कीं छेन दिस आजार तुजा. मला बाईच पडूं दे कीं आजारी. . . . "

असं म्हणून दोन दिवसांनीं दुसरा गडी खाटेवर यायचा.. त्या मर्दिनीच्या हातचें कडूझार औषध एक अमृत घेतल्यागत घ्यायचा. तिचा रेशमाचा हात गळ्या-पोटावरून फिरवून घ्यायचा...आणि मग मिटक्या मारत त्याचें वर्णन बाहेर करायचा––,

"लेका, कसला आजार ? तिचा हात पोटावरनं फिराय् लागला कीं, म्यां गरम व्हायाचो... तिला वाटायचं ह्यो तापानं फनुफनलाय्.."

ऐकणारी भुसकट पडेपर्यंत हंसायची... आणि हंसून हंसून दुसऱ्या दिवशीं आजारी पडायची...त्या मेनकेच्या हालचाली बघत खाटेवर पडून राहायची. आपसांत म्हणायची,

"आपला, हास्पीटल न्हवतं तवा रोगराई कमी होती...आतांच गावकऱ्यांची दुखनी कां वाढाय् लागली...?"

दुसरा त्याला परस्पर जामायचा...

"लेका, तुजं कां दुखायला लागलं ? पड की गप. ती बघ आली.. घे डोस्कं दावून तिच्याकडं..."

हॉस्पिटलांत वर्दळ वाढली. कुणाला अर्धशिशी झाली, कुणाला एकाएक पोटशूळ उठला, कुणाला भस्म्या रोग झाला. कामधंदा सोडून माणसं पटापट आजारीच पडूं लागली....सरपंचाला आपल्या श्रमाचं सार्थक झाल्यासारखं वाटलं...

हॉस्पीटलवर वर्दळ सुरू झाली खरी पण डॉक्टरपुढं कुणी जाइचना. जो येई तो नर्सपुढं जायचा. पैरण वर करायचा अणि म्हणायचा,

"तपासा..."

ती नटारंगी हंसायची आणि म्हणायची,

"तपासतात डॉक्टर... मी नुसती दवापाणी करते..."

मग आलेला माणूस एकाएकी धाडकन् खालीं पडायचा.. तिच्या पायावर कोसळायचा.. एकाएकीं त्याच्या पोटांत दुखायला लागायचं.. मग ती उचलून त्याला खाटेवर बसवायची.. आणि डॉक्टरला बोलवायची.. मग डॉक्टर यायचे तपासायचे... ह्या भानगडींत एक दोघं मेलीसुद्धां: पोट खरोखरी दुखण्यासाठीं कांहीं जणांनीं वाटेल ते पदार्थ खाल्ले...आणि कांहीं तरी विषबाधा होऊन दोन गडी मेले.... आतां मुद्दाम रोग आणण्याच्या प्रयत्नांत भलतेंच कांहीं केलं तर माणसें नाहीं कां दगावणार ? पण लोकांनीं तें समजून घेतलं नाहीं. त्यांनीं डॉक्टरलाच खुळचांत काढलं.. त्याच्या हाताला गुण नाहीं म्हणालं... हा प्रचार वाढला... इतका वाढला कीं, एक दिवस हे म्हातारे देशपांडे डॉक्टर शेजारच्या गांवाला व्हिजीटला गेले होते... ज्यांच्याकडे जायचे ती मंडळी फाट्यावर उतरून घ्यायला आली होती. त्यांतला एक जण सरळ एस्. टी.च्या पुढं आला आन् ड्रायव्हरला म्हणाला,

"हो. . . हो. . . हो... देसपांडे, डाकदर हाय कां गाडींत."

गडी एकदम पुढं आला म्हणून ड्रायव्हर चिडला, "कोन डॉक्टर ?"

"त्ये...वं... त्येच्या दवाखान्यांत मानूस नेलं कीं मरतयंच बघा... त्यो डागदर..."

"पर आत्तां तं मरत हुतास लेका..." ड्रायव्हर ओरडला...

---

**प्रकाशबंदी**




जन्मवेळ : ब्लॅक-आऊट



अनुक्रमणिका

देशपांडे डॉक्टर, फ्रंटसीटवरच बसले होते. त्यांनीं हा संवाद ऐकला... आपली कीर्ति ऐकली.. ते उठले आणि ड्रायव्हरला ओरडून म्हणाले, "घाला घाला... साल्याच्या अंगावर गाडी....दवाखान्यांत कशाला, मरूं दे हितंच..."

डॉक्टरांची कीर्ति अशी गावोंगांव होत होती... आणि नर्सबाई-कडेच माणसें तपासून घ्यायला येत होती..

गांवांत या गोष्टीचा बभ्रा झाला. विचार करण्याची पाळी आली. दोनचार प्रमुख मंडळी एक दिवस सरपंचाकडे आली आणि त्यांनीं प्रश्न केला....

"पाटील, हें गांव नासवायला तुमास्नी नेमलंय् काय ?"

पाटलांना कळेना, त्यांनी विचारले,

"काय तक्रार हाय सरळ सांगा..."

"सांगायचं काय... तुमास्नी दिसंना काय ?"

पाटील विचारांत पडले तसे रावसाहेब मोहिते म्हणाले,

"गांव नासवायला ही बाई आणून ठेवली व्हय ?"

"काय केलंय् तिनं ?

"आणि काय करायचं ठेवलंय्...?"

"मंजे ?"

"तुमी डोळंच झाकून बसला म्हना की हितं..."

"हॉस्पिटलाचं शाप वांगं झालंय्..." मोहित्यांना साथ देत टोप्या वाणी म्हणाला.

"ही मर्दिनी गांवांत आनायला दवाखाणा बांधला व्हय ?"

"अंग फुटंस्तंवर कष्ट केल की वो..."

"अवो, [redacted] वकायची पाळी आली ती..."

[redacted] म्हणाले, "तुमचा कांहींतरी गैरसमज झालाय्.." संतापानें आवाज चढवून मोहिते म्हणाले,

"ही नटारंगी बाई गावांत आणून ठेवली आन् आमचाच गैरसमज काढता व्हय ?"

मंडळी बाईवर भलतीच विघडलीं होती... त्यांचे तोंड आवरणे शक्य नव्हते. कुणीतरी तिच्या गुणाचे वर्णन करायला सुरुवात केली..

"अहो किस्ना पाटील, ह्या नरसंला औषध द्याला आणली का आणि कशाला ?"

"औषध द्यालाच कीं, आणि कशाला आणायची...!"

"रोग बरं व्हावं म्हणून हास्पिटलांत जायाचं कां? वाढावं म्हणून!"

"बरं व्हायलाच कीं !"

"अहो, हिनें रोगडा पाडलाय् गावांत...."

"आं ?"

"अँ न्हवं, हिला बघीतलं कीं माणसं धडाधड आजारी पडत्यात..."

"पोरं..थोरं..समद्यास्नी प्लेग झाल्यागत खाटेवर पडून राह्यलीत..."

"मंग ह्यांत तिची काय चूक ?" पाटील न समजून म्हणाले.

यावर सगळे हंसले.... हसू आवरून मोहिते म्हणाले,

"काय चूक ? अहो, शुद्ध चवचाल बाई हाय.. तोंडाला पावडर काय लावतीया... लचाक लचाक मान काय हलवती, एक बदक चालल्यागत रस्त्यानं चालतीया...गावांतली तरणी पोरं तिच्यावर नादावलीत"

"नादावलीत ? अवो, तिच्या हातची शेवा मिळावी म्हणून धडाधड आजाऱ्याची सोंगं घेत्यात—"

"काय सांगताय ?" पाटलांनीं हवकून विचारलें.

'आता काय सांगायचं पाटील... सांगू ने ती गोष्ट हाय."

"काय झालं ?"

"अहो, खुद्द आमचं पोरगं— विष्ण्या खुळं झालंय्...रात वगत न्हाई, दीस वगत न्हाई... जेवतंय् ते हास्पिटलच्या समोर जाऊन वसतंय्..."

पाटलांना एकूण प्रकार कळला. ते गंभीर झाले....विचार करून गांवकऱ्यांना ते म्हणाले,

"तुम्ही चला....मी वगतो जाऊन..."

"चला कुटं ? आन् जाताय् कुटं ?" मोहिते म्हणाले, "पहिली सही करा या अर्जावर...."

"कसला अर्ज ?" पाटील चमकले....

"त्या वाईच्या वदलीचा...संमद्या गांवकऱ्यांच्या सह्या आनल्यात. तुमची न्हायलीया.."

पाटलांनीं थोडा वेळ विचार केला. आणि मग सही केली... मोहित्यांनीं तो गांवकऱ्यांच्या आणि पाटलांच्या सहीचा अर्ज तावडतोव पोस्टांत टाकला. सरकारांत पाठवन दिला...वाईच्या वदलीचा अर्ज सरकारकडं रवाना झाला.

दुसरे दिवशीं दुपारीं पाटील कुणाला न सांगतासवरता हॉस्पिटलांत गेले... डॉक्टर परगांवीं गेले होते आणि काम्पाउंडर जेवायला गेला होता. हे त्यांना माहितच होतें. वाई कशी काय हाय वघायची म्हणून नेमकी वेळ साधून ते आले होते..

हॉस्पिटलांत नर्सवाई एकटीच होती.. खाटेवर कधी आजारी न पडणारा दत्तू पैलवान पोट दुखण्याचें निमित्त करून गडावडा ओरडत होता. वाई औषध लावून त्याचं पोट चोळत होती. दत्तूला फारच गंमत वाटत होती..आणि त्या गंमतीनें त्याचें पोट जास्तच दुखत होते..

वाकी पलीकडच्या खाटेवर तालमींतली एकदोघं पोरं पडली होतीं. दोघांच्याहि पोटांत आतां कळा यायला सुरुवात झाली होती...दत्तू पैलवान ताकदीनें भारी होता तेव्हां त्याचे पोट फार वेळ दुखणार... त्याचे थांवले की यांचे दुखणारच होते....

कृष्णा पाटील आंत गेले तसें नर्सवाई उठली. पाटलांच्या जवळ आली... पाटलानीं पाहिलें. वाई खरोखरीच देखणी होती. गावाला भुरळ पडेल अशी ती होतीच. रूप अति देखणें होते. रंग पिवळ्या गुलावागत होता... चेहऱ्यावर चंद्राची कळा होती...

पाटलांनीं आवंढा गिळला, नंतर तिनं विचारलं, "काय पाहिजे हो?"

"डागदर कुटं हायत ?"

"वाहेरगावीं गेलेत. काय पाहिजे.."

"अरारारा..."

"कुणी आजारी आहे कां ?"

त्या वाईनें एवढ्या आस्थेनें विचारल्यावर सांगायला नको कां ? पाटील म्हणाले,

"कोन कुटलं ? मीच हाय आजारी..."

"काय होतंय् ?"

"आयायायाया..." चौकशी केली तसें पाटलांचे दुखणें जास्तच वाढलें.

"काय होतंय...?"

"अ हा हा हा हा.. अवं दोन दीस झालं...डोस्कच दुखतंय् वगा.. सुंट लावली.. विववा घातला.. थांवनांच.

"थांवा वघूं..."

असे म्हणून त्या थोर वाईनें पाटलांना मेणकापड हातरलेल्या टेवलावर झोंपवलें.. खालवर तपासलें आणि औषध करायला लागली.

पाटील कण्हत कुथत तिच्याकडे बघत राहिले. औषधांत पाणी घालतां घालतां तिनें विचारलं,

"पाटील——"

"जी..."

"किती मुलं तुमाला ?"

"अँ? अगबयाबयाया.... मुलं कुटली वो !" पाटील कण्हत म्हणाले.

"म्हणजे ?"

"अवं म्यां वरमचारी हाय... लग्न झाल्यालं न्हाई माजं..."

"तरीच..."

"अगगगग.....कां वं ?"

"ही डोकेदुखी थांबणार नाहीं.."

"अहहाहाहाहाहा...आं ?"

"होय..."

"पन कां ?"

"अहो, तुमचं लग्न व्हायला पायजे...औषधानें डोकं थांबल, पण थोड्या वेळ तुम्हाला लग्नाच्या सुखाची जरुरी आहे..."

"मंजे...?"

या प्रश्नावर ती सुशील बाई फारच लाजली...आणि म्हणाली...

"बाईचं सुख मिळाल्याशिवाय ही डोकेदुखी थांबणार नाहीं..."

पाटील जास्तच कण्हले....

"अगगग ग...मंग आता वो ?"

"खरं सांगूं... राग नाहीं ना येणार ?"

"राग कशाचा, पन आतां कसं व्हायचं ?"

तिनें औषध तयार केलं आणि पाटलांच्या हातांत पेला देत ती सभ्य बाई हळू आवाजांत म्हणाली, "असं रडता कशाला ? मी आहे की....चला घरी..."

पाटलांनीं गडबडीनें औषध घेतले.. तिनेंहि इकडच्या बाटल्या तिकडे केल्या आणि भर उनाचं दोघ बाहेर पडले... संबंध रस्ताभर पाटलांचं डोकं दुखतच होतं. उन्हानें तें जास्तच भडकलें.. आड-रस्त्यानें दोघेहि भराभर चालत आले... नर्सबाईच्या घरांत आले- ती घरांत शिरली. पाठोपाठ पाटील आले आणि त्यांनीं मागें दार लावून घेतले..

दिवस मावळायला ते तिच्या घरांतून बाहेर पडले. बाहेर पडतात तों दारांतच दत्तू पैलवान हंसत उभा होता..पाटील चरकले आणि म्हणाले,

"दत्त्या भड्व्या, प्वॉट दुखत हुतं न्हवं कां तुजं ?"

"न्हाई..." दत्त्या हंसून म्हणालं...

"मगं ?"

"खरं तर माजं डोस्कंच दुखत हुतं... म्यां बोंबलून बाईला सांगतलं डोस्कं दुखतंय म्हणून... पर त्या प्वाटच चोळत राहिल्या. दोन रोज डोकंच दुखतंय बगा..."

पाटील समजले,

"अरं तुज्यायला——" म्हणून निघून गेले...दत्त्या डोस्कं दाबत नर्सबाईच्या घरांत शिरला——

आणि मग पुढें पंधरा दिवस सगळ्या तालमीतल्या पोरांची डोकीं दुखलीं. अपरंपार दुखली...दुखली, दुखली आणि पंधरा दिवसांनीं थांबलीं...

एके दिवशीं दत्त्यानें एक अर्ज तयार केला. "आम्हासनी हीच नर्स बाई पायजे. तिच्या हाताला गुन हाय...हीच बाई गावाला रहावी.. असे लिहून सरकारला अर्ज लिहिला. त्यावर सगळ्या तालमीतल्या पोरांच्या सह्या घेतल्या...दमदाटी देऊन पहिल्या अर्जावर ज्यांनी सह्या दिल्या होत्या त्यांच्याहि या अर्जावर घेतल्या... आणि बाईची बदली रद्द करणारा दुसरा अर्ज सरकारांत पाठवून दिला !

आणि याहि अर्जावर कृष्णा पाटलाची वळसेदार सही होती...!

• • •




# टोंचणी आणि टोंचण

—सिनिक्



**लिना** सोफ्यावर ओणव्यानें पडल्या पडल्या आधुनिक स्त्रियांच्या अद्यावत् जीवनाला वाहिलेले एक इंग्रजी पाक्षिक चाळत होती. सौंदर्यप्रसाधनांच्या जाहीरातींतील कोणत्याहि स्त्रीपेक्षां आपण नक्कीच सुरेख व सुरस आहोत हा विचार अद्यापि परका कां याचे कोडें उलगडत होती—

नीना कपाळावर, कानावर व डोळ्यावर हव्या त्याच केसांच्या बटा झेपाव्यात अशी खबरदारी घेत क्लिपा व पिना लावत होती. त्या बटामध्यें गुरफटून घायाळ होणाऱ्या नजरांचा वेध घेत होती—

मोना आरशापुढें ओठ रंगवतांना ओठांची उघडझांप करत होती. मिटल्या ओठांची कमळ-२-मणीयता पडताळून घेई. विलग-णाऱ्या ओठांत उमलणाऱ्या कळीचा प्रत्यय मिळे—

—लिनाचे पाक्षिक चाळणें संपले व तिनें आरशापुढे गुंगलेल्या मोनाकडे पाहत म्हटलें, 'मनोज खरेंच एल्व्हिस प्रिस्लेसारखा दिसतो. . . .' '—आणि गाणें पण अगदीं त्याच ठेक्यांत, तशाच तालांत व त्याच ऐटींत गुणगुणतो—' निनानं चित्र पूर्ण केलं. . . .

'अग् पण नक्की स्टेशनवर येतो म्हणाला ना ?'—मोना

'होय ग,— पण मला बाई त्याच्या आगाऊपणाची भीति वाटते—' लिना.

'त्याचा सडपातळ बांधा, त्याची घट्ट पॅट, टोंकदार लांबूळके बूट यानी पाहणाऱ्याचे लक्ष वेधते — मग तो अधिकच वाहवतो—' नीना.

'आपल्याला काय करायचंय त्याच्याशीं ? तो किती तत्परतेनं आपल्याला कंपनी देतो. आपल्या इच्छेवर नाचतो. आजच्या पहिल्या दिवसाच्या नव्या खेळाची तिकिटं नाहींतर कुणीं धड-पडून आणली असती ?' —मोना.

—त्या तिघींना स्टेशनवर आलेलं पाहताच मनोज हर्षला. 'My girls, you have come five minutes late. I lost a cute company in the last train —'

—इतक्यांत लोकल येते आणि मनोज आपल्याबरोबरच्या मित्राला या मुली चढल्याबरोबर आत ओढत म्हणतो, 'This is an age of action and speed, —साला, मागे राहिला असतास ना!'

—त्या पहिल्या वर्गामध्यें वाटेंत इतराबरोबर आणखीन् दोन तरुणी उभ्या असतात; आणि एक काळसर दणकट तरुण त्यांच्या-समोर उभा असतो. त्याचा पोषाखहि विचित्र असतो. फक्त पायांत लांबूळके बूट नसतात. दोन्हीं तरुणी फ्रॉकमध्यें असतात. सावळ्या रंगाच्या, उघड्या बाहूंच्या आणि रसरशीत पोटऱ्याच्या त्या पोरी उफाड्याच्या दिसतात. गालांत लालावलेल्या, ओठांत रंगलेल्या आणि काजळी डोळ्यांत भिरभिरलेल्या त्या तरुणींचे लक्ष चटकन् मनोजकडे जाते. मनोजला नजरेची ही पावती मिळताच तो त्या दोघींकडे अनिवारपणें ओढल्या गेलेल्या आपल्या दृष्टीचा पिछा करावयास सुरांना छेडतो 'My Dors, I love you. My marlyn I die for you '—मऊ गादी दबावी तसा तो कमरेंत लवून साभिनय एक पाय उडवत म्हणूं लागतो.' त्याचे शब्द लिना, नीना व मोना यांच्या लक्षांत येत नाहींत; पण लय त्यांच्या कानाला गुदगुल्या करते आणि त्या डोलूं लागतात. . . .

—उत्तेजित होऊन मनोज जोरांत गाऊं लागतो. त्याच्या नादां-तले शब्द जसें स्पष्ट ऐकूं येतात तसें त्या दोन तरुणींच्या ध्यानांत त्या ओळींचा रोख येतो. त्या तोंड वळवतात तसा मनोज आवाज उंचावून गाण्याला संगीताची जोड देण्याचा प्रयत्न करतो 'My Dors do not turn a back to love. My Marlyn do not take your eyes away from life —'

—लोकल गतीत असते. आवाजत असते. खडखडत असते. त्यांतहि एक लयकारी कानावर आदळते अनाहूतपणें. बसलेल्या माणसांच्या देहांत ती सुरी खुपसल्याप्रमाणें शिरत असते. त्यांतली कांहीं वाचत असतात आणि कांहीं पेंगत असतात आणि सारी मधून मधून 'नार गुलनार' समजून आपल्या नजरेंत सामावून घेत असतात. होय, पेंगणाऱ्यांचे डोळे जणुं याचे पान करण्याकरतां उघडतात. अर्थात् सारें जागच्या जागीं असते. फक्त तो काळसर








तरुणच लिना, नीना व मोना यांच्याजवळ सरकलेला असतो. लोकल चालूच असते. बारीक ध्वनि ऐकू येत नाहीं आणि मोनाला आपली ओढणी कुणीतरी ओढल्याचे जाणवते व तिला मनोजकडे धांव घ्यावी वाटते. परन्तु तो आतां फॉर्मात आलेला असतो. गाण्याच्या जोषांत तो त्या दोन तरुणींजवळ आलेला दिसतो . . .

—गाडी थांबते व इच्छित स्टेशन आलेले पाहताच ही मंडळी उतरूं लागतात. मोना लिनाच्या खांद्यावर हात देत त्या दोन तरुणींना घसटून उतरावें अशा उत्साही मोहानें पुढें सरसावत असतांना मनोजला तो काळसर तरुण दावतो 'Have the courtesy to let fairer sex get down first '—त्या दोन तरुणी फिदफिदतात. मनोज अपमानित होतो. व त्याच वेळेस लोकल सुटते. तो गडबडीनें उतरतो. लिना, नीना, मोना बाहेर थांबलेल्या दिसतात. त्या दोन तरुणी अजूनहि त्याच्याकडे हंसत हंसत वळून पाहतात व बाहेर पडतात——

—मनोजचे अपमानित मन आणखीन् डिवचले जाते. त्या दोन तरुणींची सपशेल जिरवण्याच्या तोऱ्यानें तो गद्य स्वरांत 'oh my Dors, oh my marlyn' त्याना उद्देशून म्हणतो. एव्हाना अदृश्य वाटलेला तो दणकट तरुण मनोजला आडवा येतो व दटावतो 'मिस्टर, mind your own business—'

—दोघांचे भरभर चालणें.

—जलद श्वास.

—भुवया वक्र.

'मिस्टर गाडीतला अगाऊपणा जाऊं दिला, —पण आता उगाच लुडबुड करूं नका—' त्या दोन तरुणींकडे व आपल्या मैत्रिणींकडे पाहत मनोज रुबाबांत म्हणतो.

'अरे, कुणाला दम भरतोस, —थोबाड फोडीन—'

'अस्सं, —बरं होऊन जाऊं दे—' मनोजच्या डोक्यांत 'ती हॅट, कमरेला पिस्तूल आणि मुष्ठि युद्ध' विरश्रीनें संचारूं लागते—, त्याच गरमींत तो त्या दणकट तरुणाला एक ठोसा लगावतो व विशेषतः त्या तरुणींकडे विजयाची झाक मारणारा एक कटाक्ष टाकतो—

—त्या दोन तरुणी घाईनें जवळच्या चर्चमध्यें शिरतांना दिसतात. त्याच्यांकडे ढुंकुनहि पाहत नाहींत—

—तोंच 'फाट् फट्' दोन चपराकी मनोजच्या कपोलावर बसतात. मनोज प्रति ठोसा देण्याच्या बेतात असतानांच 'ठाक ठक्' आणखीन् मारा होतो त्याच्यावर व तो झोकांड्या खात खात कोसळतो—तशा अवस्थेंत पाहतो, —लिना, नीना, मोना व त्याचा मित्र केव्हाच पसार झालेले असतात. तो काळसर, दणकट तरुणहि कोपऱ्यावर पोलिस असल्याचे पाहून एव्हांना पळालेला असतो. शेजारी मेणबत्त्या व क्रूसावरचा येशू विकणारी एक ख्रिश्चन मुलगी बसलेली त्याला आढळते. . . . . ख्रिस्ताच्या डोळ्यांतून गळालेली आंसवे तिला पण दिसत नाहीत. ती आंसवे ख्रिस्ताच्या जखमेवरून निथळत असल्याचेहि तिच्या लक्षांत येत नाहीं——

—ती अजून एकहि मेणबत्ती विकली गेली नाहीं याच चिंतेंत असते! ✵✵



—**असाच** कुणा मित्राबरोबर तो त्यांच्या घरीं आला. मिसरूड फुटलेला, तारुण्यांत पदार्पण केलेला. रसरशीत आरोग्य आणि पेटतें यौवन याने त्याच्या मूळच्या सावळ्या रंगाला एक लोभस कांति खुलवून होती. उंचीनें मध्यम आणि बांध्यानें सुदृढ असा हा ज्वानींत नुकताच शरीक झालेला तरुण मोठा प्रसन्न वदन होता. त्याचे लालसर ओठ विलगत तेव्हां शुभ्र दंतपंक्ति निरागस स्मिताचा बेमालूम आभास निर्माण करत. त्याचे मुलायम आणि काळेभोर मागे वळवलेले केस तेल न लावल्यानें किंचित् वाऱ्याच्या झुळकीनेंहि भुरभुरत तेव्हां हवेंहवेंसे वाटणारे लाघव विलसून जाई. निसर्गाचे बरेंच तालबद्ध 'मुखडे' लयींत समेवर आले होते आणि या तरुणाचा देह जणुं 'घडला' होता. पाहणाऱ्यानें नुसते पाहतच राहावे. . . . . . . . . . . . . .तरुणींना जायबंदी आणि विवाहेच्छु मुलींच्या पालकांची नजरबंदी करणारे त्याचे रूप . . . त्याला सारे कळे, दिसे आणि जाणवे पण एक प्रकारचा अवखळ बालीशपणा आणि वाढतेपणीची अबोध हुरहुर ही त्याला स्त्रियांच्या सान्निध्यांत लाजरेपणानें नतमस्तक करत. अशा अवस्थेंत पापण्यांच्या कठड्याला रेललेल्या बुजऱ्या बुबुळांत मग आपसांत चोरटेपणाच्या बाबतींत चुरस लागे—तो आणखीन् मोहक दिसे. नजरा खिळवून ठेवी. . . . . . .

—मालिनीबाईचे असेंच झाले. यजमान घरीं आलेल्या मित्राची व या तरुणाची ओळख करून देत असतानाच त्या हरवल्या. नुसत्या पाहतच राहिल्या.—सारें विसरून भरल्याडोळ्यांनीं त्याच्या रूपाचे आकंठपान करतांना एक डोळ्याखेरीज आपल्याला दुसरें इंद्रियच नाहीं अशा प्रत्ययानें त्यांचा तो अनाहूत अनुभव उजळला होता. पण क्षणभरच. . . .—लगेंच मालिनीबाईतील गृहिणी जागली "छे, काय हे? आपल्यासारख्या विवाहित स्त्रीनं परपुरुषाकडे असं पाहणं?—लक्षांत आलं तर काय वाटेल?"—आणि त्या पटकन् 'ही आता आलेच चहा घेऊन' म्हणत चपळाईनें सळसळत आंत गेल्या. त्यांच्या पाठमोऱ्या भरभर आंत गेलेल्या छबीकडे पाहत व डोळ्यांचा चष्मा पुसत तिचे यजमान आपल्या मित्राला म्हणाले, 'कुणाला वाटेल कां रे ही चार मुलांची आई आहे म्हणून?—'

इन्दुमति आपल्या मंदाचे केस विंचरत होती. तिला राहून राहून विचार पडत होता कीं, स्वतःचे केस मऊ असतांना लेकीचे केस इतके राठ कसे?

मंदाचे केस दाट होते आणि लहानपणी वरचेवर बॉब करत गेल्यामुळें आखूड होते इन्दुमतीचे काम इतके दिवस सोपे होते. विंचरणें झाले कीं, मुलीची 'पोनी टेल' बांधून ती मोकळी व्हायची. पण आज मंदाने दोन वेण्यांची फर्माईश केली—'अगदीं तुझ्यासारखी मधोमध पट्टी पडली पाहिजे आणि कानावर फुगेहि तसेंच—' ✵✵



—**इन्दुमति** क्षणभर कौतुकानें स्वतःशीच हंसली. तिला कांहीं-तरी आठवले केव्हापासून बरें ती स्वतः दोन वेण्या घालूं लागली? नक्की स्मरेना. पण भरपूर लांबसडक केसांची तिच्या आईनें जेव्हां समविभागणी केली तेव्हां आई उद्‍गारली होती, 'चल बाई, तुझी दृष्ट काढतें' —म्हणजे ? किती वर्षं झाली ? बत्तीस वर्षांची इन्दुमति पुढ्यांतल्या बारा वर्षांच्या मुलीच्या कुंतलाचे दोन पक्ष करत विचार करूं लागली—वीस वर्षं आपण दोन वेण्याच घालत आलो ? कंटाळा नाहीं आला ?—या प्रश्नचिन्हानें ती पुन्हां खुदकली. आता जें भूतकाळाच्या उदरांतून उदीत झाले ते गुदगुल्या करणारें होते. तिच्या प्रियकराला तिच्या नितंबावर वळवळणाऱ्या या दोन नागानींच प्रथम विद्ध केले होते. आज मितीसहि मुलें होऊन व पाऊसाळे सरूनहि तिचे लावण्य ओसरले नव्हते. आकर्षकपणा कायम होता. इतकें दिवस राहणींत व दिसण्यांत कांहीं कमी आहे हे परोक्ष अपरोक्ष जाणवले नव्हते. कुणी जाणवून दिले नव्हते.

—आता मात्र तिला एका अबोध अस्वस्थतेनं ग्रासलं. तसं आयुष्यक्रमांत सारंच सुरळित होतं. पण आता तिला वाटलं कीं, आपण खोलांत जाऊन मुळीं विचारच केला नाहीं. श्रीकांत आपल्याशी अप्रामाणिक झालेला नसला तरी 'तसं' कांहीं त्यानं आपल्याकडे बऱ्याच दिवसांत पाहिलं नाहीं. मागील अंकावरून जगणं पुढं चालूं आहे एवढंच. मुलांची काळजी, भविष्याची बेगमी आणि व्यवहाराची सतत जबाबदारी यांतच जीवनी आटोपत आहे......

—मंदानं 'लवकर आटप, शाळेला उशीर होतो' अशी कुरबुर केली तसं इन्दुमतीच्या लक्षांत आलं कीं, मंदाची आपण एकच वेणी पूर्ण केली आहे. इन्दुमतीनं मंदाला थोडं वळून बसायला सांगीतलं तेव्हा तिच्या लक्षांत आलं कीं, मंदा आतां चांगलीच वाढली तरी अजून आपल्याकडूनच वेणी घालून घेते. या विचारासरशी तिच्या मनानं भविष्याची झेंप घेतली. नजीकच्या काळांत मंदा वयांत येणार—आणि लोक म्हणणार 'मुलगी वयांत आली तरी आईला वाटतं कीं, आपण कॉलेज तरुणीच आहो—'

—मंदा स्नानगृहाकडे चालली तशी इन्दुमति तिला म्हणाली, 'गिजर नीट पाहून चालू कर हं—' आणि मंदा किंचित् चिडून म्हणाली 'रोज रोज तेच काय सांगतेस ग आई ?—मी कां आतां कुक्कुळबाळ आहे ?'—इन्दुमतीला तीव्रतेनं अनुभवास आलं कीं, गोष्टी गृहित धरून चालणार नाहींत——

मंदा शाळेला गेली. अजय बालक मंदिरांत गेला—आणि इन्दुमति क्षणभरच एकलेपणाच्या पोकळींत गुरफटली—लगेच पुढच्या कार्यक्रमाची वर्दी टकटकत्या घड्याळानं दिली व ती तयारीस लागली. आता तिचं मन कांहीं तेंच तेंच करावयास उत्साहित होईना. तिनं आपल्या केसांना वेण्यांच्या बंधनातून मुक्त करत म्हटले 'माफ करा हं, इतके दिवस तुमच्या अनंत वैभवाची मी कदर केली नाहीं—' तिनं रिंग व आकड्यांच्या सहाय्यानं अद्यावत केशभूषा केली.

—ज्या समारंभांत इन्दुमति गेली तिथें एक मैत्रिण सलगीनें म्हणाली 'नवऱ्याला बढती मिळाल्याबरोबर पाहता पाहता चांगल्याच फॅशनेबल झाला कीं, हो तुम्ही——'

—संध्याकाळीं जेव्हां श्रीकांत इन्दुमतिकडे टक टक पाहत राहिला तेव्हां तिनं म्हटलं 'असं कां ?' त्यावर श्रीकांत म्हणाला, 'आज कांहीं वेगळंच दिसतं; पण बरं वाटतं——' ●●●







अनुक्रमणिका









अनुक्रमणिका

[पृष्ठ १७ वरून–ही घरे, तीं घरे]

"चचला जन्या."

"आणि ?"

"म्हातारी होती"

"मग ?"

"गेल्या नारळीपौर्णिमेस आटोपली–"

"आणि इथल्या वापटाकडलीं—"

"म्हातारा होता परवापर्यंत ?"

"मेला ?"

"जवळ जवळ."

"म्हंजे ?"

"नागपुरला आहे—मुलाकडे–आर्धांगान् पडलाय्."

"वावणवापूंचें कुठलें रे ?"

"तें काय ? पडवी कोसळलीय तें—"

"त्याचें कोण ?"

"पोरगी नव्हती ?"

"कुठली ?"

"दाल्याचा हात धरून पळाली ती ?"

"सोनी काय रे ?"

"सोऽनीऽ!!–तीच. आतां असेल झेबुन्निसा–"

"आणि वावणवापू ?"

"आडाचा तळ गांठला ! काढला तेव्हां फुगला काय होता अचाट !"

आळींतल्या प्रत्येक घराचा असा तुटक पंचनामा चालला होता. त्या त्या घराचें भूत दात विचकीत उभें होतें त्या तिन्हीसांजेला ! ती घरांची भेसूर भुतावळ कधींहि विसरणार नाहीं मी ! असल्या घरांत गणपती वसत नाहीं–कोण्या कारणानें तें घर गजबजलें तर आंगांत आलेल्या माणसासारखें वाटतें. माणसं गेल्यावरचें त्या घराचें निपचित पडणें सहन नाहीं होत.

काय दशा होते एकेका घराची. दुर्भाग्यामुळेंच नव्हे भाग्ययोगानेंहि माणसें भाग्य नेईल तिथें जातात. घर एकटें सोडून. एखादी म्हातारी गोठ्यांतल्या गाईच्या किंवा देवघरांतल्या देवांच्या आशेनें चिकटते. होईल तितके दिवस उकडून खातें. येणाजाणाऱ्यावरोवर मुला-नातवंडांना कोकम नाहींतर फणसाचीं आणि आंब्याचीं साटं पाठवते.–'एकदां येऊन जा' अशीं कार्डं लिहून घेऊन धाडतें. मनीआर्डरीतल्या पांचपंचवीसांतलें पोष्टांत टाकते. आणि एखाद दिवशीं डोळे मिटते.–ही घरं आतां दूर राहिली. असल्या घरीं आतां जाणं होत नाहीं, गेलो तर राहणं होत नाहीं.



## शरणागता–गताऽऽगता ऽऽ

असलं एखाद जुनं घर पाडतांना दिसलं तर मी मान फिरवतो. कोणाचं कां असेना. त्या जातीच्या घरांशी माझीं नातीं जडलेलीं आहेत. घरांचे अनंत प्रकार आहेत–आणखी होतील. पण परसू अंगण माजघर छाप घर हा माझा आवडता प्रकार. कां तें सांगणें तर्कापलीकडलं. तसल्या घरांतल्या निरनिराळ्या खोल्यांतून संचार करायला कांहीं लायकी लागत असे. विशेषत: माडीवर. मुंबईच्या कॉलेजांत शिकणाऱ्या काकाच्या-किंवा मामाच्या खोलींत वर्ग असायचा. मुख्य म्हणजे भोंग्याचा फोनो. फोनो लावणं हा समारंभ असे. पोरवयांत गाणं ऐकण्यापेक्षां किल्ली संपल्यावर ऐकूं येणार ते डुरकणंच ऐकायची मजा मोठी–किंवा मग पिन् अडकल्यावर शरणागता मधलं गता-गता–गता ह्याचा रंग अजब. तिथल्या फळीवरचं पोमेड डोक्याला लावायला मिळणं ही योग्यांना दुर्लभ अशी गोष्ट होती. मग वर्गांत हळूंच टोपी काढून वास घ्यायची हुक्की येई. भांग काढायला मॅट्रिक ओलांडावी लागली तोपर्यंत 'मिशीन !' माजघरांत दुपारीं प्रवेश नसे. 'मेल्यानो इथें रे काय तुमचं म्हणून हकालपट्टी चालायची–' आणि चटयावर आडव्या झालेल्या जावा-जावांची खुसखुसखुस सुरू व्हायची. वाळंतिणीच्या काळोख्या खोलींत पोरं पडतात तरी कुठून हें वरेच दिवस रहस्य होतं आणि वरच्या जिन्याच्या दिशेनें जाणारा 'पाण्याचा तांब्या' हें तर भलतंच गूढ ! ती वाळंतिणीची खोली तर इतकी काळोखी होती कीं, झाला तो मुलगा कीं, मुलगी हें वाहेर आणून पहावं लागे म्हणतात. शाळेला जाण्यापूर्वी पोरांची पंगत वसली कीं, तिकडून धुपाचा वास येई. घरांत वाळंतीण अगर विटाळशी ह्यांचे वास्तव्य पोरांना अतितापदायक. नागव्यानें पाणी देण्याच्या कामावरची नेमणूक रद्द झाली कीं, पोर मोठे झाले असें मानायचे. 'शिवाल कारटयांनो' म्हणणारी वाई हा एक साक्षात् उच्छाद होता, त्यांत गोटया, विटीदांडू वगैरे ठेवायच्या जागीं आपली पथारी टाकायची ह्या वायांना भारी खोड असे. नुकताच मी त्या घरांत गेलो होतो. त्या घरांत आतां वीज आली. अंधाऱ्या खोल्या गेल्या आणि ती रहस्येंहि गेलीं. वाळंतिणीच्या त्या खोलींत इतके कोनाडे आहेत आणि त्या खोलींत कुठल्याहि दारांतून न जाऊं शकणारं असं एक शिसवी लागडाचं भलं मोठं आरशाचं कपाट आहे हें ठाऊकच नव्हतं-मला. त्या खोलींतल्या आजवर पाहिलेल्या सगळ्या वाळंतिणी, लांव वाह्यांचं पोलकं, पायांत सपाता आणि डोळ्यांखालून सांडणारं काजळ घातल्यामुळें सारख्याच दिसायच्या. जन्माला आलेलीं सगळीं पोरं जशीं सारखींच






दिसतात तशा बाळंतिणीहि एकसारख्याच कशा दिसतात हें त्या अंधाऱ्या खोलींत दडलेलं आणखी एक रहस्य होतं.

पण 'जिना' हे साऱ्या रहस्याचं आगर. माजघरांतून माडीवर जाणारा. बाहेरचा नव्हे. लहानपणीची रुसल्यावर जाऊन बसायची ती जागा होती. सुनांची ती कुजबुजण्याची जागा. खुद्द माझ्या तर पायऱ्यांवरून गडगडून खोक पाडून घेण्यापासून ते "मास्तरीण काकू" आणि लंडनमधील बड्या लोकांची गुप्त रहस्यं वाचण्यापर्यंतच्या सगळ्या आठवणी त्या अंधारांत साडेतीन वळणं घेत गेलेल्या जिन्यांतच सांठल्या आहेत. असल्या ह्या घरांना सारं कांहीं लाभलेलं असतं. नसतं फक्त नांव. मालकाच्या आडनांवासाठीं प्रत्यय लावून ओळखायचं. देशमुखांचा वाडा, कदमाचं घर, नाना कामताची वाडी– अशीं सामान्य नांवं. आणि आळीचं गोत्र. ह्या आळ्या देखील नेहरू गांधी वगैरेंची नांवं घेऊन 'रोड' झाल्या नव्हत्या. सोनाराची किंवा कुंभाराची आळी म्हटलं तर जिभेला जातीयतेचा विटाळ होईल हें भय नव्हतं! भर मुंबईत सुद्धां शेणवी गल्ली आणि लोहार स्ट्रीट होती. 'अठरापगड' ह्या भाबड्या शब्दाला 'कॉस्मोपॉलिटन' हा धूर्त राजकीय प्रतिशब्द आला नव्हता. किंबहुना पगड्यांचे जातवार अठरा प्रकारहि होते म्हणतात. ब्राम्हणी विद्वत्ता असली तरी एखाद्या त्रिलोकेकराला परभी पगडीच चढवायला आवडे आणि पगडी, पागोटं, शेमली, साफा, रुमाल, फेटा हीं केवळ शिरस्त्राणं नसून निरनिराळ्या जातींची निशाणंहि होती. त्यामुळें जातीयतेच्या छुप्या कारवाया चालत नसत. एकत्र कुटुंबांत आणि जातीपातीच्या धाकांत वाढणारीं हीं माणसं–आपलं पहातांना थोडं दुसऱ्याचंहि पाह्यला शिकलीं होती. जातींतल्या कां होईना पण चार माणसांच्या जोडीनें चालणाऱ्या ह्या समाजाला चार-चौघांपेक्षां आपण निराळे आहों यापेक्षां निराळें नाहीं हेंच दाखवण्यांत भलेपणा वाटे. म्हणूनच घरांची रचनाहि चार-चौघांसारखी आणि नांवंहि ठळक. थोडक्यांत म्हणजे अमक्याच्या घराला अमक्याचं घर म्हणावं हीच इच्छा.

## साहेबाच्या अमदानींत बारशीं

त्यानंतर मग नांववालीं घरं आलीं. पूर्वी घराला नांव देण्याचा मान घर बांधण्यापलीकडे कांहीं थोर कर्तबगारी केलेल्या माणसालाच असे. शिवरायाचा 'लाल महाल' किंवा संस्थानिकांचे लक्ष्मी विलास, शालिनी विलास असले राजवाडे–फार तर शनवारवाडा. एरवी सरांस गुळवें हवेली सारखी अमक्या अमक्याची हवेली किंवा गायकवाडवाड्यासारखा अमक्या अमक्याचा वाडा! घरांची बारशीं साहेबाच्या अमदानींत सुरू झालीं असावीं. बाकी घराच्या नांवावरून पुष्कळदां मालकाचा स्वभावहि कळतो. अर्थात् हें कोष्टक नेहमींच जमतं असं नाहीं.–'निवान्त' नांवाच्या घरावरून जातात–'गधड्या खेटरीन पुन्हां वर तोंड करून बोललास तर' ही ऋचा मी ह्या कानांनीं ऐकली आहे. पण त्यांतल्या त्यांत 'मातृस्मृति', 'पितृस्मृति', 'गंगाधर भुवन', 'अन्नपूर्णा निवास' असलीं नांवं वाचलीं कीं, मालकाचा मनोधर्म ओळखता येतो. हलाखीतून वर आलेल्या गृहस्थांच्या घरांना बहुधा असलीं नांवं असतात. 'हें सारं पहायला बाबा हवे होते–किंवा आई हवी होती' ह्या विचारानें वास्तुशांतीच्या दिवशीं चार टिपं गळलेलीं असतात.

असल्या घरांच्या प्रवेशद्वारांत अजूनहि श्रीगजानन महाराजांना बसवलेलें असते. आणि पत्रांच्या पेटीवर श्याम गोरे किंवा शुभांगी काळे एम्. ए. बी. टी. असलं कांहीं नसून सबळ जगन्नाथ मोरेश्वर अमुक अमुक किंवा सदाशिव हरि अमुककर असा संपूर्ण नामोल्लेख असतो. फार तर रिटा. सब. रजि. हा हुद्दा. फक्त मालकाचं नांव. करड्या पुरुषप्रधान संस्कृतीचीं हीं घरें. प्राव्हिडंट फंड (उच्चारात ट आणि ड पूर्ण.) सेव्हिंग आणि बँकेकडून थोडं लोन एवढ्या ताकदीवर उभी राहिलेलीं हीं घरें. धाकटीच्या लग्नाची सोडली तर असल्या घरांत फारशा चिन्ता उरलेल्या नसतात. थोरला कलेक्टर कचेरींत, दुसरा भिलईला टेक्निकल सुपरवायझर, दोघींचीं लग्नं झालेली–थोरले जांवई प्रीमिअर आटोमोबाईल अगर तत्सम स्थानीं– (कुर्ल्याला असतात. हो..स्वतःच्या नांवावर ब्लाक आहे. चांगला दोन खोल्यांचा...) दुसरा जांवई बेलापूर ते बारामती पट्ट्यांत कुठें तरी साखरकारखान्यांत .. (त्यांना क्वार्टर्स आहेत. चांगले...शिवाय हवापाणी मुबलक) असल्या घरांत पेन्शनर मालकांसाठीं 'पुरुषार्थ' मासिक येतं आणि सूनबाई-साठीं 'स्त्री' (...तिला आहे हो थोडं वाचायलाह्यायचं..परवांच्या संक्रांतीवर कविता लिहिली होती..परत आली म्हणाली... पोष्टाचं कांहीं विचारूं नका...) शिवाय ऑफिसच्या 'लायब्रीं'तून हे मासिकं आणतात. लग्नाची आहे तिला टायपिंगला घातली आहे...असं हें प्रसन्न घर. त्यांतून धाकटीचं ठरत आलेलं असलं म्हणजे तर प्रश्नच नाहीं. दुःख शोधायचंच म्हटलं तर आताशा मालकीणबाईंना जिना चढतांना गुढघे बरीक दुखतात आणि एकदोनदां चक्कर आल्यासारखं झालें. मालकांनीं आसपासच्या नवकवींच्या अड्ड्यांत समावेश करून घेतलेला असतो. शिवाय त्यांच्याच डिपार्टमेंटमधून रिटायर झालेल्या पेंडसे किंवा गणपुल्यांचं घर दोन रस्ते टाकून पलीकडेच

असतं. तेथेच सकाळचीं वर्तमानपत्रं दुपारीं जाऊन वाचायची सोय. वदल्यांत कधीं मधीं गणपुल्यांनीं रामायणांतली किष्किंधा कुठें होती यावर चाखलेल्या संशोधनाविषयीं किंवा वाराक्षार चिकित्सेविषयीं लिहिलेले एखाद दोन लेख ऐकावे लागतात. पण असलीं हीं घरं एकूण सालस. देवाला हवीत म्हणून फुलझाडं लावणारी. धार्मिक पण तो धर्म देखील बेतावेतानें पाळणारीं. चतुर्थीला गणपतीच्या आरत्या देखील दबल्या आवाजांत म्हणणारीं. बेताची मूर्ति–बेताची पूजा–आल्यागेल्याला खिरापत देखील चमच्यानें बेताची वाटणारी. पाव्हण्याला चहाच्या वेळीं आला तरच चहा देऊन तीन लवंगा आणि एक वेलदोडा भरलेली चिमुकली ताटली पुढें करणारीं. पोष्टाच्या पेटचा ठराविक वेळेला उघडतात तसे त्या घराचे दरवाजे ठरल्यावेळीं उघडतात आणि मिटतात. ही घरंहि निरुपद्रवी–आंतली माणसंहि तशीच. पावसांत चिखल उडूं नये म्हणून कोणी चालावं तशीं आयुष्यभर चाललेलीं. आणि चालता चालतां ह्या घरांत येऊन अलगद विसावलेलीं.

ह्या घरांच्या उलट कांहीं घरं असतात. त्यांच्या घरांचा 'घर' म्हणून केलेला उल्लेख देखील त्यांतल्या माणसांना रूचत नाहीं. ते बंगले असतात कारण त्यांना गॅरेज असते (त्याचा देखील उल्लेख ते गराज असा करतात आणि मोटारीला 'गाडी' म्हणतात) त्या घरांत मालक किंवा कुत्रा ह्यांपैकीं कुणीतरी आळीपाळीनें कुणावर तरी ओरडत असतात. घरांतल्या वायकादेखील 'गाडी' चालवतात. असलीं घरं भीति वाटावी इतकी सुंदर असतात: घरांतल्या पोरींइतकी. ही घरं पाहिल्यावर पहिला प्रश्न 'खर्च काय आला असेल' हाच येतो. हीं टोलेजंगच असतात असं नाहीं. किंबहुना 'भव्यता' त्या घरांना आंतून बाहेरून कुठूनच चाटून गेलेली नसते. ते बंगले निराळे. उंच उंच वृक्षांच्या आंतून थोडेथोडेसे दिसणारे. पाण्याचं कारंजं आणि कारंजांत गोजिरवाण्या वालकाचा तुतारी वाजवायच्या पोजमधला पुतळा असणारे. ते हे नव्हेत. ही बंगल्यांची जातच निराळी. त्या बंगल्यांना एसपैसपणा असतो. त्याची मालक मालकिणीची जोडी श्रीमान् आणि वपुः श्रीमान् असते. ते शेठजींचे बंगले. हे नव-श्रीमन्ताचे. त्या बंगल्यांतल्या बागा बी–वियाणांच्या क्याटलॉगमधली चित्रं उगवल्यासारख्या असतात. फुलं देखील मेकप करून उभी आहेत असं वाटतं. दिवाणखानें फर्निचरवाल्याच्या शोरूमसारखें आणि घरांतलीं माणसं सदैव पोज घेऊन वसतात आणि उठतात. हीं घरं सैल होत नाहींत–आळसावत नाहींत–झोप आली कीं बेडरूममधें जातात आणि भूक लागल्यावर डायनिंग टेबलाशी वसतात. इथें कोणी ओसरीवर आडवं होत नाहीं कीं, पायरीवर वसून भाजलेलं कणीस खात नाहीं. आंबा चोखीत खिडकीशी उभं राहत नाहीं. चमच्यानें आंबा कोरतात. त्या मालकांचे जांवई नोकरीला कंपन्यांत नसतात–फर्ममधें असतात. किंवा कन्सर्नमध्यें. घरांतल्या वायका हळदीकुंकू वगैरे करतात. ('आफ्टरऑल् आपलं कल्चर प्रिझर्व केले पाहिजे.) त्या दिवशीं तिजोऱ्यांतल्या हिऱ्यामोत्यांना अंगाखांद्यावर खेळवतात. असल्याच एका घरांतल्या हळदीकुंकवाला वाणं वाटताना प्लॅस्टिकचे घाऊक घेतल्यावर तीन नया पैशाला मिळणारे चमचे वाटले होते. (ओन्ली–मॅरिड् वायकांना...) वाण वाटणं वगैरेतली 'वेस्ट' वास्तविक थांबवली पाहिजे हा त्या हळदीकुंकवांतल्या चर्चेचा विषय होता. आणि मसाल्याचं दूध पितांना म्हशीला वहुधा उन्हाळचांत पाण्याचा पान्हा फुटला असावा अशी शंका येण्याइतकं तें जाड होतं. इथल्या हळदीकुंकवांत एरवीं स्लॅक्स् घालणारी मुलगी 'फॅन्सी ड्रेस' म्हणून नऊवारी नेसते. त्या घरांतल्या भिंतीवर गांधी नेहरू, शिवाजी वगैरे नसतात. 'साहेब' सर्व्हिसमधें होते. (आतां रिटायर होऊन ऑक्टोपस् हिंगोराणी कोलॅबोरेशननें निघालेल्या फॅक्टरींत जनरल मॅनेजर आहेत.) तर साहेब सर्व्हिसमध्यें होते त्यावेळीं दिवाणखान्यांत गांधी, नेहरू आणि राजेंद्रबाबू सुद्धां होते. त्यावेळीं मिनिस्टर्स 'टी' पार्टीला वगैरे यायचे. हल्लींहि येतात...... (–परवां... आपले....हे. . डेप्युटी मिनिस्टर. . .त्यांच्या मेव्हण्याला घेतलाय् आम्हीं आमच्याकडे. .) . .पण आतां–गांधी नेहरू आणि राजेंद्रबाबू गेले. . .तिथें दोन ॲब्स्ट्रॅक्ट पेंटिंग्ज् आणि एक फ्लॉवरपॉट्चं चित्र लावलंय (. .आमची मिनी पेंटिंगच्या फायनल इयरला आहे. . . तिचं वर्क आहे हें. . . आपल्याला ह्या आर्टबिर्टमधलं कांहीं कळत नाहीं आ. . . . .हें हें हें. . . मिनी–मी ऽऽ नी–हॅव् यू मेट माय् यंग फ्रेंड. . .हे शरद्राव सरदेसाई. . . परवांच आले मिशिगनहून. . .सिरॅमिक्स्च ट्रेनिंग घेऊन, . . आतां आमच्याकडे यायचे आहेत. . . मग मिनी हाउ डयू डू करते–शरदरावहि हाउ्डूडू करतात...आणि कर्चीफनें घाम टिपतात आणि हाउ्डूडू एवढं बोलल्याच्या श्रमानें घसा नाजूकपणें खाकरतात....)–ह्या घराला आपण 'स्टेट्स'मध्यें नसल्याचं भयंकर दुःख असतं आणि कम्युनिस्ट म्हटलं कीं, साऱ्या घराला घेरी येते. ह्या घरांत कधीं पंगत यथेच्छ जेऊन आडवीच होत नाहीं. इथें जेवायला हातांत काचेची वशी तोलून धरून त्या तोलाला

**प्रकाशवंदी**









साजेल असं उभ्या उभ्या तोलून मापून बोलावं लागतं आणि सर्वांच्यांत 'मिसळावं' लागतं. ह्या घरांत शिरकाव करूं पहाणाराला पहिली गोष्ट म्हणजे उन्हाळयांत सूट घालून हिंडायची संवय करावी लागते आणि बायकांना स्वतःचं शोभेचं वस्तुपण क्षणभरहि नष्ट होणार नाहीं याची सतत काळजी घ्यावी लागते. हातांत जेवण घेऊन 'डाएट्'वर बोलत राहावं लागते. स्कूल्समधल्या ॲडमिशन्स्चं दिवसेंदिवस किती डिफिकल्ट होत चाललं आहे, सगळीकडे 'टेरिबल करप्शन कसं आहे.' कामगारवर्ग आणि त्यांचे पुढारी हे कसे सेल्फिश् आहेत, नुकतंच भरलेलं किंवा भरणारे इंडस्ट्रियल् एक्झिबिशन्, रविशंकरांची सतार, फॉरिन्मध्यें गेलेला किंवा जायच्या वाटेवर असलेला मुलगा-मुलगी अगर जांवई, आर्मीतल्या आपल्या मुलाला चक्क फ्रंटवर पाठवल्यामुळें सूनबाईची कशी पंचाइत झाली—तिचं डान्सिंगचं ट्रेनिंग कसं अर्धवट राहिलं हीं दुःखं हातांतल्या डिश्मधल्या पॅटिस्ला लावून खावीं लागतात. पुरुषमंडळी प्रोहिबिशन् हा कसा फार्स आहे या विषयावर न कंटाळतां बोलतात आणि बायकांचे सगळे विषय संपले कीं, कधींहि न संपणाऱ्या 'साड्या' ह्या विषयाला सुरुवात होते. लुगडीं आणि पातळं म्हणणाऱ्या बायकांना ह्या 'साडी' म्हणणाऱ्या बायकांच्यात स्थान नाहीं. आणि साडीची 'सारी' झाली कीं सांस्कृतिक पातळी अधिक वर गेली. पण असल्या ह्या घरांत शंकर, राम, कृष्ण वगैरे देवांना स्थान नसतं. मात्र 'साईबाबा'चा शिरकाव असतो. उत्पादकापेक्षां वितरकाच्या फायद्याचा भाग मोठा असतो हें अर्थशास्त्र ठाऊक असल्यामुळें देवापेक्षां देवांच्या एजंटांना खूप ठेवणें अधिक व्यवहार्य वाटत असावें! असल्या घरांत अधून मधून एखाद्या बाबाचा किंवा बुवाचा तळहि असतो. आणि पूर्वी ज्याला देवाधर्माचं म्हणत 'त्याला स्पिरिच्युॲलिझम्' वगैरे म्हणून कुठेंतरी ठुसठुसणाऱ्या पापाच्या फोडावर हें स्पिरिच्युॲलिझम्चे ब्यँडेज् बांधलं जातं. पुराणाचा 'डिस्कोर्स' होतो आणि भजनाची प्रेयर होते. बेबीला गाणं शिकवायला येणाऱ्या गायनमास्तरांना तिला क्लासिकलच्या जोडीला डिव्होशनल साँग्ज शिकवायची आर्डर निघते. मास्तर दोन महिन्याची तुंबलेली शिकवणीची फी स्मरून भजन शिकवतात... (एखादं हिंदी शिकवा हं. . कारण स्वामीजींना मराठी समजत नाहीं. तुमचं ते तुकारामविकाराम नको... मीराबाईचं शिकवा) ही घरे दिवाणखान्यांतल्या टीपॉय ठेवलेल्या मजकुरापेक्षां गुळगुळीत जाहिरातीच्या चित्रांनीं भरलेल्या मासिक साप्ताहिकांसारखीच असतात. तिथें जसा सारा मजकूर जाहिरातीच्या पानाचा आधार घेऊन ओशाळेपणानें—आश्रितासारखा जागा मिळेल तिथें उभा असतो—तशीच हीं घरं आपली मुळांतलीं, आश्रितसंस्कृतींतलीं मनं दडवीत जीवनातल्या प्रत्येक गोष्टीची जाहिरात करीत उभी असतात. त्या घरांतल्या बारशापासून ते बाराव्यापर्यंत प्रत्येक घटनेचं प्रदर्शन असतं. मी दिल्लींत असतांना असल्याच एका घरांत झालेल्या निधन-प्रसंगी त्या संस्कृतींतल्या बायका दुःखाला साजेलशा काळ्या, आणि शुभ्र साड्या नेसून—सराईतपणानें केस विसकटन आणि दुःखाचं एक्स्प्रेशन आरशांत पाहून पक्कं करून आलेल्या पाहिल्या आहेत. वर्तमानपत्राचा फोटोग्राफर आल्यावर त्या बायका एकजात 'जेव्हा तळहातीं टेकुनीया स्वशिरांते बैसल्या—त्यावेळीं 'मृताचा शोक कसा करावा' ह्या शिक्षणाचे नाट्यशिक्षणाच्या वर्गासारखे वर्गबिर्ग दिल्लींत काढले आहेत कीं, काय अशी मला शंका आली. इथल्या सोहेराची जाहिरात आणि सुतकाचीहि जाहिरात. लग्न ही ऐश्वर्याची जाहिरात. भोजन ही क्रोकरीची जाहिरात. साबणाच्या जाहिरातींत जसा 'आमचा साबण विकत घ्या म्हणजे आम्ही चार पैसे कमवूं—' हें स्वच्छ सांगण्याचा प्रामाणिकपणा नसतो. तुमच्या त्वचेची आम्हांला चिंता आहे हे भासवीत साबण खपवतात. 'जाहिरात' नांवाच्या गोष्टीमागें हा मूळ हेतु लपवण्याचा खोटेपणा सदैव दडला आहे म्हणून जाहिरातींतली बाई कधीं मनाला शिवत नाहीं. टूथपेस्टवाल्यांना तिचे दांत हवे असतात—शॅम्पूवाल्यांना केंस हवे असतात—सारीवाल्यांना तिच्या अंगप्रत्यंगाहून साडीचे आकर्षण डोळयांत भरवायचें असते. असल्या त्या घरांत कधीं श्रीमंतीची कधीं कर्तबगारीची कधीं लग्नाच्या मुलाची आणि मुलीची जाहिरात असते. ही माणसं दारू देखील बेहोष होण्यासाठीं पीत नाहींत—अत्याधुनिकतेची जाहिरात म्हणून पितात. मद्याला त्याहून मोठा उपमर्द कोणता? जुनी भावडीं घरं कधीं तरी वेडी होत. ऊर बडवून शोक करीत आणि ताशे लावून वराती नेत आणीत: भुरके मारून जेवत आणि आळचा ओलांडून ऐकू येईल असा ढेकर देत. त्यांना कांहींच लपवायचं नाहीं. ह्या घरांत इतकी श्रीमंती असतांना सारखं लपवावंसं काय असावं?—एका पिढीपूर्वीची गरीबी? नवश्रीमंताना आपण त्रिशंकू आहोंत असं तर वाटत नसेल? जुन्या खानदानी श्रीमंतीचा इतिहास नाहीं—नव्या समाजांतल्या भविष्याची खात्री नाहीं. (. . त्यांतून बेबी कुठल्याश्या दाढी वाढलेल्या चित्रकाराशीं लग्न करणार म्हणतेय्—चार मिनार ओढणारा फाटक्या चपला घालणारा आणि ॲब्स्ट्रॅक्ट ह्या नांवाखालीं देव जाणे कसले फराटे ओढतो—मॅनरलेस् ब्रूट. . . . कॅन्व्हास आणि रंग घ्यायला दमडा नाहीं—आर्टबिर्ट ठीक आहे—पण म्हणून काय लग्न?—नॉन्सेन्स- चिंट्यांचा अनिरुद्ध चांगला आय्. पी. एस्मध्यें सिलेक्ट झालाय् त्याला पेंटिंगमधें इंटरेस्ट नाहीं म्हणून म्हणे बाष्कळट! ओफ्! आणि दुसरे चिरंजीव रात्रभर जॅम् सेशनमध्यें ट्विस्ट करतात—नवी पिढी बेजबाबदार आहे—त्या कारट्यांना कॉन्व्हेंटमध्यें घातले हेंच चुकलं. . . . . . इथें त्यांच्यातला कुठला तरी रामरक्षा म्हणणारा बाळपणचा बाळू जागृत होतो. आणि त्या अत्याधुनिक घरांत आपण परके—परके—परके आहोंत असं त्यांना वाटायला लागतं—) ही घरं बाहेरून ऐश्वर्यानें नटलेली असूनहि मनांतली लोंबकळणारीं ही लक्तरं लपवीत असतात.

## मारुतीच्या शेपटासारखी घरं

ह्याच्या उलट कांही घरांना ह्या लक्तरांचा संकोचच नसतो. घरांचा कांहीं वास्तुशिल्प, सौंदर्य वगैरे भानगडींशी संबंध आहे याची इथें जाणीवच नसते. ही घरं आपलीं मारुतीच्या शेपटासारखीं







अनुक्रमणिका

'वाढता वाढता वाढें' ह्या जातीतलीं. एखादीं 'पडवी' काढण्यांत येते आणि त्या पडवींत पुन्हां फांद्या फुटतात. गच्चीवर दोन खोल्या उठतात. मग वेळ काळ सांगून येत नाहीं म्हणून भाडेकरू ठेवलेले असतात. त्यांना काढून कसे टाकावे ही चिंता चालू होते. वेळ किंवा काळ यांपेक्षांहि भाडेकरू सोकावतो हें मालकाला दुःख आणि मालक ही माणुसकीशीं सर्वस्वी पारखी संस्था असा भाडेकरूचा सिद्धांत. वर पुन्हां ह्या असल्या अचकट विचटक वाढलेल्या घराला 'वाडा' म्हणायचं धैर्य मालक आणि भाडेकरू ह्या उभय पक्षांत असतं. असल्या घरांच्या भिंतींना कुठलाहि एक रंग नसतो. भाडेकरूंनीं आपापल्या सोयीनें रंग लावून घ्यायचे ठरविलेलें असते. रंग लावण्याचा विचार या ना त्या कारणानें पुसला जातो. मालक त्या दिशेला फिरकायला तयार नसतात. मात्र इतकं विचित्र असूनहि असल्या घरांना पेठ परत्वे स्वभाव असतात. भांडणांत पारंपरिक शिस्त असते. शिव्यांत देखील भरमसाट विविधता नसते. किंबहुना कुठल्या आळींतून कुठल्या दर्जाच्या शिव्या ऐकू येतील याचा जाणकारांना अंदाज सांगतां येतो. इथें रहाणाऱ्या मंडळीचें कांहीं एक वैचारिक ऐक्य असतें—सांस्कृतिक समानता असते. म्हणजे गांधी, शिवाजी आणि टिळक यांपैकीं कुणा ना कुणाचा फोटो सांपडतो. मग सुभाषबाबू कीं, नेहरू यावर माफक मतभेद असतील. हेडगेवार असले तर मात्र गांधी नेहरूंचो धडगत नसते. परमपूज्य गोवळलकर गुरुजी आणि सानेगुरुजी एकदम अंगावर घेऊन उभी असलेली यापूर्वी मी एकच भिंत पाहिली आहे. फ्रेममेकरची. तरीहि ह्या साऱ्या मतभेदापलीकडला कुठलातरी धागा जुन्या चाळींसारखा ह्या वाड्यांना जोडून गेला आहे. आडांत जीव दिलेल्या अभागिनीचा असेल. (. . .परस्परांशी दहादहा वर्ष बोलणं टाकलेल्या एश्वदाबाई आणि राधाबाईंचं दर अवशेला मध्यरात्रीं त्या आडांत 'धप्प' असा आवाज येतो यावर एकमत आहे. तें च्यालेंज करणाऱ्या तिसरीवर त्या जोडीनं तुटून पडतात. एवढंच कशाला? विलायतेहून इंजिनिअरची परीक्षा पास होऊन मालीन मुकुंदा सगळ्यांच्या बिऱ्हाडांत जाऊन 'काय काकू काय अण्णा' करून आल्याची सुखद आठवण त्यांना बांधून ठेवते. 'बापच मेला तर्कट आहे. पोरं बरी हो ऽऽ'! इ० इ०)

## कांहीं गूढ आणि अबोल

कांहीं कांहीं घरं मात्र भलतीच गूढ! अबोल. चमत्कारीक माणसांचा राबता असलेलीं. बरूपांगीं स्वच्छ असतात. दोन वर्षांतून एकदां रंगूनहि तयार होतात. पण दाराला स्वागताचं हंसू ठाऊक नसलेलीं. अगदींच 'कुत्र्यापासून सावध रहा' नव्हेत. पण 'नाहीं आलांत आंत तर बरं' असं सुचवणारी. तशी ओकी बोकीं नव्हेत. पण इथलीं माणसं निमूटपणानें जेवतात—आळीशीं संबंधच ठेवून नसतात. पोरं होळीची वर्गणी मागायला जायला देखील बिचकतात. कुणी खेकसत नाहीं. घरांतला पुरुष निकटपणें पावली ठेवतो न दार मिटतो., खाष्ट म्हाताऱ्याच्या खनपटीला बसून होळीची चवलीपावली मिळवण्यांत तर मजा असते. 'होता चालते कीं आणू काठी?' म्हटल्यावर पांगापांग झाली तरी पुन्हां पोरं हजर. 'उच्छाद कारट्यांचा'—म्हणत टिकवलेली चवली उपटल्याखेरीज जायचीं नाहीं. असल्या घरांत जाण्यांत आणि तिथल्या तात्यांच्या शिव्या खाण्यांत देखील मजा असते. पण गूढ घरांतील निमूटपणें टिकवलेली पावली नको वाटते. हे घर कुढत असतं. कसल्या अज्ञात दुःखानें देव जाणें. ह्या घरीं कधीं पाव्हण्यांची चप्पल दिसत नाहीं. आणि बहुधा एखादा वेडा मध्यम वयाचा गृहस्थ खिडकींतून समोरच्या घरांत दांत विचकून हंसल्यासारखा पाहतो. त्या वेड्याचे अस्तित्वच मला वाटतं घराची कळा घालवित असावं किंवा मग वर्षानुवर्ष बिछान्याला खिळलेला एखादा रुग्ण. पण असल्या कुढल्याहि घरं अंथरून टाकणाऱ्या खुणा नसूनहि ही असलीं कुढणारीं घरं मी पाहिली आहेत. असली चमत्कारिक गूढता असलेलीं घरं शहरांतल्या कोपऱ्यांत असतात. मुंबईत सुद्धां कांहीं पारशांची असलीं घरं आहेत. मोठीं घरं. चांगल्या बागा असलेलीं. संध्याकाळीं 'घरापुढून गेले कीं, चंदनाचा वास येई. बगीच्यांतल्या मोठ्या फाटकापाशीं एखादा म्हातारा पारशी आणि पारशीण आराम खुर्च्या टाकून' दोन दिशांची पोकळी पहात, बसलेली. असल्या घरांतली ती भयानक शांतता रस्त्यावर सांपडलेली असते. आणि मग तो चंदनाचा वास आणि ठशांनी उमटवलेली रांगोळी कुठल्या तरी अज्ञात तंत्रसाधनेच्या पूर्वसिद्धीसारखी वाटायची. ह्या असल्या बंगल्यांतलीं झाडं, पानं, रोपं, फुलं, सारीं कशीं भयभीत होऊन उभीं. दाराशीं बसलेले तें पोकळींत डोळे खुपसणारं वार्धक्य पहातांना एकदम दचकल्यासारखीं. 'आहे मनोहर तरी गमते उदास' ही जुनी ओळ आठवली कीं, मला जुन्या पारश्यांचे हे जुने बंगले आठवतात. पण तरीसुद्धां ह्या घरांत स्वभाव आहेत. कधीं तरी असल्या घरांतून देखील पिआनोचे स्वर ऐकू येतात. एखादी थोडप-

**युद्धबंदीसह ब्लॅकआऊट झालाच पाहिजे!**

**कारकून**



**आतां "साडे तीन"ची गाडी गेली ठार।
आणि 'ओ. टी.' बसला डोक्यावर॥**

वर्षदेशीय पोर्वेला सायकल लावून 'मा ली ऽऽ' अशी माळयाला हांक मारते, आजीचा मुका घेते. आजोबाचं नाक ओढते. तसं हें घर राणसांत येतं. पपेटीला दारांत झेंडूच्या फुलांची माळ येते. आणि गरीच्या चिमुकल्या गोल टोप्या घातलेली दोनचार वाळसेदार पोरं पांढऱ्या शुभ्र पोशाखांत वागेंतून वागडतात. अग्यारींतला उद कपाळीं लावलेली—एखाद्या होर्मसजींची फ्रेनी कावसला घेऊन घरांत शिरतांना दिसते. पण वांधणीचा ढंग तसलाच असलेले जुने सरकारी वंगले मात्र अधिकाराचा सूक्ष्म माज दाखवतात. ऐसपैस असतात. पण निराकार, दारांतला हवालदार आधीं विचकवतो. असल्या घरांतल्या पायपोसावर 'वेलकम्' असं असतं. इथें माणसं सहज म्हणून येऊच शकत नाहींत. 'साहेबांना' भेटायला येतात. आणि व्हरांड्यांत चमत्कारिक स्तब्धतेशीं मुकावला घेत घटकाभर वसल्या-खेरीज साहेब किंवा मेमसाहेब अजून एंट्रीच घेत नाहींत— 'साहेब' नांवाच्या मनुष्य विशेषाची 'साहेबी' भेटीस येणाऱ्याला ताटकळत ठेवण्यावरून ठरते असा युक्लिड्च्या सिद्धान्तासारखा सिद्धान्त असावा. गांवावाहेर, भोवतालीं खूप मोठी जागा सोडून आंत गेलेलीं ही सरकारी घरं सरकार इतकींच निर्विकार असतात. इथें एखादा दिवाणखाना सजवलेला असला तरी 'कुठल्या तरी आक्टान्वयें सजवलेला असावा' अशी शंका येते. चपराशी आपल्याशीं जेव्हां आदबीनें वागतात त्यावेळीं ती सारी आदव साहेबांच्या अंगावरून आपल्या अंगावर सांडली आहे हें कळतं. ह्या घरांतलं साहेबांचं नि मेमसाहेबांचं चांगलं वागणं 'चांगलें कसें वागावें' ह्या पुस्तकांतून पाठ केल्यासारखं वाटतं. असल्या घरांत मला मोठ्यानें ओरडून एखादा मनाचा श्लोक ठणकावून त्या शांततेची, आदवीची, चांगल्या वागण्याची भिंग तडातड फोडून टाकावीशीं वाटतात !

## रेडिमेड ग्लॅक्सो विस्कीट नाहीं थालीपीठ

दर्शनी आणि अंतरीं फारच टापटीप असलेलं घर स्वागताला आतुर आहे असं नाहीं वाटत. दोन दिवसाची दाढी वाढलेला आणि शर्टाचीं वटणं वरखालीं लावणारा खप्पड गालाचा एखादा गृहस्थ देखील सोवत मोठं आनंदी वातावरण घेऊन हिंडत असतो आणि नखशिखान्त इस्त्री करून हिंडणाऱ्या माणसाचं भेटल्या नंतरचं हंसणं देखील खडूस असतं. चांगले उंच निंच आणि गोरेपान पुरुष देखील मराठींतल्याच चळजझमधल्या अ ह्या अक्षराइतकें निकामी वाटतात आणि एखादा काळा खबदाड्या हवाहवासा वाटतो. पुरुषांनाचे काय वायकांनादेखील— (हें ऐकिवांत आहे !) घरांचंहि तसंच आहे. एखादे वुटुकवैंगण घर 'या या' म्हणून वोलावीत असतं. त्या घरांतून हंसण्याचा कल्लोळ ऐकू येत असतो. कुणाची तरी पेटी-तवल्याशीं चाललेली झटापट पाय थवकवते. इथल्या घरांतल्या चहा वरोवर रेडिमेड ग्लॅक्सो विस्किट नाहीं मिळत— 'वसा घटकाभर— आतां होईल थालीपीट' म्हणून आग्रह होतो. 'भाजणी घरची आहे' वैडेकरांची आयती नाहीं हो—असं भावड्या मनानें सांगितलं जातं.' पाहुण्याला सर्दी झाल्याचा संशय आला तर चहांत ओलीपात टाकू कां ? अशी आस्थेनें चौकशी होते. दीड दोन खोल्यांचीच वैठी चाळ असते. पण खोल्यांची लांबीरुंदी सारखी असली तरी माणसांचे नमुने अगदीं स्वतंत्र ! वरण्या सारख्याच पण पिवळी हळद, लाल तिखट, असे निरनिराळ्या रंगाच्या स्वरूपाचे मसाले भरलेल्या. असलीं घरं जिल्ह्याच्या गांवाला दिसतात. वाहेरच्या दरवाजावर नांवाची पाटी असतेच असं नाहीं. पण असलीच तर एस्. एम्. अडसुळे किंवा धायगुडे एवढ्यानें भागत नाहीं. रेव्हेन्यु डिपार्टमेंट किंवा जी. डी. आर्टस् असलें एखादें विरुद असते. भिंतीला सायकल लावलेली असते. आळींतल्या गणेशोत्सवाचे सेक्रेटरी लोक असल्या घरांत रहातात. वंगल्यांत रहाणारीं माणसं सायकलवर टांग टाकून अध्यक्षासाठीं फुलाचा तुरा आणणारे सेक्रेटरी होत नस-तात. ते अखंड पांच रुपये देऊन उत्सव कमिटीचे आश्रयदाते होतात किंवा मग उपाध्यक्ष. अध्यक्ष मात्र वहुधा नाक्यावरचे गोपाळशेठ किराणा व भुसार मालाचे व्यापारी—शिवाय डाल्डाची एजन्सी... नाहींतर कापडवाले गोणतेकर किंवा वार्शीकर असल्या आडनांवाचे एखादे वाळासाहेब. असल्या घरांतून वाडवडलार्जित पेशातून पांढर-पेशांत नुकतींच शिरलेलीं माणसं रहातात. राजाराम, सयाजी, लाडोवा असल्या नावांतून अरुण, शीमा, मीणा, शुवास असल्या नांवांत त्यांची दुसरी पिढी सरकली आहे. आतां सुनांचीं नांवं राधा गंगा, गोदा न रहातां प्रभावती, रतनमाला असल्या वळणावर जायला लागलीं आहेत आणि तीन घरांत मिळून एक रेडियो देखील आला आहे. कांहीं वर्षांपूर्वी भल्या पहाटे असल्या घरांतून चिपळी एकतारीवर म्हाताऱ्या आवाजांत येग येग इटावाई न् माझ्ये पंढरीच्ये आई ऽऽ ऐकू येत असे. (म्हातारा गुदस्त सालीं नको नको म्हणतांनी वारीला गेला न् वारव्यानं मेला—सोनं झालं—) तरीहि नाक्यावरच्या देवळांत रातचं भजनाला जाणारे चारदोन भिडू तीनचार बिऱ्हाडांत मिळू[illegible]पड-तात. ही खरं तर घरं नसून बिऱ्हाडं आहेत. आमंत्रण देखील बिऱ्हाडीं या असं येतं. फ्लॅट्वर किंवा वंगल्यावर नव्हे. हीं बिऱ्हाडं आहेत. इथले नवरे वायकांना 'मंडळी' म्हणतात— अजून मिसेस् किंवा वाइफ म्हणायला शिकलीं नाहींत. आणि नवऱ्याला प्रामाणिकपणानें 'मालक' म्हणणाऱ्या वाया इथें सांपडतात. असल्या घरांत कॅलेंडरांतला शिवाजी फ्रेममध्यें जाऊन भिंतीवर वसलेला दिसतो आणि आल्या-गेल्यासाठीं म्हणून लग्नांत मिळालेलं 'टेनलेस'चं ताट न वाटी राखून ठेवलेली असते. इथली कारभारीण मालकांच्याच कचेरींतल्या जोशी कुळकर्णी नामक मित्रांना 'नळीचं जेवण वाढतांना थोडी लाजते. आणि ते गेल्यावर' 'वामनं नळ्या फोडायला शिकली कीं हो—' म्हणून दातांत पदर धरून हंसते. असल्या वैठ्या चाळींना लांवोडकं अंगण नसतं. सकाळीं तिथें पोरांची रांग 'शी'ला वसते आणि संध्या-काळीं त्यांची वडील भावंड इटिदांडू खेळतात. दुपारीं सुपांत वाळवणं पडतात. समोरच्या वाहत्या रस्त्याच्या धुळीचे ह्या घरांवर थर चढ-तात. पण तरीहि ही घरं लोभसवाणी. चार जातींचीं चार बिऱ्हाडं इथं गुण्या गोविंदानं नांदतात. ह्याच वैठ्या बिऱ्हाडांच्या घरांतून चाळी उठल्या. हीं माणसांचीं खुराडीं खरीं. पण प्रत्येक पक्षी निराळ्या रंगाचा. माणसांचे छापाचे गणपती करायचे कारखाने निघाले नव्हते तेव्हांपासून ह्या उभ्या आहेत. आपापलीं सुखं आणि दुःखं जाहीर-पणानें सांगत. जगाच्या निर्मात्याप्रमाणें चाळीचाहि निर्माता तिथें






वस्तीला राहिलेल्या माणसांच्या कधीं दृष्टीला पडत नाहीं. तो फक्त भाड्याचा भुकेला. ही घरं 'भाडें' एवढाच स्वच्छ उद्देश डोळ्यापुढें ठेवून बांधलेली.

## डोक्याची 'पगडी' खिशांत

'माणसाला जागा किती लागते ?' अशी एक टॉलस्टॉय्ची कथा आहे. सूर्यास्तापर्यंत धावून पायाखालीं आणशील तेवढी जागा तुझी अशा करारावर त्या पाहोम नावाच्या माणसाला जागा मिळणार होती. जागेसाठीं रक्त फुटेपर्यंत धांवला. तांबडं फुटेपासून तांबडं मिटेपर्यंत. आणि ठरल्या ठिकाणीं पोहोंचण्यापूर्वीच रक्त फुटलं आणि मेला. पुरायला जागा लागली ती पांच-साडेपांच फूट ! शेवटीं माणसाला तेवढीच लागते. हिंदू माणसाला तेवढीहि लागत नाहीं. ती देखील मेल्यावर. पण जितेपणीं जागा लागते. तिच्या शोधार्थ धांवावं लागतं. पोटामागें धांवणारीं माणसं शहरांपर्यंत जाऊन पोहोंचतात. खेड्यांतलं 'घर कौलारु' किंवा 'घर धाब्याचें' सोडून एके काळीं ह्या चाळींत त्यांच्या ट्रंक वळकट्या पडायच्या. मोकळ्या खोल्या वाट पहात असत. शब्दकोशांत 'पागडी' ह्याचा अर्थ शिरस्त्राण एवढाच होता. डोक्यावर घालायची 'पागडी' खिशांत हळूच कोंबण्याची कला माणसं शिकलीं नव्हतीं. 'जागा भाड्याने देणें आहे' असा जर बोर्ड आज कुणी लावला तर गर्दी पांगवायला अश्रुधूर सोडावा लागेल.

## घाऊक उत्पादन (आजचा युगधर्म)

आणि म्हणूनच ह्या घाऊक उत्पादनाच्या काळांत घरांचं देखील घाऊक उत्पादन सुरू झालं. घाउकतेचे सारे गुणदोष घेऊन आतां फुटकळ जगणं गेलं. कुठें राजकीय तत्त्वज्ञानाचा घाऊकपणा तर कुठें व्यापारी संस्कृतीला घाऊकपणा. घाऊक घरांत माणसांचे घाऊक ठसे मारलेले नमुने रहातात. दिल्लीला तर माणसाची पारख सरकारी खर्चांत मिळणाऱ्या ब्लॉकच्या क्रमांकावरून ठरते. आणि इथें माणसें एकमेकांना भेटत नाहींत. पंडारारोडवरचा डी वन् फ्लॅट वेलस्ली रोडच्या फ्लॅटला भेटतो. अकबररोडवरचा सी वन् बंगला औरंगझेब रोडवरच्या सी वन् बंगल्याला जेवायला बोलावतो. टू बेड रुम्स फ्लॅट वन् बेडरूम फ्लॅटकडे ढुंकूनहि पहात नाहीं. श्रीमती टू बेड् रुम्स् बालकनी ड्रॉइंग हॉल श्रीमती विजयनगर टेनेमेंट्सला चुकून भेटली तर नाकावर हातरुमाल घेऊन हंसल्यासारखं करून उपकार करते. आणि मिस् नंबर फाइव् बाबर रोड मास्टर नंबर टेन माननगर बरोबर ट्विस्ट करायचं रिफ्यूज करून नंतर एलेव्हन शाननगरच्या मागें धांवतें. शाननगर माननगरशीं बोलत नाहीं. आणि माननगर विनयनगरला टाळत असतें. इथल्या श्रीमतीजींच्या, श्रीजींच्या, कुमारजींच्या आणि कुमारीजींच्या चेहऱ्यावर इतर कितीहि रंग-रंगोटचा असल्या तरी मुळांतलं अध्यं हळकुंडानें रंगलेलं पिवळेपण नको त्यावेळीं फटकन् उघडं पडतं.

## हलतं फर्निचर

आतां हीं नंबरवालीं घाऊक घरं. चार चार मजल्यांची, पण मनानें उतरत उतरत जागण्याच्या एकाच पातळीवर आलेलीं. कसलंहि व्यक्तिमत्व नसलेलीं. घाऊक शिलाईतले कपडे घालणाऱ्या माणसांचीं. फॅशन नांवाच्या गोष्टीचे घाऊक छाप अंगावर उठवून घ्यायच्या घाईतलीं कुठें धांवतो आहोंत तें न कळतां धांवणाऱ्या माणसांचीं हीं खुराडीं. तशी आखींव, बेतशुद्ध, योजनाबद्ध पण बेचव. आणि जीवनाची उंची गाठण्याऐवजीं समान सपाटी शोधणाऱ्या नवसमाजांतल्या नवनागरिकांनीं भरलेलीं. रेडियोवरचं आयतं गाणं ऐकणारीं आणि चित्रपट पाहून आयत्या प्रेमाला कढ आणणारीं. जगण्यांतलं वेड हरपलेलीं. गांजलेलीं नसलीं तरी गंजलेलीं. किमान आवश्यक गोष्टींची देखील वाट पाहातांना थांबत थांबत आंबलेलीं. घाऊक व्याख्यानमालेंत कुणाचंहि कशावरचंहि भाषण निर्विकार मनानें ऐकणारीं. चिडायचं विसरलेलीं. त्या खुराडांतल्या किंचित् सुबक फर्निचर मधलं हें एकाच ठशाचं हलतं फर्निचर. हाडामासांनीं घडवलेलं. त्यांचीं हीं घरं—नव्हे टेनेमेंट्स. आल्या पाव्हण्याला 'ये' म्हणायची भीति. चिकटायचा एखाद वेळीं.

## मध आणि डंख नसलेलीं पोळीं

हीं घरं संपूर्ण बिनचेहऱ्याचीं. बिनस्वभावाचीं. त्यांना नांवं देखील नसतात. नुसतेच नंबर. मुख्य म्हणजे हीं घरं नसतात. जेवणाची, झोंपण्याची आणि बसण्याची सोय असलेले आडोसे. महिन्याच्या पहिल्या तारखेपासून शेवटल्या तारखेपर्यंतची वाटचाल एकाच तालांत करणारीं. मधमाश्यांच्या पोळ्यासारखीं. फक्त मध आणि डंख दोन्हीं नसलेली. त्यांतला फारच हौशी रहिवासी तान्ह्या पोराचा फोटो, बायकांच्या मासिकांत छापून येण्यासाठीं पाठवतो. तीं सगळीं मुलं देखील एकाच छापाचीं असतात. इतकंच काय पण बारा पोरांत सहा अरुण आणि सहा अरविंद निघतात. अतीच चतु[illegible]हिणी असली तर आपली आधुनिकता सिद्ध करायला मुलींचं नांव 'योजना' ठेवते आणि मुलाचं 'विकास'. एका अत्याधुनिक मातेनं मुलीचं नांव 'नेफा' असं ठेवल्याचंहि ऐकिवांत आहे. बिनचेहऱ्यांच्या ब्लॉकमध्यें रहाणारीं माणसं मापक महत्त्वाकांक्षा घेऊन जगतात. कधींतरी फ्लॅटमधें जाण्याची ! रोज रेडियो ऐकतात. मंडईत मटार स्वस्त होण्याची वाट पाहातात. घरांत शिवाजी—टिळक—गांधी—सुभाषबाबू—नेहरू—केनडी—यांच्यासारखे फोटो लावतात आणि हापिसांत जायला निघण्यापूर्वी साईबाबांच्या फोटोपुढें उदबत्ती लावतात. वर्तमानपत्रांतले भविष्य न चुकतां वाचतात. शनवार करतात. रात्रीं पत्तेसुद्धां खेळतात. त्यांची बायको मासिकांत आलेला नवा पदार्थ करते. (एकदां केकसुद्धां केला होता. 'चवीला धोंडसासारखा आणि पुडाच्या वडीसारखा दिसणारा' केक सासुबाईंना देखील आवडला होता. त्यांच्यासाठीं अंडं न घालतां केला होता.) असल्या बिनचेहऱ्यांच्या वस्त्या आतां सहकारी आणि सहकारी पायावर उभ्या राहिल्या. हीं घरं उभींच्या उभीं. डोक्यावर कौलारू छप्पर न घेतां पाण्याच्या टाक्या घेऊन. इथल्या बायका चुलीपुढें उभ्या. पुरुष दुधाच्या बाटल्या घेऊन उभे. कुणी स्वस्त धान्याच्या दुकानापुढें उभे. बसच्या थांब्यावर उभे— घरांच्या रांगा— माणसांच्या रांगा, दवाखान्यांतल्या डॉक्टरपासून ते देवळांतल्या देवाचं दर्शन घेण्यापर्यंत रांग धरल्याखेरीज गत्यंतर








न्नाहीं. कुठल्या ना कुठल्या तरी वसच्या रूटचा आधार घेतल्या खेरीज इथें कसलाच निभाव लागत नाहीं. सर्वे जन्तुः रुटिनः! ह्या घरांना आंगण नाहीं परसूं नाहीं. चाळीसारखी गॅलरी नाहीं. चाळीला निदान स्वभाव असत. तोंड असे. कधीं भांडखोर कधी प्रेमळ. लहरी असतं. मैत्र्या असत. वैरं असत. चार लोकांना एकत्र येऊन बोलायला एक भाषा असे. ह्या कॉलन्यांतून सुब्रह्मण्यम्च्या शेजारीं मालशे राहतो. चित्र्यांच्या शेजारीं सदारंगानी आणि मेहतांच्या खालीं मेनन. 'कॉलनी स्पोर्टिंग क्लब' काढतात. उपमंत्र्यांना उद्घाटनाला बोलावतात. मग ते भारताच्या भावनात्मक एकात्मतेविषयीं कांहींतरी सांगतात आणि जातात. मग कांहीं माणसं विकास मंडळ काढतात. तिथें होतकरु राजकारणी शिरतात. पी. एम्. पी. वाले मंडळ सुरूं करतात आणि कम्युनिस्ट शह देतात. जनसंघवाले आम्हीं हें आधींच ओळखलं होतं म्हणून सांगतात आणि कॉंग्रेसवाले कोण आहेत याचा पत्ताहि लागत नाहीं तरी त्या वार्डातून कॉर्पोरेटर निवडून येतो तो कॉंग्रेसचाच. ह्या घरांना 'गाळे' म्हणतात हेंच खरं. माणसं कोंबायचे गाळे. आदिमानवाच्या दगडी गाळ्याला गुहा म्हणत होते. आहार, निद्रा, भय, मैथुन अशी चार कर्मे करीत तो तिथें जगत असे. इथें हीं चारी प्राथमिक कर्मे पार पाडणेंहि अशक्य असते. भयानक धान्य टंचाईत आहार अवघड. काय मिळेल तें उकडून खावें म्हटले तर उकडायला धान्य असलं तर पाणी नाहीं. पाणी असलं तर तांदुळ पुढल्या आठवड्यावर गेलेत. निद्रा रेडियो बंद झाल्याखेरीज नाहीं. शिवाय रस्त्यांतलीं वर्दळ रात्रभर चालू. पहांटे उठलं नाहीं तर नळाचं पाणी जातं आणि केंद्राचें दूध संपतं. ह्या साऱ्याचं भय उराशीं बाळगीत जगतांना कुठल्या आशेनें नवे जीव जन्माला घालण्याचा [illegible] उरतो हें कोडें केवळ अनाकलनीय आहे.

## छापील संस्कृतीचा कन्व्हेअर बेल्ट

घाऊक उत्पादनाच्या युगांतलीं हीं पेटीबंद घरं. चौकोनी. कुठेंहि गोलाई नसलेली, अशी कुठल्या तरी पुढाऱ्याच्या नांवाचं 'नगर' होऊन राहिलेलीं घरं पाहिलीं कीं, परदेशांत मी एक रेडिओ तयार करायचा करखाना पाहिला होता त्याची आठवण होते. त्या कारखान्यांत इथपासून तिथपर्यंत एक रुंद पट्टा फिरत होता. कन्व्हेअर बेल्ट म्हणतात त्याला. एका टोकापासून तें दुसऱ्या टोकापर्यंत कामगार मुली हातांत छोटी यंत्रायुधं, स्क्रू, नट्स् वगैरे घेऊन उभ्या असत. आणि आपल्या पुढें ते अपुऱ्या स्थितींतलं रेडिओचं मॉडेल आलं कीं, एक एक भाग जोडीत. एक मुलगी आपली सुयाच जोडी. दिवसभर तिनें समोरच्या यंत्रांत सुई बसवून पुढें पाठवायचं. दुसरी एखादं बटण, तिसरी त्यांतला ट्रॅन्झिस्टर, चवथी कंडेन्सर, पांचवी असेंच आणखी कांहीं—करतां करतां एक एक अवयव जोडला जाई. निष्काम मनानें आणि शेवटीं संपूर्ण रेडियो होऊन बाहेर पडे. मग दुसऱ्या पट्ट्यावर चढली कीं, वरची रंगरंगोटी. मग तिसऱ्या पट्ट्यावर चढला कीं, कुणीं तरी वाजवून पाही. ठराविक आवाज आले की चालला पुढें. असें शेंकडों, हजारों रेडियो अपूर्णाकडून पूर्णाकडे—आणि पूर्णावस्थेंतून बाजाराकडे चालले होते. एकाच छापाचे. ठराविक खुंट्या फिरवल्या कीं, ठराविक केंद्रावरचीं गाणीं नाटकें भाषणें बडबडणारे !...ह्या पेट्यांतून तान्ह्या पोरांपासून ते त्यांच्या आई वडलांपर्यंत सगळ्यांची घडण कुठल्या तरी नव्या छापील संस्कृतीं तल्या कन्व्हेअर बेल्टवर चालली आहे असं मला वाटतं. भरभरून धांवणाऱ्या बसेस्, लोकलगाड्या, एस्ट्या, टॅक्स्या, शाळेच्या बसेस, मिरवणुका, झिंदाबादच्या, मुर्दाबादच्या, कीं जय- च्या, 'ह्या ग्रो ह्यां'च्या फेका शेंडा माराच्या—इच्छा असो वा नसो पोस्टर्स वाचलींच पाहिजेत— डोळे बंद करुन चाललात तर बसवाल्यांं सांगडाल— रेडियो ऐकलाच पाहिजे— तुमचा बंद कराल— खालच्या पानवाल्याचा चालू आहे— कान बंद कसे कराल ? वर्तमानपत्र ठाकलंच पाहिजे. मधळे घातलेच पाहिजेत—रोटरीची भूक मोठी—रोज नवं खाद्य शोधा भरा त्याच्या पोटांत—मग त्यांतून ढेकर येवो वा ओकाऱ्या. त्या पसरा कागदावर—टाका बरोबरीं—'मी वर्तमानपत्रं वाचणार नाहीं—' डब्यांतला शेजारचा मागून वर्तमानपत्र उघडतो—डोळे अक्षरांशीं दोस्ती करुन गेलेले— कळायच्या आंत वाचून जातात— 'अमका तमका पाजी आहे—' पुढल्या ओळी बुबुळांना खेचत नेतात. पळतां कुठें ? रानावनांत ? मग बेबींच्या लग्नाचं काय ? आणि हिनं कुठं जावं ? डॉक्टर म्हणतात ऍनिमिया आहे—केमिस्ट म्हणतो. बारा रुपयाच्या एका बाटलींतून मिळवतां येईल तेवढं रक्त मिळवा बायकोला—व्हिटामिन्स्ची बाराखडी ए पासून झेडपर्यंत पोहोंचली. आतां एला एवन्, बीला बीटू, बीफ्लेक्स अशीं नवीं भावंडं झालीं— कन्व्हेअर बेल्ट फिरतो आहे निमूटपणें—पोस्टर्स वाचायचे—अर्धनग्न देह पहायचे—वंदनीयांच्या निंदा वाचायचे—लबाडाच्या स्तोत्रांची पारायणं करायचे खास 'डोळे' घ्या लावून—नको असलेली गाणीं ऐकूनहि शाबूत रहाणारे कान घ्या चिकटवून-जाऊ नये तिथें पोटामागें नेणारे पाय घ्या जोडून—हृदयाचा ओलावा पिळून टाका—चांगले कोरडं करा—म्हणजे रस्त्यांत पडलेल्या महारोग्याची कींव येणार नाहीं—चीड येईल—डोकीं गहाण टाका म्हणजे बन्धावाईटाची चाड रहाणार नाहीं—'कीं म्हटलं कीं जय म्हणाला'... असल्या ह्या नवमानवाला रहायला नवनमाहती निर्माण करायला

**मकाशबंदी !**



" भोम्यानां आवाज झाला कीं सर्वांनीं कॉटवरती यावयाचे "









हव्यात. एकरंगी एकशिंगी समाजासाठीं ! नवसमाज निर्मिती ही अशी ठोंकळेबंद हवी. शिमिटाच्या ठोकळ्यांत बंद केलेली. स्वतंत्र विचारांऐवजीं नियतकालिकं, रेडियोवरचीं भाषणं– कचकड्यावरचं प्रेम ह्यातून नवी पोपटपंची करणारी. प्रत्येकाला मनासारखं वागायचं स्वातंत्र्य हवं म्हणून एकत्र कुटुंबाच्या जाचांतून बाहेर पडलेलीं. आणि घाऊक उत्पादनाच्या गुलामगिरींत नाइलाज नाइलाज म्हणत जखडलेलीं... कार्ड देईल ते धान्य, कार्ड देईल तें दूध, कार्ड देईल ती साखर. . . आयुष्यांतला एकेक दिवस म्हणजे रकाने भरण्याचा दिवस !– अदृष्टांत असतील तेवढे रकाने भरते की सुटले !... मागल्यांना एकच चिंता हा सरकारी किंवा सहकारी गाळा रिकामा तर नाहीं ना करावा लागणार ? मोठ्यानें रडायची सोय नाहीं. कुटुंब प्रमुख मेल्याचं कळेल. ("मेलेल्या भाडेकरूच्या मुलाच्या किंवा बायकोच्या नांवावर रहाते का हो जागा ?") 'घर' नांवाच्या गोष्टीची नुसती 'जागा' झाली. दिवसभर उभे राहिल्यावर रात्रीं आडवं व्हायला. भोजनाचं अन्न धान्य झालं. अन्नधान्य. माणसाला लागणारं कूड आईल. तशी घर, वास्तू, गृहस्थी यांची नुसती रहायची जागा झाली. परवां कुणीसं म्हणालं शाळेंतल्या बाकावर पोराला शिकण्यासाठीं बसायला जागा लागते त्याची सुद्धां पागडी भरावी लागते. पण असल्या ह्या घाऊक घरांतून छापील संस्कृतीच्या मुशींतली माणसं नांदत असतात. एका छापाचीं असलीं तरी तीं घरं आहेत. तीं अंगावर घेणाऱ्या धरतीला दुःख तरी नसावं.

## नगरदेवतेची नगरभवानी

धरती देखील गरतीच्या मानानं जगूं पहाते. तिला गरीबीची दुःखं ठाऊक आहेत. खेड्या पाड्यांतल्या झोपड्यांची तिला लाज नाहीं. तिथें तिची अब्रू चार वेशींच्या आंत आहे. झोपडीच्या दारीं एखादी गाय असते. सारवलेल्या भिंतीना साधेपणाची शोभा आहे. एखाद्या विमनस्कतेच्या क्षणीं तिला असल्याच झोपड्यांतून झालेलं ऋषींचं वास्तव्य स्मरत असेल, गुलाबाच्या रोपट्यानं कण्हेरीला हंसू नये. कण्हेरही लेकुरवाळीच असते. तशी बंगला मिरवणारी धरती कुडाच्या भिंतींना नाहींतर माडाच्या झापांचा आधार घेऊन उभ्या असलेल्या खोपराला हंसणार नाहीं. गांवची पांढर कांहीं अकुलीना नव्हे. पण तिथल्या नव्या पिढ्या शहराकडे धांवतात आणि झोपडपट्टी नांवाचे शहरच्या धरतीला जेव्हां फोड फुटतात त्यांत जेव्हां माणसं वळवळतात त्यावेळीं तिला आपलं कुलीनत्व गमावल्याच्या यातना होत असतील. शहरांच्या अंगाला फुटलेली ही खरुज. महानगरपालिकांच्या बेलगाम वागण्यातून नगरदेवतेची नगरभवानी झालेली पाहणं आतां तिच्या नशिबीं आलं आहे. मानवता, संस्कृति, सेवा, त्याग, सेदा असल्या शब्दांना फिदी फिदी हंसून दाखवणाऱ्या ह्या झोपडपट्ट्या ! न पचणाऱ्या तत्त्वज्ञानांतून अणि पैसे खायच्या डोहाळ्यांतून झालेल्या ह्या जिवंत ओकाऱ्या ! माणसांची ही जेट् वेगानें वाढणारी भुतावळ. फक्त निबरपणानें जगणारांचंच हें जग आहे असं कर्कश आवाजांत ओरडणारी ही माणसांचीं बिळं. गंगा यमुनेच्या कांठीच कशाला महानगराचा मैला वाहून नेणाऱ्या गटारांच्या कांठींसुद्धां माणसं वाढताहेत हें आक्रंदून सांगणारीं. संवेदनाक्षम मनाला झिणझिण्या आणणारीं. पाऊस येतो. आणि ती वस्ती वाहून नेतो. कधीं इतके दिवस खाल्या हप्त्याला जागून झोपलेला पोलीस कायद्याचा बडगा उचलणं भाग पडल्यामुळें ही वस्ती उचलतो. आणि मग 'जागा द्या. जाया द्या.' म्हणत ही प्रजा दाही दिशा धांवायला लागते. कधीं त्यांना पुढारी–सांपडतो–कांहीं पुढाऱ्यांना उद्योग सांपडतो–कधीं जागा सांपडते कधीं सांपडत नाहीं. फूटपाथांची भाडीं भरमसाट वाढताहेत. ती देणं परवडत नाहीं. घरांची भाडीं कुठलीं देणार ? टालस्टॉयचा पोहोम धांवेल तितकी जागा मिळणार म्हणून रक्त फुटेपर्यंत धांवत होता. आतां ही प्रजा फक्त अंगभर जागेसाठीं धावते आहे. जागेसाठीं तिथें घर नसतंच. कारण माणसं दिसतात म्हणून ह्या वस्तींत घर शोधायला जावं तर तिथें असतात फक्त आडोसे. कारण दारिद्र्याच्या शापाखालीं तळमळणाऱ्यांना देखील लाज असते. त्याना सारं कांहीं उघड्यावर टाकून जगतां येतं– तेवढी बायांच्या जातीला दिलेली लाज सोडून. ती नाहीं उघड्यावर टाकतां येत–एवढ्या किमान कारणासाठीं त्यांना आडोसा हवा–आणि पावसांत तीन दगडांची चूल विझूं नये म्हणून छप्पर. एरवी हवी फक्त जागा. डोक्यापासून तळव्यापर्यन्त जिथें दुमडतां येईल तिथें दुमडून झोपण्यासाठीं.

## चंद्रभागेचं वाळवंट

माझा घरचा शोध इथें संपतो आणि माणसांचा सुरू होतो. असल्या वस्त्यांतून देखील जेव्हां पेट्रोमॅक्स् लागतो आणि हळदीनें पिवळी झालेली वधू वरातींतून बाहेर पडलेली दिसली कीं, राख झालेल्या आशेंतून चिमुकला फिनिक्स् उडतो. त्या अनोळखी वधूला जाऊन नव्या घरांत सुखानं नांद पोरी असं म्हणावसं वाटायला लागतं. तिच्या आईच्या डोळ्यांतले अश्रू ओळखीचे वाटतात....आणि संपूर्ण-पणें रंजल्या गांजल्या अशा त्या वस्तींतून रात्रीं जेव्हां तुकोबाचा अभंग ऐकूं येतो त्यावेळीं वाटतं कीं, अनेक एअर कंडिशण्ड बेडरुम्समध्यें जिवाचीं नातीं बँकबुकांतून शोधणारीं जोडपीं उघड्या वैराण वाळ-






हें नवें प्लेटो २२२ पेन नुसतं हातांत धरून तर पहा— कसं चपलख धरतां येतं, नाहीं? याची फ्लश कॅप हलकेंच थोडी वरच्या बाजूला सरकवा—किती झटकन् सरकते नाही! लिहायलाही लागलात? उत्तम! लिहिताना आनंद होतो आहे तो तुमच्या मुद्रेवर दिसतोच आहे. या पेनचं सोनेरी टोपण पाहिलंत कीं नाहीं? ते तसंच रहावं म्हणून अनॉडाईझ्ड् करण्यांत आलं आहे. शिवाय चित्ताकर्षक रंग... शाई भरण्याच्या अनेक तऱ्हा! किंमत? अवघी ५/५० रुपये.





**plato 222** प्लेटो २२२
म्हात्रे उत्पादन

एकमेव विक्रेते: **दि बेस्ट फाऊंटन पेन डेपो**, ७९ देवकरण मॅन्शन, प्रिन्सेस स्ट्रीट, मुंबई २.










वंटांत पडल्यासारखी तडफडतात आणि इथल्या ह्या वैराण भकास आकाशाच्या छताखालीं रोगासारख्या वाढणाऱ्या वस्तीचं रात्रीच्या त्या दोन घटकांसाठीं कां होईना पण चंद्रभागेचं वाळवंट झालें आहे. आयुष्याची परवड झालेल्या त्या जीवांना कोणाचे तरी बोल गार गार गार गार करताहेत. जीवाला गार करायला कांहींतरी हवं—त्या वस्तींतले कांहीं जीव भट्टींत विसावतात—कांहीं भक्तींत. मग ती वस्ती दिसेनाशी होते. दिसतात फक्त माणसं कशांत तरी विसावलेली. कशासाठीं आपण जगतों हें त्यांना कळत नाहीं म्हणून कशासाठीं मरायचं हेंहि कळत नाहीं.

## आणि मग पुन्हां जंगलांत ?

पण मग त्या झोपडपट्टी आणि पायपट्टीवाल्यांनाच का ? कुणा लेकाला कळलंय् ? ज्यांना हा जीवघेणा प्रश्न सतावायला लागला तें घरं सोडून जंगलांत गेले ! हाच प्रश्न स्वतःला विचारीत आदि-मानव शहाणा झाल्यासारखं वाटून घरं बांधायला लागला. आणि घरांत शतकानुशतकं राहून शहाणं होतां येत नाहीं म्हणून अधिक शहाणा होण्यासाठीं पुन्हां जंगलांत गेला ! मग शेवटीं हा प्रवास आहे कुठें ? जंगलाकडून घराकडे की घराकडून जंगलाकडे ? आणि असल्या विचारांनीं मनांत एकदां घर केलं कीं, ते मन कुठल्याच घरांत सुखानं नांदूं शकत नाहीं. म्हणून शहाण्यानें सुखानें नांदण्याचा आणि 'घर' नांवाच्या दगडाविटाच्या, शेणामातीच्या, फळकुटं झांवळ्यांच्या आडोशांत तें सांपडेल याचा विचार सोडून द्यावा. शेवटीं घरं माणसांसाठीं असतात माणसं घरासाठीं नसतात हेंच खरं ! —कदाचित् !

• • •

[ पान ३७ वरून—एव्हेन्यूज एन्ड स्ट्रीट ]

ठिकाणें मी अशा असोशीपणानें पाहिली होती कीं, जणुं कांहीं हें सारे मी आज पाहिल नसते तर पुन्हां केव्हां हें मला पहातांच आले नसते ! उत्साहाच्या भरांत ह्या भ्रमंतीचे कांहीं वाटले नव्हते. पण आतां हॉटेलवर आल्यावर पाय बोलूं लागले होते. घशाला कोरड पडली होती. हीं तहान बीअरनें भागण्यासारखी नव्हती. तसें असते तर आल्याआल्याच मी वड्वायझरचा कॅन तोंडाला लावला असता. अशावेळीं खोलीवर स्कॉचची बाटली नसावी ह्याचें मला खरेखुरें वाईट वाटलें. आतां तंगडतोड करीत पुन्हां बाहेर पडण्याशिवाय दुसरे गत्यंतर नव्हते. तसा हेन्री हडसन बारमधें मी जाऊं शकत होतो. पण तिथें जाऊन ड्रींक घेणें माझ्या खिशाला परवडण्यासारखे नव्हते. शिवाय तिथल्या उच्चभ्रू वातावरणातल्या मॅनेरीझमस् आणि एटीकेट सांभाळतां सांभाळतां ड्रींक घेण्यांतली अर्धी मजा निघून जाणार होती. त्यापेक्षां थोडे चालावे लागले तरी हरकत नाहीं असा विचार करीत मी अंगावरचे जॅकेट काढून टाकले घाईघाईत बॉश घेतला. पुलओव्हर चढवला आणि ट्रॉवझरच्या पॉकेटमधले वॅलेट आणि पासपोर्ट चांचपीत बाहेर पडलो.

अॅव्हन्यू क्रॉस करुन मी रुझवेल्ट हॉस्पिटॅलपाशीं आलो आणि बार दिसला तेंव्हां भरभर चालूं लागलो. काऊंटरसमोरच्या उंच स्टुलावर बसत मी डॉलरचें बील काऊंटरवर ठेवले आणि म्हटलें,

"Ballantine."
"On the vocks ?"
"No. With Soda."
"Ice ?"
"Yes."
"Crushed or cubes ?"
"Cubes."

वॅलेंटाईनचा पेग ग्लासांत रिकामा झाला. सोडाफाऊंटनमधून त्यांत माफक सोडा मिसळला गेला. आईसचे क्यूब्स् ड्रींकवर तरंगू लागले तसा मी खुषींत आलो आणि ग्लास उचलून घेतला. टी. व्ही. वरचा कार्यक्रम पहात घुटक्या घुटक्यानीं स्कॉचचा आस्वाद घेऊं लागलो. थकल्या भागल्यावर असें चारचौघांत बसून हंसत खेळत सावकाशपणें ड्रींक घेण्यासारखी दुसरी मजा नाहीं. स्कॉचची उष्णता रक्तांत मिसळूं लागली कीं, पायांत मणाच्या बेड्या असल्या तरी त्या फुलांच्या आहेत असें वाटूं लागते. क्षणा क्षणाला शरीर कसें हलके फुलके होऊं लागते ! हलके फुलके झालेले शरीर तरंगू लागेल असें वाटते आणि तसे कांहीं होऊं नये म्हणून ड्रींक मागून ड्रींक पोटांत रिचवले जाते. आतां मलाही बरें वाटूं लागले होते. पहातां पहातां तिसऱ्या ड्रींकला सुरुवात झाली होती. आजूबाजूचे वातावरण हलूं लागले होते. माणसांची वर्दळ आता वाढूं लागली होती. गलका वाटावा अशा तऱ्हेनें माणसें एकमेकांशीं बोलत होती. व्होडका मार्टिनी, स्कॉच, व्हर्मथ अशी तऱ्हेतऱ्हेच्या ड्रींक्सचे ग्लासेस आणि बीअर ऑन टॅपचे फसफसते मग्ज् भराभर पुढें सरकवतांना बारटेंडरची धांदल उडत होती. सिगारेट स्लॉट मशीन एकसारखे खटखटत होते. बोलींगभोंवती माणसें घोळक्यानें उभी होती. सफेद चेंडू टार्गेटला भिडत होता आणि खट् खट् आवाज करीत पिन्स मागें सरकत होत्या. जिंकत होते ते हंसत होते आणि हरत होते ते जिंकण्याच्या इर्षेनें पुढें सरसावत होते. साऱ्या वातावरणालाच आतां गति आली होती. माझ्या नकळत मीहि ह्या गतींत आतां ओढला गेलो होतो. स्वतःशीं हंसत होतो. शेजारच्या चार्लीशी गप्पा मारीत होतो. मधून [illegible]र-टेंडरच्या पातळ ओठांकडे मोठ्या धिटाईनें पहात होतो. तिला जवळ बोलावून पुन्हां पुन्हां ड्रींकची ऑर्डर देत होतो. ड्रींग हे वेटे चुंबनासारखे आहे. एकदां घेऊन पुरेसें होत नाहीं. पुन्हां पुन्हां घ्यावें असें वाटते आणि तरीहि समाधान होत नाहीं. ड्रींकचा ग्लास ओंठाला लावीत मी चार्लीचे बोलणें ऐकूं लागलो. इतका वेळ आमच्या हलक्या फुलक्या विषयावर गप्पा चालूं होत्या. पण पहातां पहातां तो एकदम राजकारणांत शिरला. गंभीरपणें बोलूं लागला. अशा मजेच्या वेळीं कुणीं असा गंभीर सूर लावला कीं, मी अस्वस्थ होतो. पण चार्लीचे बोलणें मला थांबवतां येणें शक्य नव्हतें. त्याच्या बोलण्याकडे माझें लक्ष आहे असें दाखवीत मी बारटेंडरच्या अवयवांचे मनांतल्या मनांत विती घालून माप घेण्यांत गढून गेलो. पण तिच्या शरीराच्या वक्र रेषांत माझें मन घोटाळूं द्यायला तो तयार नव्हता. आपल्या बोलण्या-





कडे त्यानें माझें लक्ष खेचून घेतले. अमेरिका, इंडिया, रशिया, अशी मोठमोठी नांवे तो घेऊं लागला. त्याला कसें आवरावे तें माझ्या लक्षांत येईना. माझ्या दुसऱ्या बाजूला बसलेल्या माणसाला संभापणांत ओढून बोलणें जरा हलके फुलके करावे अशा इराद्यानें मी त्याला म्हटले, "Look Johnny, you hear what he says?" पण जॉनी माझे बोलणें ऐकण्यापलीकडे गेलेला दिसत होता. तो कांहीं बोलेल अशा अपेक्षेनें मी त्याच्याकडे पाहूं लागलो तोंच त्यानें विचारले,

"Are you an Indian?"

"Yes"

तो आता काय बोलतो ते ऐकण्याकरतां मी कान टवकारले पण माझ्याकडे दुर्लक्ष करून स्वत:शींच कांहींतरी पुटपुटत त्यानें हातांतला ग्लास ओंठाला लावला. ह्याच्या नादीं लागण्यांत अर्थ नाहीं हें लक्षांत येऊन मी पुढ्यांतला ग्लास हातांत घेतला. पण चार्ली आतां पुरता रंगात आला होता. वाद घालण्याची त्याला खुमखुमी आलेली दिसत होती. अमेरिका इंडियाला मदत करते इंडिया कम्युनिझमशीं हातमिळवणी करतो ते त्याचे बोलणें ऐकून मी कमालीचा अस्वस्थ झालो. त्याचे बोलणें मी खोडून काढणार तोंच आमच्या संभाषणांत इंटरेस्ट घेत जॉनी म्हणाला, "He is right."

"What do you mean?"

"He is right" आणि अत्यंत कुत्सितपणें हंसत तो माझ्याकडे पाहूं लागला. चार्लीच्या बोलण्यापेक्षां जॉनीच्या हंसण्याचा मला भयंकर राग आला. आवाज चढवीत मी विचारले "What makes you laugh?"

"What else?"

"Meaning?"

"You bloody Indians."

हातांतला ग्लास मी तसाच काऊंटरवर टाकला. स्टुलावरून खालीं उतरलो आणि त्वेषानें त्याची कॉलर पकडीत म्हटलें, "Say it again!" तो बोलला होता ते पुन्हां बोलू लागेल म्हणून मी वाट पहात होतो. त्याचे बोलणें पुरे व्हायच्या आंत एक सणसणीत चपराक लगावून द्यायला माझे हात शिवशिवत होते. आग ओकीत मी त्याच्याकडे पहात होतो आणि कॉलर खेंचून त्याला घुसळीत होतो. मी त्याला आतां सोडणार नाही हें त्याच्या लक्षांत आले तेव्हां तो म्हणू लागला,' "Leave me alone."

पण मी आतां त्याला असा तसा सोडायला तयार नव्हतो. आव्हान देत मी ओरडलो, "I dare you say it again" - आणि मी त्याच्यावर झडप घालणार तोंच कुणीतरी मला बाजूला ओढले. पहातां पहातां सगळा बार आमच्या भोंवती जमा झाला. गुरगुरत मी त्याच्याकडे पहात होतो आणि कुणींतरी मला विचारीत होते, "What happened?"

माझ्या भोंवतीं लोकांचे कडे होते. पण ते माझ्या बचावासाठीं नव्हे! माझ्यापासून त्याचे संरक्षण व्हावे म्हणून! आणि त्याच्या बाजूचे हे यांकीज् पुन्हां पुन्हां काय झाले म्हणून मला दरडावीत होते. 'न्याय होणार असेल तर सांगतो' असें म्हणत मी घडला प्रकार सांगितला तेव्हां दोघेचौघे हंसल्याचे माझ्या कानावर आले. ह्या सगळ्यांवर तुटून पडावे असा विचार मनात चमकून गेला. कोण हंसले ते बघण्याकरितां मी मान वळवणार तोंच कुणींतरी म्हणाले, "No American would say that."

"He did. Ask him."

पण त्यानें चक्क कानावर हात ठेवले. आपण असं कांहीं बोललो नाहीं असं तो सांगूं लागला. काय करावे मला कळेना. भोंवतालचे सगळे लोक आतां माझ्याही विरुद्ध होते. माझ्या अंगावर आतां केव्हां हात पडण्याची शक्यता होती. निकराचा प्रयत्न करीत मी म्हटलें, "You did. you liar."

"No."

"You did" मी चमकून पाहूं लागलो. गर्दीतून कुणीतरी बाई एकदम पुढें झाली आणि माझी बाजू घेऊन बोलूं लागली. भोंवतालच्या लोकांना सांगूं लागली, "He did say that."

जादूची कांडी फिरावी त्याप्रमाणें वातावरण एकदम बदललें. त्यांच्यातलीच एक बाई माझ्या बाजूनें आणि त्याच्या विरुद्ध साक्ष देत होती. लोक आतां त्याला घेरूं लागले. काय करावे माझ्या लक्षांत येईना. तोंच जिनें मला सोडवले होते ती माझ्या पुढ्यांत येऊन उभी राहिली. तिच्या चेहऱ्यावर प्रकाश पडला आणि ओळख पटून मी एकदम चमकलो. माझ्या तोंडून एकदम आश्चर्योद्गार बाहेर पडला,

"You!"

"Yes" "माझ्या दंडाला स्पर्श करीत ती म्हणाली, "Come"

तिच्या बरोबर मी बारच्या बाहेर पडलो. सकाळीं मी तिला तोडून टाकली होती आणि आतां तिनेंच मला वाचवले होते. माझ्या सहाय्याला ती अचानकपणें धांवून आली होती आणि तिनें माझा बचाव केला होता. माझ्यावर तुटून पडायला टपलेल्या लांडग्यांपासून मला सोडवले होते. आणि आतां माझ्या दंडाला धरून ती मला बारपासून दूर नेत होती. नेईल तिकडे जाणें आतां भाग होते. तिचे कोणत्या शब्दांत आभार मानावे












ते माझ्या लक्षांत येईना. न बोलतां आम्हीं अॅव्हन्यू क्रॉस केला. मी तिच्याकडे पाहूं लागलो तेव्हां तिनें विचारलें,

"काय पहातां ?"

"तुझं सौंदर्य."

"पण मी तर सकाळचीच आहे."

"खरं आहे. पण सौंदर्य नाना प्रकारचं असतं. निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या प्रकारं खुलतं."

"Oh, I see!" ती खळखळून हंसली आणि मला घेऊन हेन्री हडसन हॉटेलच्या बाजूला वळली. सगळीं सूत्रें तिनें आतां आपल्या हातांत घेतली होती. सकाळच्या प्रकारांतला कडवटपणा नाहींसा करावा अशा हेतूनें मी म्हटलं, "तूं मला माफ केलं पाहिजेस"

"कशाबद्दल ?"

"सकाळीं मी तुझं नांवही विचारलं नाहीं"

"कांहीं हरकत नाही"

"पण आतां ते कळावं अशी इच्छा आहे"

"सगळ्याच इच्छा कुठें पुऱ्या होतात ?"

"अशा वेळीं असं लागट कशाला बोलतेस ?"

"रागावलांत ?"

पण तिच्या प्रश्नाचं उत्तर न देतां मी तिच्या कमरेभोंवती हात टाकला. तिनें प्रतिकार केला नाहीं. ती प्रतिकार करणार नाहीं ह्या विषयीं माझी खात्री होती. पण माझा हात तिच्या कमरेभोंवती पडला तेव्हां ती शहारली. मी सुखावलो आणि तिच्यावरोवर चालूं लागलो. चालतां चालतां आम्हीं हेन्री हडसनच्या दारांत आलो. माझ्या बरोबर हंसत खेळत ती आंत येईल अशी माझी कल्पना होती. त्या बाबतींत कांहीं विचारावेंही लागणार नाहीं असें मला वाटत होते. पण माझ्या बरोबर आंत न येतां ती रेंगाळूं लागली तेव्हां मी विचारलं, "What is the matter?"

"Nothing."

"Come honey."

"It's getting lak."

"Oh, No! Night is still young." तरीही ती प्रतिसाद देईना तेव्हां मी गोंधळलो. सकाळीं तिनें पुढाकार घेतला होता आणि मी नकार दिला होता. आतां मी पुढाकार घेत होतो आणि ती मला खेळवीत होती. प्रेयसीनें प्रियकराबरोबर वागावें तसें हें चालले होते. ह्या खोटेपणांतही मजा होती. कारण ह्या खेळाचा शेवट ठरलेला होता. तिच्या बाजूला झुकत कानांत बोलल्याप्रमाणें मी म्हटलें, "खोलीतला माझा बेड विस्कटला आहे" आणि हंसल्यासारखे करीत विचारले

"बेड सारखा करायला तूं वर येणार नाहींस काय ?"

माझा प्रश्न ऐकूं न आल्याचें दाखवीत तिनें विचारले, "काय म्हणालांत ?"

मनांतली गोष्ट हजार वेळां पुरुषांकडून वदवून घेण्यांत बायकांना मजा वाटत असावी. इतका वेळ माझे सगळे बोलणें तिला नीट समजत होते. नीट ऐकूं जात होते. आणि आतां मुद्याचा प्रश्न ऐकूनही ती विचारीत होती. 'काय म्हणालांत ?'

"बेड तयार असल्याचं सांगायला तूं वर येणार नाहींस काय ?"

"येईन."

"मग आता विलंब कशाला?" माझ्या प्रश्नावर ती हंसली आणि म्हणाली, "जरूर येईन, पण उद्यां सकाळी."

तिचे हें बोलणें अनपेक्षित होते. त्यामुळें मी एकदम चमकलो आणि विचारले,

"Are you sure?"

"Yes sir" आणि एकदम गुडनाईट करून ती चालूं लागली. चालतां चालतां शीळ घालूं लागली.

सकाळीं मी तिला नकार दिला होता तेव्हां तिच्या ओंठी हीच शीळ होती. हीच शीळ होती. •••




# रॅशनल आर्ट अॅन्ड प्रेस प्रायव्हेट लिमिटेड



रॅशनल बिल्डिंग,
९५१ ए, न्यु प्रभादेवी रोड,
मुंबई २८, डी डी
टेलीफोन: ४५१९७१·६५३९८








**'तुम तो सुर की तान हो !" बंदिशीचा अंत्रा पूर्ण झाला. संगीताच्या मेहफिलींत मेहरबान बादशहा ठरला. वैशाखीच्या चांदर्ण्यानें त्याच्यावर विजयाची, शाबासकीची बरसात केली. पण................**



"लागे तोरा मन्दा ओ गिद्दियाँ
लागे तोरा मन्दा नी ओ ॥"

बरसातीत अंथरलेल्या गालिच्यावर मेहेरबान पहाडासारखा पसरला होता आणि त्याचं डोकं मांडीवर घेऊन चुन्ना पहाडींतला 'हीर' गात होती. वैशाखीची रात्र....

"हरिपूरला कुठलें आलेत गिद्दी.......वेडी कुठली !"

हंसून चुन्नाकडे न पाहतां मेहेरबान पुटपुटला. माहीत आहे ते कुलू खिडींत असतात तें; पण

"इथं झोपलाय तो नाहींतरी गिद्दीच आहे की !" दोघेंहि खदखदून हंसली. हंसता हंसतांच चुन्ना पुढं गाऊं लागली....

"चुक्की चुक्की अडियाँ मे अन्दर वार जांदियाँ
भुंजे न लग्गी जाये पंजा नी ओ
लागे तोरा मन्दा ओ गिद्दियाँ ! !"

शेवटची ओळ गातां गातां चुन्ना मेहेरबानच्या कानाजवळ पुटपुटली........

"आज पायांचे तळवे खूप दुखताहेत. सुख खुपतंय. कां ग ? काय झालं ? मावशीनं कुणी जमीनदार गांठला कां तुझ्यासाठीं ? नूरपूरच्या वलुच्याला आज गांवांत पाहिलं होतं मी !"

"हे रे काय ? निगोडा कुठला. तुला तुझ्या त्या खाटीकखान्या-शिवाय कांहींच समजत नाहीं. आज मी ना पहाड देखील एडियाँ न टेकवताच चढून आले !"

"अग पण हें एवढं कां ? कशासाठीं ?"

"म्हणूनच ना मी तुला निगोडा, अन्जाणा म्हणते ? माझी पावलं पहाना. मेहंदी कशी रंगलीय. फसफसून आलीय."

"आणि ती गळून पडू नये म्हणून तू दिवसभर एडियाँ जमि-नीला टेकवली नाहींस. हो ना ?"

"अऽहूं: तू मागं म्हणाला होतास गढ़वाली वायका मदमाती असतात त्यामुळं त्यांची मेंदी खूप रंगते."

होच मुळी ! खोंट का तें ? मी स्वतः पाहिलंय. ती वावरी, मेंदीच्या झाडाखालीं अुभी राहून तद्दन हातांत पानं घेऊन पंजांना आणि पावलांना चोळायची, आणि पांच मिनिटांत वेड्या फाग खेळून आल्यासारखी रंगायची !

"माझी मेंदी मात्र तूं कधींच पहात नाहींस."

चुन्ना फुरंगटून, पण मेहेरबानला दिसतील अशा तऱ्हेनें पावलं

अनुक्रमणिका

आणि हाताचे पंजे एकावर एक दुमडून ठेवीत म्हणाली.

"अरे वा: आज तर तूं रांझा दिसतेस !" मेहेरवान तिचे ते लाल चुटुक हात हातांत घेत म्हणाला.

वैशाखांत चुकून पडणारा पाऊसहि एवढ्यांत वरसाती भिजवूं लागला. मेहेरवान व चुन्ना दोघंहि भिजूं लागली.

"चुन्ना तुझ्या भिजलेल्या गालावरची ही खळी. . . ."

"ए : हळू बोलना. खालीं मावशी आहे. निलंज कुठला. भूल भुलैय्या !"

चुन्ना दामन गालांवरून खालीं ओढत पुटपुटली—

"व्रिंदावनच्या भूलभुलैय्याइतकं आपलं कुठलं आलयं नशीव? आम्ही हें असं दुरूनच पहायचं. झेलमची मंजधार किनाऱ्यावरूनच पहायची !"

मेहेरवान अुत्तरला, "जमालला तुझी मावशी म्हणत होतीं कीं तुझी शादी वलुची जमीनदाराशीच करणार. वर असंहीं म्हणाली, खाटिकखान्यांतला चीतड फेंकण्यासाठीं चुन्नाला मी वाढविलेलं नाही !"

"आणि तुम्हीं आणून दिलेला गोश मात्र हक्कानं सगळेजण हादडत असतात !"

"अग तेच कां, माझे मामू आणि त्यांची ती रियाझ करणारी पोरं देखील. माझ्याच गोशवर ताव मारतात आणि आठ आठ तास रियाझ करून वर मला खाटीक म्हणून हिणवतात. तमीज नसलेल्यांना काय करायचं ?"

"आणि तुझी खैरकी आदत मात्र सुटत नाही."

"हरिपूरचे सगळे लोक तुझ्या खाटीकखान्याकडे बोट दाखवून म्हणतात, अलीया फतूंचा भाचा खाटकाचा धंदा करतोय. गोश विकतोय !"

"हो. हो. गोश विकतोय. मग काय अलीया फतूंच्या भाच्यानं गायलंच पाहिजे ! दिल सांगत नसला तरी गायलं पाहिजे ?" मेहेरवान रागानं चुन्नाकडे पहात अुसळला.

चुन्नाहि निश्चयानंच बोलत होती.

"हो. मी म्हणते हो ! गायलंच पाहिजे. गवय्याच्या मुलानं आपलं खानदान चालवलंच पाहिजे. आणि दिल लागत नाहीं असं जे तूं सांगतोस ते साफ खोटं आहे. तुझा दिल गाण्याइतका कशांतच रमत नाहीं हे पण मला माहीत आहे !"

"चुन्ना माझ्या संगीताबद्दलच्या कल्पना अफाट आहेत. ब्रम्हांडाला व्यापून राहणाऱ्या आहेत. त्या सतत येतात. पण प्रत्यक्षांत उतरवतांना गळा, आवाज आणि हा देह तोटका पडतो. थिटा ठरतो. कुणीहि आजपर्यंत न लावलेला सूर, कुणालाहि साक्षात्कार न झालेला सूर माझ्या कल्पनेत आहे. सिंधूचा, अथांग सिंधूचा घुमारा माझ्या खर्जांत यावा असं वाटतं, मेघांचा गडगडाट माझ्या गमकेत आला पाहिजे."

"चुन्ना, कल्पनेतलं प्रत्यक्षांत उतरत नाहीं आणि माझ्या कल्पनेंत काय आहे हें इतरांना समजत नाहीं. ही कल्पना ही प्रतिभा एवढी विशाल. ती साकार होणं या जन्मीं तरी शक्य दिसत नाहीं. कयामत ही माझ्या ख्यालाची सम आहे. वर्षं या माझ्या तालाच्या मात्रा आहेत. दिवसरात्र ही माझ्या सुरांची आस आहे. चुन्ना, चुन्ना या कल्पना ऐकून तूं देखील मला वेडा म्हणशील. कुणाला न समजणारी ही भाषा, हे संगीत मी गात असतो. ऐकत असतो. इथं साधनांची आवश्यकता नाहीं, श्रोत्यांची गरज नाहीं. वाऱ्याची झुळूक येते, वाहवा देवून जाते. झेलम् सुरा-सुराला दाद देते. माझं हें कल्पना संगीत. सर्व श्रेष्ठ संगीत !"

"माझ्या मामूची पोरं तासन् तास रियाझ करतात. कल्पनेंत असलेलीं सुरांची किरटीं लों बांधून पुसून पुन्हां पुन्हां गात बसतात. वालीद गाऊन गेले तेच हे पण गातात. तोच यमन, तोच मालकंस, तीच तोडी; यार आपल्याला तर ऐकायचा देखील कंटाळा येतो. त्या याकूबला परवां झपतालाची नववापट कशी-बशी जमली तर पतियाळाची गादी मिळाल्यासारखा नाचूं लागला. चुन्ना, झेलमच्या किनाऱ्यावर जमणारी पोरं रेतीचे किल्ले बांधतात ते पाहिले आहेस ना. एकदां उभा बांधायचा, दुसऱ्यांदा आडवा बांधायचा, पुन्हां पुन्हां बांधून मोडायचा, त्यांतच आनन्द मानायचा, आणि दुसऱ्यांना पण मानायला लावायचं, आपण तर लहानपणापासून या गोष्टींनीं हैराण झालो. आपल्याला याचो मनस्वी कंटाळा आहे. कितीतरी वर्षं या ताल व सुरांच्या छोट्याशा चौकटींत बांधून घातलेलं हें संगीत; ह्या चौकटी आतां उखडून टाकल्या पाहिजेत."

मेहेरवान बोलतच होता. चुन्ना व तो झिरझिरणाऱ्या पावसानं भिजून गेली होती. दोघांचंहि याकडे लक्ष नव्हतं. इतक्यांत ढगांचा गडगडाट सुरू झाला. घाबरून चुन्ना मेहेरवानला बिलगली.




—जितेन्द्र अभिषेकी

मेहेरवान अस्वस्थ दिसत होता.

"आज मामूनं मला मैफिलीतून घालवून दिलं चुन्ना !" म्हणाला—"तुला इथं बसण्याचा अधिकार नाहीं." मामू मेघ गात होते. मी गालांतल्या गालांत हंसलो. त्यांच्या सुरांचं दारिद्र्य पाहून हंसलो. मामू म्हणाले, "तुला खाटकाला यांतलं काय कळणार? गवय्यांच्या बैठकींत बसायचा देखील तुला हक्क नाहीं. . . . . . . !"

"मग तूं काय उत्तर दिलंस त्यांना ?"

"मी त्यांना सांगितलं, मेहेरवान पण गवय्याची अवलाद आहे. तुम्ही जें चाळीस वर्षांच्या रियाझानं गातां तें मी पांच वर्षांत गाईन. गाऊन दाखवीन आणि सगळे हंसले. त्यांच्या गाण्यासारखंच बदसूर हंसले. आजपासून पांच वर्षांनीं जो वैशाखी येईल, तिला सामना ठरला आहे. त्या दिवशीं मी गाणार . . . . . !" मेहेरवान पुन्हां विचारांत बुडून गेला. . . . . .चुन्ना त्याच्याकडे समाधानानं पहात होती.

मेहेरवान एकाएकीं अुठून बसत म्हणाला—

"चुन्ना. मी तुला यापुढं भेटूं शकणार नाहीं. मला उद्यांपासून रियाझ करायचा आहे. वैशाखीला गाण्यासाठीं. मामूला हरविण्यासाठीं. त्यांच्या त्या मस्तवाल पोरांना नसीहत् शिकविण्यासाठीं.







अनुक्रमणिका

गाणं कसं अगावं हें दाखविण्यासाठीं!"

"पण यासाठीं माझी भेट टाळण्याची काय जरुरी?" चुन्ना घाबरून म्हणाली.

"नाहीं चुन्ना, माझं जगणं हेंच अद्वितीय संगीत आहे. या लोकांमुळें मला माझं जीवन संगीत गाणं कठीण होऊन गेलंय, पांच वर्षाच्या रियाजानं या लोकांना चोख जवाब देऊन, माझं अथांग संगीत गाण्यासाठीं मी कायमचा मुक्त होणार आहे. माझं जगणं हें संगीतापेक्षांहि मोठं आहे चुन्ना. तें निष्कंटक जगण्यासाठीं, भोगण्यासाठीं; मी एकदांच, अखेरचं गाणार!"

कांहीं वेळ दोघंहि स्तब्ध होतात. दुरून कुठून तरी हरियाना गाईच्या वासराचा भेदरलेला आणि गळा घोटल्याचा आवाज येतो. चुन्ना तिकडे जाऊन येते.

"काय झालं ग?"

"कुठं काय झालंय?"

"आवाज ऐकला, गळा घोटल्याचा."

"लांडगे वासरूं घेऊन गेले. जगलं असतं तरी देखील तुझ्या खाटिकखान्यांत आज ना उद्यां आलंच असतं कीं!"



"चुन्ना?"

मेहेरवान तिच्याकडे भकास नजरेनं पाहूं लागला. मग चुन्नाच्या केसांवरून हात फिरवीत मेहेरवान बोलूं लागला.

"चुन्ना, पांच वर्षे मला हे मोह टाळले पाहिजेत. सुरांना साकार न करतां कल्पनेच्या फेकीबरोबर उधळत जन्मभर अथांग जीवन जगण्यासाठीं मला एकवार शेवटचंच गायचं आहे. माझ्या वालिदासारखं—तेंहि पुन्हां न गाण्यासाठीं? आजन्म मूक होण्यासाठीं शेवटचं गायचं आहे! उद्यांपासून खाटकाचा धंदा बंद! धंदा बंद?"

"हो... उद्यांपासून मी रियाज करणार.... चुन्ना तूं माझा इन्तजार करशील कां? तुला केवळ पाहिजे चुन्ना, मी वैशाखीला परत येईन तुला घेऊन जाण्यासाठीं! हीर-रांझासारखं, शशीपुन्नूसारखं बेहोष होऊन जगण्यासाठीं. सांग ना. चुन्ना तू गप्प कां? चुन्ना तूं बोलली नाहींस तर माझी दुनिया थबकते. निश्चल होते. बोल चुन्ना, विचार कसला करतेस?

"विचार कसला?"

"अुस्तादजी एक गझल शिकवीत असत मतला होता—

"कब हंसा था जो ए कहते हो के रोना होगा
कल इसो बातपे रो लेंगे जो रोना होगा।
ऐसे तूफांमें सलामत रखी ए राह न ढूंढ
पार होना है तो कश्तीको डिबोना होगा।।"

"आतां कश्तींची कसली चिंता!"

"मेहेरवान माझी नाव या पांच वर्षांच्या कालप्रवाहांत डुबून जाईल!"

"नाहीं चुन्ना, मी मेहमीं सारखाच येईन. तुझ्या तोंडून निगोडा, अन्जाणा, निर्लज, भुलभुलैय्या म्हणून घेण्यासाठीं परत येईन."

विचारी चुन्ना, काय बोलावं हेंच तिला समजेना...

चुन्नाचं आजवरचं आयुष्य घडेल तें व चालून येईल तें स्वीकारण्यांतच चाललें होतें. इलाहि पेहेलवानानं तिच्या आईच्या बदचालीचा सूड घेण्यासाठीं त्यांच्या घराला भर दिवसा आग पेटवून दिली, आणि आई त्यांत जळून मेली. चुन्ना त्यावेळीं दहा वर्षांची होती. मावशीनं त्यानंतर चुन्नाला वाढवलं. संधि मिळेल तेव्हां मावशी तिला आपल्या उपकारांची जाणीव देत होती. हजला निघालेले उंटवाले सव्वाशें रुपयाना तिला विकत घ्यायला तयार होते. परंतु आपण चुन्नाला न विकल्यामुळें आपलं केवढं नुकसान झालं हें देखील छाती वडवून घेत मावशी सगळ्या शेजाऱ्यापाजाऱ्यांना ओरडून सांगत असे. खाटीक खानेवाला मेहेरवान रोजचा गोश घरीं पाठवून द्यायचा या एका कारणामुळंच मावशी चुन्नाच्या व मेहेरवानच्या मैत्रीकडे कानाडोळा करीत असे. पण तें देखील डोळ्याचं पातं न मिटतां. जुम्माच्या बाजारांत शंभरांच्या नोटा मोडणारा बलुची पठाण तिला चुन्नासाठीं योग्य वाटत होता. त्या पठाणानंहि चुन्नाच्या बदली मावशीला दोन बिघे गव्हाची जमीन कबूल केली होती. मावशीचा हिशेब चोख होता. सगळं काहीं चुन्नाला कळत होतं पण तिच्या समोरून बेअदब गुजरणारा जमाना कांहीं निराळंच लिहीत चालला होता. तिच्या आयुष्यांतील एकमेव आधारहीं आज अकस्मात परकी होऊं पहात होता. मेहेरवानमधला अधुन मधुन जागा होऊन स्वतःला शोधत बसणारा कलावन्त भीति आणि परकेपणा निर्माण करून त्या दोघांतहि

एक अनिश्चिततेची भिंत अुभी करून जात असे. आणि चुन्नाला त्याच्या विरहापेक्षांहि या अनिश्चिततेची अधिक भीति वाटत असे. "शेराचा हा बच्चा एखादे दिवशीं सुरांच्या गर्द रानांत घुसून मागचं पुढचं सर्व काही विसरून जाईल." अशी भीति तिला वाटे.

चुन्ना शांत होत चालली होती. हें सगळं काहीं न चुकतां आपल्या आयुष्यांत घडणारच या अपेक्षेनं...........

तेवढ्यांत मावशीनं चुन्नाला हांक मारली आणि मेहेरबान बरसातीचा जिना अुतरून मागें वळूनही न पहातां चालूं लागला. चुन्ना एकटक त्याच्याकडे पहात होती.

भिजलेल्या बरसातीला चुन्नाच्या अश्रूंचीहि पर्वा नव्हती. ओघळते अश्रु जमिनीवर पडण्याचे आंत लागाबांधा नसल्यासारखे टिपले जात होते ....

कुणीं म्हणत अलीयाफत्तूंनीं मैफिलींतून घालवून दिल्यामुळें मेहेरबानच्या डोक्यावर परिणाम झाला व त्याला वेड लागलं. आणि त्यांन धंदा बंद केला. मामूची मिजाजी पोरं हरिपूरच्या चव्हाट्यावर किमामनं लडबडलेलं तोंड पसरून टिंगल मारून हंसत व सांगत कीं वेडा बैजू हरिपूरमध्यें आलाय. त्याचं गांव ऐकणार तर खाटिक खान्यामागच्या खोलीच्या आसपास जाअून पहा. जहां भरून टाकणारा सूर लाकडाच्या फटींतूनहि बाहेर यायला तयार नाहीं.

आसपासचे लोक मामूच्या पोरांचा विनोद ऐकून पोटभर हंसत. कपुरथळचाच्या महाराजांनीं दिलेलं एखादं सोन्याचं पदक मुबारक खाटिकखान्यावरून जातां जातां मेहेरबानला दाखवी. मेहेरबानहि तेवढ्याच छद्मीपणानें त्यांना सांगे.

"अरे क्षीलीं चांदी असेल वर सोन्याचा मुलामा दिलाय"

वनप्शा विकत घेण्यापुरताच मेहेरबान गावांत येई. महिनाभर पुरेल एवढा वनप्शा विकत घेऊन परत घरी निघून जाई. असाच एक दिवस गावांत येत असतांना चौकांतल्या हौदाच्या पायऱ्या चुकल्यामुळं मेहेरबान ठेंच लागून पडला. सतत अंधारांत रहात असल्यामुळें त्याच्या डोळ्यांवर [illegible]रिणाम झाला होता. निजामुद्दी-नच्या उरुसाहून परतणाऱ्या चुन्नाच्या मावशीनं मेहेरबानचा तो अवतार पाहून समाधानाचा सुस्कारा सोडला. तो पागल व अंधा झाल्याचं चुन्नाला पटवून देण्याचा तिनं बराच प्रयत्न केला.

खाटिकखाना वर्षभर बंद असल्यामुळें मेहेरबानच्या दारिद्र्यांत दिवसेंदिवस भर पडत चालली होती. अशी [illegible]णखी चार वर्षे जाणार होती. मुलगा गात नाहीं, खानदान चालवत नाहीं म्हणून नेहमीं डोळ्यांना पदर लावणारी मेहेरबानची आई आतां मुलाला फावल्या वेळांत "पुन्हां खाटिकखाना सुरूं कर". म्हणू लागली. मेहेरबान दिवसरात्र स्वतःला खाटिकखान्यामागच्या खोलीत बंद करून घेअून खंड न पडूं देतां रियाज करीत असे. वालिदांचं गाणं नव्या रूपानं आपल्या गळ्यांतून साकार करण्याचा त्याला ध्यास लागला होता. एका जागीं बसून बसून मांड्यांना व पाव-लांना दगडासारखे गट्टे पडले होते. दिवसरात्र अंधारांत बसत असल्यामुळें डोळ्यांना अंधाराचीच संवय जडली होती. आणि अुजेडांत डोळे काम देईनासे झाले होते. परंतु आतां मागं फिरण्याचे विचा-रहि मेहेरबानच्या डोक्यांत येत नव्हता. एकेकाळीं मशिदींवर फकि-रांना भरल्या थैलींतून नाणीं वाटणारी त्याची आई शेजाऱ्यांकडून आटा मागून आणतांना पाहून मेहेरबान ढवळून निघत असे. पण.....पण या सर्व गोष्टींकडे लक्ष देणं शक्य नव्हतं. गाणा-ऱ्याला संगीताव्यतिरिक्त फावला वेळ आणि व्यवसाय असूं शकत नाहीं. एकतर चांगलं गाणं किंवा मरून जाणं हे दोनच पर्याय त्याच्यापुढें अुभे असतात. चुन्नानं भेटून जाण्यासाठीं मेहेरबानला कितीतरी निरोप पाठवले. खोलीच्या लाकडी फटींतून येणारे वैशाखी पौर्णिमेचे किरण पाहून मेहेरबान बेभान होअून जाई. त्याला वाटे चुन्ना आपल्या वाटेकडे आतुरतेनं डोळे लावून बरसा-तींत अुभी असेल. मग चुन्नाचे निरोप येणंहि बंद झालं. मेहेरबान पुन्हां आपल्या रियाजांत बुडून गेला. अचानक एका वैशाखीला चांदण्यानं गच्च भरलेल्या रात्रीं चुन्ना मेहेरबानच्या घरीं आली. घाबरलेली. अस्वस्थ झालेली.

मेहेरबान भरदार आवाजांत गात होता. ...

"चुप् रहो सनम् मेरा...जहां जाये......"

आईनं चुन्ना आल्याची खबर मेहेरबानला दिली व म्हातारी परत झोंपून गेली. चुन्नाला वाटलं गाणं थांबवून मेहेरबान वाऱ्या-सारखा धांवत बाहेर येईल. चुन्ना अंगणांतल्या चौपाईवर बसून राहिली.

मेहेरवान गात होता. सुरासुरांतून अस्वस्थता अुभी राहिली होती. गाणं बंद होत होतं. पुन्हां सुरू होत होतं. पुन्हां बंद होत होतं. कांहीं क्षण गेले आणि मेहेरवाननं आंतूनच चुन्नाला रागानं विचारलं.

"चुन्ना . . . . . तू इथं कां आलीस ?"

चुन्नानं कांहींच उत्तर दिलं नाहीं. सगळीकडे स्तब्धता पसरली होती.

पुन्हां मेहेरवान निश्चयानं म्हणाला,

"चुन्ना, हा मोह आपण टाळलाच पाहिजे. थोडे दिवस थांब चुन्ना."

"ठरलेल्या वैशाखीशिवाय मी तुला भेटू शकणार नाहीं चुन्ना."

"चुन्ना कां ? कां आलीस तूं?"

चुन्नाच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. त्या रात्रींच्या चांदण्यानें तिचे फक्त हुंदके ऐकले. पुन्हां गाणं सुरू झालं.

चुन्ना वसलीय कां गेली याकडेहि मेहेरवाननं लक्ष दिलं नाहीं.

* *

हरिपूरला कधी यापूर्वी वैशाखी झालीच नाहीं. अशी गर्दी आज जमली होती. प्रत्येकाचे तोंडीं एकच विषय होता. आज मेहेरवान गाणार. सर्वांना आव्हान देऊन गाणार. अलीयाफत्तू आणि त्यांची मुलं भरलेल्या रियाजानं वैठकींत वसली होती. मुबारक मिशांवरून हात फिरवितां फिरवितां आपल्या कलपाचा अंदाज घेत होता. श्रोते तिष्ठत वसले होते. अलीयाफत्तू खलीफा असल्यामुळें मेहफील सुरू करण्याची परवानगी देण्याचा मान त्यांचा होता. समोर वसलेल्या मुबारकला त्यांनीं गाण्यासाठीं फर्माईश केली. अजूनहि मेहेरवानचा पत्ता नव्हता. मुबारकनें तंबोरे जुळवले आणि तो वैठकीच्या जागेवर वसणार इतक्यांत दरवाजांतून आवाज आला.

"मामू, आज मैफल माझ्या गाण्यानं सुरू होईल. आणि कदाचित् तिचा शेवटहि माझ्याच गाण्यानं होईल."

अलीयाफत्तूनीं एकवार मेहेरवानकडे पाहिलं आणि दुसऱ्याच क्षणाला "हां हां गा ना. खानदानाची मिजास तर खूब अुचललीस. आतां गाणंहि ऐकू दे ना." असं म्हणत चेष्टेनें हंसत हंसत मुबारककडे पाहिलं.

यावर मुबारकहि किमामनं भरलेलं तोंड आडवं पसरून भरमसाट हंसला.

"मामू, गाणं तर ऐकाच, पण माझ्यानंतर ज्या कुणाची ताकद असेल त्यानं खुशाल या वैठकीवर वसून गावं." मेहेरवान दरवाजाचा आधार घेअून चालत आंत येतां येतांच गरजला. कुणीतरी पुढं होअून मेहेरवानला हात धरून वसवलं वैठकीवर.

मेहेरवाननं चित्त्याच्या आवेशानं वैठकीवर झेंप घेतली. आणि जुळलेल्या तंबोऱ्यांची थैस पकडून त्यानं 'सा' भरला. म्हाताऱ्या अलियाफत्तूचा मिशीवरून फिरणारा हात जिथल्या तिथं खिळून राहिला. त्याला त्याच्या वीस वर्षांपूर्वी मेलेल्या तरण्याबांड मेहुण्याची आठवण झाली. तोच दम, तीच झार, तोच आवेश तीच वेडर वृत्ती. त्याचा आपल्या स्वतःच्या कानांवर विश्वास बसेना.

पूर्याधनाश्री फुलूं लागला होता. आवर्तनामागून आवर्तनें ओलांडलीं जात होतीं आणि ऐकणारे देहभान विसरत चालले होते.

अलीयाफत्तू व मुबारक दोघेहि जाणूनवुजून दुर्लक्ष केल्यासारखं दाखवीत होते. अुपहासानें मेहेरवानचा आवेश खच्ची करण्याचा प्रयत्न करीत होते.

मेहेरवानच्या गळ्यांतून ऐकणाऱ्याचाहि दम अुखडून टाकील अशी सुरांची आस मैफलीला लपेटून टाकीत होती. दुसऱ्याच आलापांत मेहेरवाननं रागाची संपूर्ण छाया अुभी केली आणि त्यानं विजेच्या गतीनें ख्यालाची वढत सुरू केली.

अलीयाफत्तूनीं अस्वस्थ होत मांडी वदलली. स्वतःचं अस्तित्व कुणाचंहि गाणं ऐकताना किंचितहि वाजूला न ठेवणारा मुबारक मात्र स्वतःला हरवत चालला होता.

घनगर्जनेला लाजविणारी गमक मेहेरवान लोकांच्या अंगावर फेंकत होता. अनाघाती मात्रेला स्पर्श करून ससाण्याची झेंप घेत अलीयाफत्तूंचीच जिंदगीभर गाजलेली, आणि मी मी म्हणणाऱ्या तवलजीची तालावरील पकड ढिली करणारी लयकारी करीत मेहेरवान समेला भिडला.

अचानक अलीयाफत्तूंच्या तोंडून "वाहवा" निसटून गेला आणि त्यांनीं मानेला हिसडा देत पुनः एकदां स्वतःला सांवरण्याचा प्रयत्न केला, पण . . . . . .

मेहेरवानच्या त्या अद्वितीय गायनानं त्यांचा गर्व, स्वाभिमान हळुंहळू विरघळून चालला होता.

रावीच्या संथ पाण्यांत गुडघ्यापर्यंत पाय वुडवून झोळण्यांतल्या दगडांनीं लहानपणीं मेहेरवान ठिकऱ्यांचा खेळ खेळत असे. पाण्याच्या संथ प्रवाहावर झेंप घेत जाणाऱ्या ठिकऱ्या त्याचं मन वेधून घेत असत.

ख्यालाची आलापी संपल्यावरोवर मेहेरवान रावीच्या प्रवाहांत अुभं राहून चारी दिशांना ठिकऱ्या फेंकल्यासारखा ताना फेंकत निघाला. त्याच्या त्या अनोख्या आणि अद्वितीय तानक्रियेनं अलीयाफत्तू वसल्या ठिकाणीं गुदमरून चालले होते. आणि मेहेरवान त्याना अुसंतहि न घ्यायला देतां तानेतून तान भिंगरीसारखी फिरवीत समेला येत होता.

वसल्या ठिकाणाहून अलीयाफत्तू पुढं पुढं सरकत होते. मुबारक "आ" वासून पहात वसला होता.

ख्यालांतून मेहेरवान द्रुत एकतालांत केव्हां घुसला हें देखील ऐकणाऱ्यांच्या लक्षांत आलं नाहीं.

मेहेरवान गात होता. अलीया फत्तू देहाचे कान करून ऐकत होते.

"खुष रहो सनम मेरा"
"जहां जाये हमरे तरफ् नेक नजर वो ध्यान रहे"
खुष रहो सनम् मेरा . . . . . . ."

अस्ताईचे वोल संपल्यावरोवर मेहेरवाननं मामूकडे पाहिलं. मामूच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा वहात होत्या. मेहेरवाननं अंत्रा सुरू केला.

"अलादी अमान फतेअलीखान के मियाँ".
"प्यारी लगदी तोरी आनवान. . . मेहेरवान. . . . ."

असं म्हणत म्हणत हंसून मेहेरवाननें सवाल टाकला.

"मामू, ही वंदीश पुरी करा."

अनुक्रमणिका







"मेहेरवान, मेहेरवान.....वच्चा अरे असाच गात रहा.. असाच गात रहा....माझी समाधि मोडू नकोस....तुझा अधिकार मला मान्य आहे."

अलीयाफत्तू भिजलेल्या डोळ्यांनीं त्याच्याकडे पहात बोलले.

"नाहीं मामू, मला हा अधिकार नको आहे. अधिकारासाठीं मी हें केलं नाहीं. मामू हें गाणं तुमचंच आहे. माझ्या वालिदांचं आहे. मला तर याहि पलीकडचं गायचं आहे........."

"मामू, माझ्या या वंदिशीचा अंत्रा पुरा करून आज तुमचा अधिकार सिद्ध करा."

असं म्हणून मेहेरवाननं पुन्हां अंत्रा गायला सुरुवात केली. सर्व सभा रोमांचानीं वीतभर अुंचावली होती. सगळे कान व डोळे अलीयाफत्तूकडे अपेक्षेनं पहात होते.

"प्यारी लगदी तोरी आनवान....मेहेरवान ..."

आवर्तनांमागून आवर्तनें तानांचा पाऊस पाडत मेहेरवान अलीयाफत्तूकडे पहात पुन्हां पुन्हां "मेहेरवान" या अक्षरांवर थांबू लागला.

दुरून कुणीतरी ओरडलं–

"खांसाहव वंदिश पुरी करा.........नसल्यास...."

"मेहेरवान अरे वंदिप पुरी करण्याची माझ्यांत ताकद नाहीं. तुझा हा मिस्त्रा एकाच विशेषणानं पुरा होईल......"

"मेहेरवान तुम तो सुरकी तान हो........"

"अरे साक्षात सुराची तानच आहेस तूं..साक्षात सूर आहेस तूं."

आणि मेहेरवाननं एखादं कोडं सुटल्यासारखे "सुरकी तान" हे शब्द जशासतसे जोडूनच वंदिप पुरी केली.

अलीयाफत्तूनीं आवेगानं मेहेरवानला मिठी मारली.

सुरानीं भरून ओसंडणारे देह सांवरीत लोक स्तब्ध बसले होते.

आणि कसली तरी आठवण होअून मेहेरवान धडपडत मामूच्या मिठींतून स्वतःला सोडवून घेत मैफल मागें टाकून निघाला. मामूची पर्वा नसलेला, श्रोत्यांची पर्वा नसलेला मेहेरवान थेट चुन्नाच्या घरासमोर येअून अुभा राहिला, रस्त्याच्या कोपऱ्यांतून सुरू झालेला बरसातीचा जिना चढत त्यानं हांक मारली.

"चुन्ना, चुन्ना.......मी आलोय....मी आलोय." मुक्त होअून आलोय. तुला घेअून जाण्यासाठीं. संगीत जगण्यासाठीं आलोय चुन्ना."

एका हातानं जिन्याचा कठडा पकडून मेहेरवान बरसातीच्या तोंडाशीं अुभा राहिला. वैशाखीच्या चंद्राचे किरण कठड्यावरून घरंगळत आंत पसरत होते.

बरसातींत चुन्ना गाढ झोंपली होती. तीच चुन्ना त्याला गिद्दी म्हणून हांक मारणारी. अन्जाणा, निगोडा म्हणून चिडविणारी. भूलभुलैय्या म्हणणारी.....आणि..... आणि शेजारी एक वर्षाचं गुटगुटीत मूल खेळत होतं. वैशाखीच्या गोल चंद्राकडे पहात हंसत होतं.

मेहेरवान न राहवून वेगानं पुढं झाला आणि.....कसली तरी वस्तु नजरेस पडल्यामुळें दोन पावलं परत मागं फिरला. जरीच्या वेलबुट्टीवर चंद्राचे किरण चकाकत होते......

उशीच्या शेजारी बलुची पठाण घालतात तसलं एक जाकीट पडलं होतं आणि चिलमींतून राख होअून पडलेला गांजा पसरला होता......

● ● ●

[पृष्ठ ४८ वरून–मुक्ता ]

आईला आसवं आवरत नव्हती. लेकीच्या वर्तनाबद्दल संताप व्यक्त करण्याचंहि सामर्थ्य तिच्यांत उरलं नव्हतं. नरेशवर तिनें प्रेम करावं हेच आईला आवडलं नव्हतं. तिचे प्रेमप्रकरण मुळांत खोडण्याचा यत्न केला. अखेर सारं प्रमाणाबाहेर गेलेलं पाहतांच संमती दिली. वाटलं, एकुलती एक लेक कुठे कां होईना, पण सुखांत राहूं दे! पण संसाराचा पहिला फुलोरा उतरतांच कुरबुरी कानावर आल्या. वाद वैराचं रूप धरूं लागले. एकत्र राहाणं अशक्य झालं. तेव्हां आईपुढें सरसावली व तिनें नरेश-पासून तिला सोडवलं. जन्माची गांठ कापून टाकली. वाटलं होतं, ही पोर सारं विसरेल, सुधारेल, परत सरसावेल. किंडर गार्टन शाळा काढून देऊं. किंवा कुठे आवडीच्या व्यवसायांत घालूं–– मुख्य म्हणजे एखादा उमदा, सुयोग्य तरुण पाहून तिचा पुर्नविवाह करून देऊं. तिचं लग्नाचं, संसार करायचं वय आहे अजून! अजून ती सुखी होईल. कुणाशी तरी एकरूप होईल––––

"काय भलतंच बोलतेस आई! घटस्फोट घेतला म्हणजे मला दुसरं लग्न करायचं असं कुठे–? परपुरुषाचा विचारसुद्धां मनाला असह्य होतो माझ्या––––"

आता एका दृष्टीनें ती परपुरुषाकडे चालली होती. नरेश कांहीं आता तिचा पति नव्हता. तिचा काय अधिकार त्याच्याकडे उजळ माथ्यानें जाण्याचा? त्याची एकांतात भेट घेणं म्हणजे व्यभिचारच नाहीं काय?

सारासार विचार ती झपाट्यानें विसरत होती. वाटत होतं की पुन्हां घडी नीट बसेल. काय अशक्य आहे? त्याच्याशिवाय जगतां येत नाही हें मनाला पटल्यावर कां आतां थांबायचं? प्रेमाचा पहिला साक्षात्कार खोल असतो हेच खरं. पुरुषाच्या शरीराची ओढ आवरतां येत नाहीं हेच खरं. तेच आपलं पहिलं प्रेम व तोच आपला एकमेव पुरुष! बाकी सारं फोल आहे.

..उबट अंधारांत तिला जाग आली. सगळं शरीर शिण-ल्याचं तिच्या ध्यानांत आलं. वस्त्रं लपेटून घेत ती घाईनें उठली. कुण्या परक्या इसमाच्या पलंगावर ती झोपली होती. नरेश पली-कडे खुर्चीत बसून सिगारेट ओढीत होता. तृप्त गात्रं सावरून घेत ती त्याच्याकडे विचित्रपणें पाहूं लागली.

नरेशनें सिगरेटचा मोठा झुरका घेतला व थोटूक भिरकावून दिलं. मग तो एकदम खुर्चीवर उठला व पलंगाकडे आला.

"नको, परत नको––" ती कशीबशी ओरडली.

"तूं दुर्गेसारखी वागायला लागलीस––" तो कडवटपणें म्हणाला व खिडकीशी वळला.

तिच्या कुंकवाचे फरफाटे ओढल्या गेलेल्या कपाळावर आठ्या उमटल्या. पूर्वी भांडण वाढलं तें त्याच्या विकृत, पिसाट विषय-वासनेपायींच. आपण त्याला आज बळी पडलो. त्याच ओढीनें आलो. आपणास ऊब हवी होती फक्त. पण इथे तर आग पेटलेली होती. त्या आगींत आपण होरपळत होतो. सारं सहन होईना म्हणून तर बाहेर पडलो. अन् आता पुन्हां पतंगासारखी झेप घेत––

तिला एकदम शिसारी येणारा शेवटचा प्रसंग आठवला. विकृतिचा नरेशने कळस केला होता. तिला शय्यागृहाबाहेर जावं लागलं होतं. सारी रात्र थंडीत कुडकुडत घालवावी लागली होती.

बावरून ती म्हणाली, ––

"उद्यां जायचं ना आपण? बाबाला आणू ना मी?"

त्यानें तोंड आंत वळवलं. अर्धवट अंधारात त्याचा चेहेरा कसा-तरीच दिसत होता. त्याची ओढ आटली होती? तिच्या बद्दलचा तिटकारा, तेढ परत वाढत होती? तो रूक्षपणें म्हणाला,

"ये. पण नीट राहालं पाहिजे. पैशाची बोंब आहे सध्यां. घरनं आणायचे नाहींत, माहेरचा टेंभा मिरवायचा नाहीं––"

परवांच तहाच्या अटींची दोघांत चर्चा झाली होती. एक-मेकांच्या अर्ध्या वचनांत, अर्ध्या पोटी राहायचं दोघांनीं ठरवलं होतं. अन् आता नरेश एकदम दम देऊं लागला. तेंही परखड शब्दांत ––

"अटी घालूं नको. अडवूं नको. माहेरच्या मिळकतीवरच आपण––"

"शट अप्––"

ती संतापून उभी राहिली व शरमून खाली पाहूं लागली. वर्षाच्या विरहानें भेट झाली. मनांनी नवा हुरुप आणला. शरीरं एक झाली. अन् लगेच झगडा सुरू झाला. एकमेकांचं पटायचं नाहींच कां? कोण तापट व कोण समजुतदार! संवयी, पैसा, व्यसनं, वासना–सगळ्या बाबतींत भांडणं.

"आपण भेटलो–नि लगेच भांडायला लागलो कीं––" ती खोल हसून म्हणाली, परवांच आपण ठरवलं कीं––"

"आपण खूप ठरवतो नि लगेच ते मोडतो––"

ती खुर्चीवर बसली व पलंगावर तो चादर सारखी करीत होता तिकडे पाहात राहिली.

कोण होता तो? कुठे आली होती ती? चांगली सुटली होती. मुलाला घेऊन स्वतंत्र जगण्याची संधी मिळाली होती. बाबाला मनासारखा मोठा करतां येईल. आपल्या-सारखं बनवतां येईल. आपल्याला शिकायला मिळेल. हवं तितकं. नोकरी केली तर नवरा अडवणार नाहीं. आईचं छत्र सतत राहील. क्षणभरहि तिचा विरह सहन होत नाहीं. एक-तृतीयांश इस्टेट देणारे भाऊ––अन् हें सारं सोडून आपण ह्या भणंगाच्या मागें कां आलो? हा तर वासनेचा राक्षस, अरेरावी गाजवणारा. बायकोनें नौकरी करूं नये, समाजकार्य करूं नये, मैत्रिणी जमवूं नये म्हणून म्हणणारा. सिग्रेटी ओढणारा, घोरणारा, केसाळ, काळा.

तिला वाटलं, आपण खोड्यांत सापडलो. कायद्यानें आप-ल्याला सोडवलं होतं, पण परत––––अरेरे, आपण अभिसारिका ठरलो, व्यभिचारिणी ठरलो. केवळ या वासनेपायीं आपण आलो? –कीं पहिलं प्रेम प्रभावी ठरलं म्हणून आलो?––

पलंगापासून दूर होत नरेश म्हणाला, "कंटाळा आला––"

ती उठली व खिडकीशी गेली. नरेश कंटाळून, कावून खुर्चीत पसरलेला तिनें पाहिलं. त्याचा उत्साह उतरून गेला होता. समो-रची स्त्री लोढणं वाटत होती त्याला––––

मुलाचं मन बंड करून उठलं. पूर्वीपेक्षांहि प्रचंड, धाडकन् तिनें खिडकी उघडली व वाऱ्याचा झोत आंत घेतला. गर्द काळो-खांत कशी उडी घ्यावी, ह्या नराधमाला सोडून कसं बाहेर पडावं, हे ठरवूं लागली. अधीरतेनें आकाशाकडे पाहूं लागली.

आकाशाच्या उतरणीवर जागजागीं डांबर फासल्यासारखं झालं होतं.

●●●











# डोकेदुखीपासून पूर्ण आराम मिळवा

ॲनासिन इतके परिणामकारी आहे याचे कारण त्यांत—औषधांचे मिश्रण—अगदीं डॉक्टरांच्या प्रिस्क्रिप्शन प्रमाणेंच असून त्यामुळे त्वरित व पूर्ण आराम मिळतो.


'ॲनासिन' मध्यें वेदना त्वरित शमविण्यासाठीं औषधाचें अद्वितीय मिश्रण असतें.


'ॲनासिन' घेतल्यानें, डोकेदुखीचें सर्वसामान्य कारण म्हणजे नसांवरील ताण यापासून आराम मिळतो.


ॲनासिननें' सर्दी व इन्फ्लुएन्झाचा ताप उतरण्यास मदत होते.


'ॲनासिन' वेदनाबरोबरच नेहमी येणारें औदासीन्य व थकवा दूर करतें.






# ॲनासिन

## अधिक गुणकारी आहे कारण तें ४ प्रकारें कार्य करते

*Registered User:* GEOFFREY MANNERS & CO. LTD.







अनुक्रमणिका










--डॉ. सरोजिनी बाबर,

**तो जंगलातून निघाला तर वाऱ्यानें त्याला मिठी मारली. नदी, नाले पायाला विळखा घालूं लागले. पालापाचोळा वोलला, चंद्र सूर्य खालीं आले सगळ्यांनीं त्याला म्हटलं "सावध हो!"**

तसं वगीतलं तर आता त्या गोष्टीला लई मंजी लईदी झालं हं ! मजी काय झालं की, एक गाव होतं. तियं एक माणूस रहायचा-दांडगाडुंडगा. जेसा काय राकूसच. रंगानं गोरा. पन अंगाव वोट वोटभर केस. ह्यो एकेक दात. पिचकं डोळं. मापट्यागत नाक. तुळीगत पाय. वरुट्यागत वोटं. हसला की, आभाळ गडगडावं तसा दपका उठून जायचा. तर सारं गाव त्येला लओ भिउन रहायचं. कुणी त्येच्या सावलीला पण दिसायचं न्हाई तर ! खरं ना ! न्हवं मजी ह्येनं चिलीम वडली तर सारं गाव धुरानं माखून जायचं न् निजल्याव घोरायला लागला मजी जमीन हादरायची तर ! मग त्येच्या वाट्याला कोण गा जाईल? अं हं! त्यो आलाय म्हन कळलं तरी माणसं हावकून जायची. घराची कवाडं बंद करायची वाहता रस्ता एकदम गप हुयाचा न्हवं कां ?

पण सांगायचं मजी ह्यो माणूस मनानं लई चांगला. लओ आईगत माया करनारा. त्येचं मन लई मोठं. काळीज उदार. भावना मऊ. तर सगळ्यांचं भलं न्हावं असं त्येचं म्हणणं. म्हणून बिचारा माणसं भित्यात तर गावाच्या वेशीवर रहायचा. तान भूक लागली तर जंगलात जायचा. आपला एकटाच रहायचा हं ! सोबत सशी काय नाहींच. पण त्येचं मन खाऊन घ्यायचं. आपल्या एक झक्कास वायकू पाहिजे असं त्येला वाटायचं. तशी कदीमदी गावात फिरावं ? बायकू आणावी असं त्येला वाटायचं.

एकदा काय झालं की, त्येला एक तरणीबांड पोरगी दिसली. बाख चढतेली गोरी गोरीपान नक्षत्रागत रूप. अंग काठी देखणी हा[illegible] दणकट. हसरं

मुख-तर ह्याच्या मनात ती पोरगी भरली. म्हटल की, करीन तर हिच्या संगच लगीन करीन... लगीन हिच्यासंगच करायचं असा त्येनं वेत केला. हा हळूच पुढं झाला हं ! तशी त्याची पावलं दणकली न् ती पोरगी त्या आवा-जानं वेभान झाली. एकदम तिला मूर्छना आली ! वरंच्या वरं वाख चढून आलीवती म्हणून न्हाईतर आतच पडायची राव ! तर ती पडली ती वैल्या अंगच्या शेतात न् घागर झाली पालथी-पाणी गेलं शेत भिजवीत न् तियनं उठली घुंगूरवाली कवूतर ! त्या सरशी ह्यो माणूस मनी चरकला न् एकदम चुकलं म्हटला. ही पोरगी मरायला नको म्हटला. न् त्येनं देवाला आणभाक मागितली. मनानं हिला वरली. वास झालं म्हटला न् तिला साजिवंत कर म्हणून त्येनं गळ घातली. तशी देव धावून आला. त्यानं ती उडती कवुतरं एका झटक्यात हुती का न्हवती केली न् हिच्यावर झारीतल्या आमृताचा शिडकावा केला. त्या सरसी ही सरसा-सावुन उठली न् घरी निघून गेली. मग ह्येच्या जिवातू जीव आला न् हा पण आपल्या खोपीत चालता झाला. तर वाटेत त्येचं गोरं अंग काळठिक्कर पडलं न् मनानं त्यानं हाय खाल्ली.

झालं. रात्रंदिवस त्याच्या मनी एकच विचार घोळला. उःशाप मिळाला म्हट-लान् ती पोरगी वायकू करावीच असं त्याच्या मनात घेतलं. हरं. काळजी आप-सागत त्याची गत झाली. तो वाळत चाल-चालली. खंगत निघाला.

इंद्रदेवानं शाप दिलेला हा राजाचा मुलगा. खेळातली गंमत म्हणून वाळपणी हिमालय चढायला, उतरायला गेलेला. तर त्या नादात एका तपाला वसलेल्या वाईच्या पदराला ह्याचा धक्का लागला होता न् तिनं संतापून इंद्रदेवाकडे चहाडी केली होती. म्हणताना इंद्रदेवानं साती अप्सरांना सांगून ह्याला तिची माफी मागाय लावली न् शाप दिला भर सभेत त्यानं गर्जना केली क्री, "ह्या जन्मात तुला सुंदर बायको मिळणार नाही. असं मनात आणलंस न् कुणावर नजर टाकलीसच तर ती स्त्री भान हरपून वेशुद्ध होईल. आणिक तिला स्पर्श केलास तर ती मरून जाईल. लांब रहा. भुतासारखा दिसशील. तुला भिउन पळतील. . . . चालता हो !"

तर त्यावेळेपासुन ह्याची ही गत झालेली. मन खाऊन घेते. सुंदर वायको पाहिजेच म्हणतेला आणि त्याच्या नजरेत मेग राजाचा महाल खेळलेला रंगमहाल दिस-तेला वैभव नाचतेलं. घोडा भरधाव मारून चांगली पोरगी पळवून आणावी म्हणतेला.

होता होता एक दिवस त्याला झोप लागली हं ! झोप लागली तर एका भल्या दांडग्या महालातून स्वारी फिरतेली. तियं चमत्कार भरलेला. पऱ्या नाचतेला. रंभा खेळतेल्या. वघावं तिकडं सुंदर स्त्रियांचे चेहरेच दिसतेले. तशी हा गेला भुलून न् त्या नादात त्यानं एका समईला धरलेलं . . धरलेलं तर तियं आवाज घुमतेला, "सोडून दे मेल्या" पण ह्यानं सोडायचं ते मुठीच आवळल्या. त्यासरशी त्या समई-तून एक देखणी पोरगी वर येऊन त्याला मारतेली. म्हणतेली कीं, सोड न्हाईतर जीव घेईन ! आधिक अवचितच तिचं राक्षसणीत रूपांतर होतेलं ! भोवती भुतं नाचतेली न् सगळया वायका नुसत्या वेड्याविद्र्या होऊन ह्याला खायला उठ-तेल्या ! . . . . म्हणताना हा नको नको करीत पळत सुटतेला न् साती समींदरा-पलीकडे येऊन थांवलेला ! . . . . तर तियं ह्याची न् त्या पोरींच्या आक्राळ-विक्राळ वापाची गाठ पडून ह्याला वेदम मार वसलेला . . . . !

"नको नको . . लगीन नको . . " धाव-रून किंकाळी फोडीत हा मग त्या दिवशीं उठला न् त्यानं मायावी विद्या धारण केली. तो एकदम अदृश्य झाला आणि त्या गावात बेलाशक शिरला. आता तो कुणाला दिसणार न्हवता तर ! गावात शिरला आणि त्यानं त्या त्याच्या आवडत्या पोरीला हुडकून काढलं. नजरेनें तिला तो पीत राहिला जसा काय. पण त्याच्या मनाची तृप्ती अशी होईनाच-अं हं ! त्याची नजर तियून उठेनाच तर ! त्याचा परि-णाम मग वाईट झाला. ती पोरगी वाळायला लागली न् तिच्या वापानं तिच्या हातात गंडा ! बांधीत ह्याचं मरण चितलं ! कसं काय की, पण ह्या राकूस माणसाचं हं काम हे त्या बानं ताडलं न् मग गतोरात गावोगावचे कारागीर गोळा करीत हिच्या लग्नाची तयारी केली. डाग घडवले. भर्जरी वस्त्रं आणली. जाईजुईचा मंडप उभा केला. रत्नजडित पाळणा आणला मोत्या पोवळयांची पायघडी घातली. उसमळे, पानमळे आंदण दिले. गाई म्हशी आंदण दिल्या आणिक कृष्णदेवागत जावई वघून हिचं लगीन लावलं !

ह्यो माणूस हे सगळं वघतोय हं डोळयानं ! पण करणार काय. नाइलाज होता-तिनं जशी दुसऱ्याच्या गळयांत माळ घातली तसं ह्येचं काळीज गेलं फाटून न् हा वेशुद्धी झाला.

आता काय करावं ? त्या एकल्या पोरीनं हे पाहिलेलं. ती गेली घावरून न् ओरडली. त्यासरशी सारा मांडव गरजला न् ही धावाधाव झाली. पण ह्या कानाचं त्या कानाला गेलं न्हाई-तिनं ह्येला शांत हो





अनुक्रमणिका







म्हटलं अन् आपला शेला त्येच्या अंगावर टाकून ती नवन्यासगं निघून गेली. म्हटली की, ह्यातून पण चांगलं निघेल.

असेच मग कितीक दिवस आले आणि गेले. हा आपला घोर निद्रेतच लोळतेला. तिनं आपल्यांशी एखादा शब्द तरी बोलायचा असं आपला घोकतेला.

होता होता मग त्याला जाग आली ती एका लहानग्या पोरीच्या रडण्यानं. हा दचकून जागा झाला. त्यानं तावडतोबीनं फेरीवाल्याचं रूप धारण केलं, घुगरं लावलेल्या हसऱ्या नाचऱ्या भावल्या घेऊन आपल्या तिच्या पुढं धावला. तरीहि त्या पोरीची आई थांबली. भावलीची किंमत काय म्हणाली. ह्यानं तिला ओळखली हं ! हारखून टुम्म झाला. ती त्याची मैत्रीण होती. हलक्या आवाजात त्यानं त्या मुलीला विचारलं, "भावली पाइजे ?" तशी त्या मुलीनं ह्याच्याकडं झेप घेतली. झेप घेतली तर ह्यानं तिला द्यावं म्हणून हात पुढं केला वरीक न् येचा स्पर्श तिला झाला. त्यासरशी ती मरून पडली न् पोरीनं रडून धुमाकूळ घातला ! ह्याचं काळीज फाटून गेलं. मनानं वरलेली बायको मरून गेली या धसक्यानंच तो दिसेनासा झाला. अवल्या नाहीशा झाल्या. माणसं जमली. प्रत्येकानं त्या पोरीला उचलून घेतलं न् समजूत घालायची खटपट केली. तिची आई मरून पडलेली तर ते बघून माणसं कळवळली. कशानं काय झालं म्हणाली. एकत्र हलकल्लोळ उसळून गेला––ह्यानं मग ठरवलं की, ह्या पोरीला जलमभर मा म्हायार करायचं. उःशाप मिळाल्यावर तिला घरी आणायचं. तिचं कोडकवतिक करायचं. आपली लेकवाळ हीच तेवढी. जिवाची हौसमौज हीच. आणिक त्यानं मग त्याच्याजवळच्या खेळांचा ढीग त्या मुलीच्या घरात मांडून दिला. ती आनंदानं खेळायला लागली. आनंदी आनंद झाला. तशी मग मरून गेलेल्या त्या आपल्या मैत्रिणीला ह्यानं वचन दिलं. म्हणाला की, "तुज्या मायेनं हिचं सारं बघीन." हा पण मग जसा काय खुशालीत आला.

पुढं मग मायावी रूप धारण करून ह्येनं त्या पोरीची आईगत जोपा केली. ती कुठं एकली दिसली की, हा बावा तिला खेळवायचा. जादूची खेळणी द्यायचा. ती मग ह्याला 'बावा' म्हणायची 'आई' म्हणायची. ह्याचा जीव एवडा व्हायचा मग. ह्या पोरीच्या आईची अशावेळी त्याला लई म्हणजे लई आठवण यायची. नजर फिरावी तिथं ती ह्याला दिसायची. हाडबडून जायचा विचारा. पण घट्ट मन करून सारं दुःख गिळायचा न् त्या पोरीचं कवतिक करीत बसायचा.

तर एकदा काय झालं की, हा गेला जंगलात. म्हणाला की, फळं फुलांचा ढीग खेळायला देईन पोरीला. म्हणून जंगलातून निघाला तर वाऱ्यानं ह्याला मिठी मारली. नदीनाले पायाला विळखा घालू लागले. पाला पाचोळा बोलला. झाडंझुडपं ह्याच्या भोवती जमली. चंद्र सूर्य खाली आले. चांदण्यांचा चांदवा वरती बसला न् सगळ्यांनी ह्याला म्हटलं कसं, "तुज्याबद्दल लई जीव तुटतो. सावधान हो. पोरीचं लगीन करून दे," त्यासरशी हा दचकला न् इकडं तिकडं बघाय लागला. तशी त्या पोरीचा आवाज तिथं घुमला "मी तुमची राणी. लांबून बघावं. हात लावू नाही." आणिक सांगायचं तर ती त्याच्या समोर साक्षात उभी राहिली. तिच्या तेजानं ह्याचे डोळे दिपले न् हा 'आ' वासून बघत राहिला. तशी ती त्याला हसून म्हणाली कशी, "लेकीला मा म्हायार करीत जांवा लगीन झोकात हुदे. आई वा तुमीच. मी आपली लेक." म्हणताना हा ऐकतच राहिला.

तेवढ्यांत काय झालं की, तिला पान्हा फुटला न् त्या धाराचं कारंज उसळलं ! . . त्या सरशी ती पोरगी तिथं येऊन पोटभर दूध प्याली. तिला बाळसं आलं न् तिचा तोंडवाळा थेट आईगत झाला. आपलं बाळपण मागं मारून ती परवंटी साडीत आली. मायलेकी कडकडून भेटल्या. आईनं लेकीवर अश्रूंचा अभिषेक केला. ह्याचं काळीज गदगदलं. ह्याच्यापण डोळ्यांना धार लागली.

तर काय गंमत म्हणावी हं ! त्या नेत्राच्या पाण्याचा झाला लोंढा न् त्यातून वर आल्या फुलांच्या नाजूक पायघड्या. मग वाजला सनई चौघडा न् दाटल्या नक्षत्र माळा. फुलला जाईचा मंडप न् बसल्या मानापानाच्या सवासणी-रंगाचा झाला घनदाट मेळा न् सजलं वोहलं. जरतारी अक्षतांचा पडला पाऊस ? आले नवरदेव. दाही दिशांनी गाईल्या मंगलाष्टका. आईनं भरली त्यांची ओटी. ह्यानं केलं कन्यादान. तसं आभाळ फाकलं न् सागरानं उसळी मारली. ह्यानं मग त्यातल्या रत्नामानकांचा चाराचुरा पोत्यानं भरून घेतला न् लेकीला वुत्ती करतो म्हटला. पैल्यांदा लेक सासऱ्याला जायची तर अंग वुत्ती पाहिजे. रीतिरिवाज असतो. खाणंपिणं हाय न्हवं, आंथरूण पांघरूण, भांडीकुंडी, हत्ती घोडा सगळं आला पाहिजे. ह्यानं मग केली तजवीज. लेकीला घेतलं जरतारी चोळी लुगडं. अंगाव घातले सोन्याचे, हिऱ्यामाणकांचे डाग न् वुत्ती केली. ती भूकलाडू तानलाडू यांच्या गोळ्या भरून घरोघर वाटा म्हटला. दुरपतीच्या थाळीगत सरायची व न्हाई असं त्याचं म्हणणं.

स्वता मग त्येनं चिलीम वडली. त्यावला खडा रस्त्यावर टाकून दिला. त्या सरशी चंद्रज्योती उजळल्या. वाटेनं उजेडाची कारंजी उसळली न् ते बघायला गावोगावच्या वाटा भाविकांनी फुलल्या. मग ह्यानं लेकीला पोटाशी धरली. तिचा मुका घेतला. सुखानं रहा म्हटली. काय कमी पडायचं न्हाई बोलला. रत्नजडीत नारळ जावायाच्या हातात दिला. पानसुपारी दिली न् लेकीला नीट संबाळा म्हटला. हुंदक्यानं दाटला न् लहान पोरागत रस्त्यात गडागडा लोळला. त्यासरशी हत्ती घोडे शिणगारून पुढं सरसावले. अब्दागिरी आली. नक्षत्रमाळा उजळल्या. जडजवाहीरांन भरलेल्या गोठ्यांनी दाटलेल्या बैलगाड्या उधळल्या. लेक पालखीत बसली न् बापाला "येते" म्हटली. तशी ह्याचं काळीज तुटलं न् तो ओक्साबोक्सी रडत तिला 'ये' म्हटला. त्यानं मग पुन्हा कधीच कुणाला तोंड दाखवलं नाही. लेकीची वुत्ती न् मा माहेर कायम चालू राहिलं. तिच्या दारी खाण्यापिण्याच्या सगळ्या सगळ्या जिनसांचे मळे फुलले न् हा नित्य नियमानं तिला आशिर्वाद देत गावच्या वेशीवर उभा ठाकला. ●●●



मलाच् काय पण कुठल्याही पुरुषाला परस्त्रीला भिण्याचे कारण नाहीं. मी भितो माझ्याच बायकोला! बहुस्त्रीत्व हा पुरुषाचा 'स्वभाव' असला तरी बायको त्याला ही 'वांकडी वळणें' घेऊं देत नाहीं.

विवाहित स्त्री ओळखण्याच्या जशा खुणा आहेत, तशीच विवाहित पुरुषहि ओळखायच्या खुणा असाव्यात असें माझें मत आहे. इतर पुरुषांविषयीं मला सांगतां येणार नाहीं. परंतु 'मी विवाहित आहे' असं जगाला (म्हणजे स्त्री जगाला) समजावं असं मला फार वाटतं. तसे, माझें टक्कल पाहिल्यावर चाणाक्ष स्त्रियांना फारशी अक्कल न चालवितां मी कामांतून गेलेला माणूस आहे तें चटकन् समजेल. परंतु सर्वच स्त्रिया चाणाक्ष असतात असें नाहीं. अक्कल नसलेल्या डोक्यापेक्षां टक्कल असलेले डोकें बरें असें या बायांना वाटेल आणि मग त्या उगीचच माझें डोकें खात बसतात. चकाकते ते सारे सोनें असं त्या मानतात. आपलें पितळ उघडे पडावे अशी इच्छा असूनहि आपली "खरी ओळख" पटविणारे एकहि साधन आपल्या जवळ नसावें याची मला फार खंत वाटते. म्हणूनच मंगळसूत्र मिरवीत तोऱ्यांत जाणाऱ्या परीणीतेचा मला फार हेवा वाटतो.

कपाळभर कुंकू ल्यालेली, हातांत हिरवा चुडा घातलेली, नि गळयांत काळी पोत अडकवलेली स्त्री किती निर्भयपणें चारचौघांत वावरते! तिनें गळयांत मंगळसूत्र घातले म्हणजे अंगांत चिलखत घातले आहे असें तिला वाटतें. भांगांत भरलेला शिंदूर तिला शिरस्त्राणासारखा वाटतो. जोडवी, मासोळ्या इत्यादि सौभाग्यालंकार शस्त्रागारांतील अस्त्रांप्रमाणें वाटतात. तिच्या कपाळावरील कुंकवाचा ढळढळीत टिळा हा जणुं तिचा तिसरा डोळा असतो. आपल्या एका डोळयानें ती आपलंच सौंदर्य न्याहाळते. दुसऱ्या डोळयानें नवऱ्यावर बारीक पण करडी नजर ठेवते. आणि या तिसऱ्या डोळयानें आपल्याकडे वांकड्या नजरेनें पाहणाऱ्या परपुरुषांचे पाप जाळून भस्म करते. समाजांत उजळ माथ्यानें वावरतांना तिला मंगळसूत्राचा मोठा आधार वाटतो. मंगळसूत्राचा मालक कदाचित् पाप्याचें पितर असेल, जीवनांत तिला हवं तें संरक्षण देण्यास तो कदाचित् असमर्थ असेल, परंतु त्याच्या नांवानें घातलेलें मंगळसूत्र तिला समाजांत हवें तें संरक्षण देण्यास समर्थ असते. मंगळसूत्रामुळें ती परिणीता होते. परिणीता झाल्यामुळें तिला प्रतिष्ठाहि मिळतें. बिनपुरुषाची बाई म्हणून तिला इतर बायका हिणवूं शकत नाहींत. किंवा इतर पुरुष खुणवूंहि शकत नाहींत. त्यामुळेंच मंगळसूत्र हें प्रत्येक स्त्रीचें जीवनसूत्र होऊन बसते.

आपल्याकडे मुलीला लग्नांत सौभाग्य कांक्षिणी म्हणतात. खरं म्हणजे प्रत्येक स्त्री जन्मतःच सौभाग्य कांक्षिणी असते. गळयांतल्या मंगळसूत्राच्या रूपानें तिला संरक्षक कवच मिळते. अशा प्रकारचें कवच पुरुषांना कां नसावें याचा मला राहून राहून अचंबा वाटतो. त्याच्या कपाळावर कुंकू नसलें तर निदान बुक्का तरी असावा. मंगळसूत्र नसलें तर निदान काळ्या दोऱ्यांतील रुपेरी तावीज तरी गळयांत अडकवावा. विवाहित पुरुषाला लग्न-चिन्ह म्हणून कुठलीच वस्तू मिळण्याचें चिन्ह दिसत नसल्यामुळें 'मी विवाहित आहे' अशी पाटी तरी त्याच्या गळयांत लटकवावी अशीहि कल्पना कधीं कधीं मनांत येऊन जाते.

स्त्री ही पुरुषावलंबी असल्यामुळें मंगळसूत्र तिला अन्नवस्त्र देणारें छत्र मिळवून देते. बचाव करणारें शस्त्रहि देते. पुरुष स्वावलंबी असल्यामुळें त्याला असल्या छत्राची किंवा शस्त्राची जरुर नसते. परंतु इतर स्त्रियांचा ससेमिरा चुकविण्यासाठीं त्याला किमान पक्षीं दोरा तरी मिळावा. आपण विवाहित आहोंत हें इतर स्त्रियांना सहज समजावें म्हणून त्याला कांहींतरी चिन्ह धारण करायला मिळावें. पण नाहीं. स्त्री दाक्षिणा आणि स्त्री दाक्षिण्यवादी समाज पुरुषाच्या बाबतीत मात्र तितका दक्ष नसतो. आपला पाठलाग करणाऱ्या प्रयत्नांना धोक्याचा इशारा देणारा कंदील म्हणून त्याला कांहींतरी खूण द्यावी असें त्याला वाटतच नाहीं.

अशी खूण असावी याबाबत इतका आग्रह धरतो आहे म्हणजे मी माझ्या मागें लागणाऱ्या लावण्यवतींना किंवा कामिनींना भितो असा ग्रह करून घेऊं नका. आपल्यांतच रहाणार असेल तर खरं सांगून टाकतो.

राजाराम हुमणे








मी भितो बायकोला ! मलाच काय पण कुठल्याहि पुरुषाला परस्त्रीला भिण्याचें कारण नाहीं. कारण पुरुष लग्नबंधनामुळें एकाच दाव्याला-म्हणजेच दरिला–बांधला गेला असला, तरी बहुपत्नीकत्व ही त्याची 'स्वाभाविक' भावना असते. त्यामुळे लग्नाची वेडी पायांत पडल्यावरहि त्याच्या पायांचे 'वांकडे' वळण जात नाहीं ! अशावेळीं लग्नाची बायको हातांत 'लाटणें' घेऊन सदैव पाठीवर असते म्हणूनच तो बेलगाम उधळूं शकत नाहीं. तुम्हीं विचाराल स्त्रीनें असा हातांत अंकुश घेऊन पुरुषाला सतत कां टोंचत रहावें ? त्याचें मुख्य कारण म्हणजे पुरुषापेक्षां स्त्रीला लग्नाचें महात्म्य अधिक असते. तें टिकले तरच तिचा टिकाव लागणार असतो. म्हणूनच ते मोडूं नये म्हणून स्त्री पुरुषाला घट्ट धरून ठेवते. त्याला इकडचे तिकडे करूं देत नाहीं. लग्न ही तिला एवढी महत्त्वाची घटना वाटते कीं, तें झाले कीं, तिला कृतकृत्य झाल्यासारखें वाटते.

लग्नामुळें स्त्रीचा साडी-चोळीचा आणि तूप-पोळीचा प्रश्न सुटतो म्हणूनच केवळ स्त्री पुरुषाच्या गळयांत माळ घालीत नाहीं. लग्नामुळें तिला माथा विसावण्यासाठीं आधार मिळतो, उजळ माथ्यानें मिरविण्यासाठीं प्रतिष्ठा मिळते. माथेफिरू पुरुषांपासून संरक्षण मिळते आणि माथा थंड ठेवून आपलें स्त्री जीवन निर्वेधपणें व्यतित करण्यासाठीं लागणारें स्वातंत्र्य मिळते. लग्न झालेल्या सर्वच स्त्रिया सुखी होतात असें नाहीं. कांहींच्या आयुष्याची परवडही होते. ती परवडसुद्धां त्यांना परवडते. परंतु लग्नाशिवाय रहाणें परवडत नाहीं. त्यामुळें विवाहित पुरुष जसें ब्रह्मचारी पुरुषाचा हेवा करतात तशा विवाहित स्त्रिया विनलग्नाच्या बायकांचा हेवा करीत नाहींत. त्या करतात कींव आणि कधीं-कधीं कुचेष्टाहि ! !

लग्न हें स्त्रीला अन्नवस्त्र, निवारा वगैरे सारं कांहीं देते. परंतु स्त्रीजीवनाची खरी पूर्ति माता होण्यांत असते. मातृत्व ही स्त्रीची सर्वांत मोठी आकांक्षा असते. आणि त्याचसाठीं ती सौभाग्याची कांक्षा धरते. लग्नबाह्य संबंधापासून मुलें होत नाहींत असें नाहीं. तसं नसतं तर 'कुमारी माता' 'अनौरस संतति' इत्यादि समस्या उद्भवल्याच नसत्या. लग्नामुळें मातेला आणि मुलांनाहि संरक्षण मिळते. त्यांच्या भवितव्याचें दायित्व शिरावर घेणारा पिता लग्नामुळें निश्चित होतो. पत्नीच्या पाशाबरोबरच मुलांचे पाशहि गळयांत पडल्यामुळें पुरुष आणखी बांधला जातो. त्यामुळें लग्नगांठहि पक्की होते. स्त्री लग्नाचा असा दुधारी तलवारीसारखा उपयोग करूं शकते नि म्हणूनच लग्न हा स्त्रीला एक अजिंक्य किल्ला वाटतो.

स्त्री स्वरक्षणासाठीं लग्न करते तर पुरुष एक अटळ सामाजिक प्रथा म्हणून कधीं कधीं क्षणिक मोहाला बळी पडून लग्नाला उभा राहतो (व मग पडतो) संसाराच्या जबाबदाऱ्या पार पाडतां पाडतां तो मेटाकुटीला येतो. पैसा गमावून बसतो. स्वातंत्र्य तर त्यानें कधींच गमावलेलें असते. लग्नामुळें स्त्रीला सारं कांहीं मिळतं आणि पुरुष सारं कांहीं गमावतो. "प्रत्येक स्त्रीनें लग्न करावें–पण प्रत्येक पुरुषानें नव्हे" असं डिझरायलीनें म्हणनच तर म्हटलं नसेल ना ?

पुरुषाचा 'स्वाभाविक' कल कळल्या-खेरीज इतर पात्रांकडे असल्यामुळें एकपत्नीत्व टिकविण्यासाठीं, एकमेव पत्नी हा त्याचा योग (व भोग) असला तरी, त्याच्या कपाळावर तिचा कांहींतरी छाप असायलाच हवा. साऱ्याच पुरुषांची प्रवृत्ति बहुस्त्रीक असते आणि साऱ्या स्त्रिया एकजात पतिव्रता असतात असें नाहीं. त्या एकपतित्वाला विटलेल्या नसतात, असेंहि नाहीं. परंतु आपल्या (मगर) मिठींत सांपडलेला पुरुष संपूर्णपणें गिळावा–म्हणून स्त्रीला प्रतिव्रतेची अवघड भूमिका फार कौशल्यानें पार पाडावी लागते. त्याच्या वखवखलेल्या भावना सीलबंद करण्यासाठीं तिला त्याला बंदिस्त करून ठेवायचें असते. चंचल अशा पुरुषाला लाजविण्यासाठीं तिला स्वतःच्या चंचल मनाला बांध घालावा लागतो. नवरा, संसार, मुलंबाळं, यांत तिला आपलं मन इतकं गुंतवावं लागतं कीं, तिचा जीव दुसऱ्या जागीं गुंतूं नये. अशा संयमामुळेंच ती आपला पति दुसऱ्या 'वये'च्याच काय पण यमाच्या तावडींतूनहि सोडवूं शकते. अशा मनोनिग्रहामुळें ती नवऱ्यावर नैतिक दडपण आणूं शकते. स्त्रीचा एक पाय घरांत आणि








एक पाय दारांत असला तरी तिचा संपूर्ण देह मात्र घरांतच असतो. एखादेवेळेस तिचें मन पर पुरुषावर बसले, प्रणयाची गीतें ती गाईल, प्रीतीचीं कूजनेंहि ती ऐकेल, परंतु प्रतिष्ठेचें 'माझें घर' सोडून ती अप्रतिष्ठा पदरांत घेण्यासाठीं 'घरावाहेर' पडणार नाहीं.

लगीन गांठ सुटूं नये, उभारलेला संसार मोडूं नये म्हणून व्यभिचारिणी स्त्री जितकी काळजी घेते, तितकीच काळजी व्यभिचाराला सोकावलेल्या वाहेरख्याली पुरुषाची स्त्रीहि घेते. शहाणी वाई नवऱ्याच्या 'तसल्या' भानगडींकडे मुद्दाम 'उदार' दृष्टिकोनानें पहाते. लग्न यशस्वी व्हायचं असेल तर पुरुषानें कानांत बोळे घालावेत आणि स्त्रीनें डोळ्याला पट्टी बांधावी असं कुणीसं म्हटलं आहे तें यामुळेंच. परंतु "प्रकरण" उंबरठ्याची हद्द ओलांडून 'आंत' येऊं लागलं आणि घराचे वासे (खाल्या-घरचे) मोजूं लागलं तर मात्र ती शहाणी-सुरतीही घर डोक्यावर घेतल्याशिवाय रहात नाहीं.

लग्न करणं ही फार सोपी गोष्ट असते. (त्यामुळेंच तर आपण सारे ती करूं शकतो) परंतु तें टिकविणें कठीण असते. लग्नामुळें भिन्न देहाचे, प्रकृतीचे, मनाचे, भावनांचे दोन अपरिचित जीव एकत्र येतात. म्हणूनच लग्नांत कितीहि "लालित्य" असले तरी अंतीं तो एक 'जुगार'च ठरतो. या जुगारांत स्त्रीची वाजू नेहमीच पडती असते. परंतु हा खेळ शेवटपर्यंत टिकावा म्हणून ती पडते घेते. नवरा नामधारीसुद्धां देव नसला तरी 'असें पति देवचि ललनांना' हा चरण ती गाते. लग्न टिकते तें स्त्रीच्या या समजुतदारपणामुळें, स्वार्थत्यागामुळें, हौतात्म्यामुळें ! लग्न-संस्थेचें मोठेपण टिकविण्यासाठीं ती परिणयाला पावित्र्य देते, काळ्या पोतीला 'मंगळसूत्र' म्हणते, कुंकवाच्या बोटाला सौभाग्य मानते. नवऱ्याला टाकलेली किंवा नवऱ्यानें टाकलेली स्त्री, त्याच्या नांवानें कितीहि खडे फोडीत असली तरी, ती त्याचंच नांव लावते, त्याच्याच नांवानें कुंकू कोरते नि त्याच्याच नांवानें मंगळसूत्र बांधते. लग्न आणि ललना इतकी संलग्न असतात.




प्रणयिनी प्रमदेलाहि लग्नाचाच मद चढलेला असतो. प्रथम "माझ्या गळ्याची शप्पथ घेऊन सांगा, माझ्याशी लग्न करणार ना ?" असा ती प्रियकराला प्रश्न टाकते आणि मगच त्याच्या गळ्यांत हात टाकते. एखादा विलंदर प्रियकर "अर्थात् ! तो तर माझा रिवाज आहे." असं तिच्या गळ्याची शप्पथ घेऊन सांगतो आणि ही लग्नेच्छु प्रिया, "लग्न करतोयना" असं मानून आणखी "खोलांत" जाते. लग्नाच्या जात्यांत भरडून निघालेल्या म्हाताऱ्याकोताऱ्या स्त्रियांचें लग्नाचें वय गेलेले असले तरी वयांत आलेल्या मुलींची लग्नं जमविण्याची हौस मात्र मेलेली नसते. खरं तर लग्न हा वायकांचा आवडता पेशा असतो. लग्न हें त्यांच्या पेशींतच थिजलेले असते म्हणाना !

घटस्फोट घेऊन घर मोडणाऱ्या किंवा स्वतःच मोडून घरावाहेर पडणाऱ्या स्त्रिया एकंदरींत कमीच. 'पदरांत पडला आणि पवित्र झाला' अशा श्रद्धेनें आपल्या बऱ्या-वाईट नवऱ्याला धरून रहाणाऱ्या स्त्रियाच अधिक. दरदिवशी नवरा वदलणारी नटी-सुद्धां, अखेर लग्न करूनच नवरा वदलते !

स्त्रीला पुरुषाची आत्यंतिक गरज असल्यामुळें ती लग्नबंधनाला बांधून घेते. सौभाग्य लाभलेल्या स्त्री इतकीच सौभाग्य हरलेल्या स्त्रीलाहि पुरुषाची गरज असते. किंबहुना तिच्याहिपेक्षां अधिक, परंतु भाळीं कुंकू ल्यालेल्या स्त्रिया कपाळीं वैधव्य आलेल्या स्त्रीकडे मात्र सहानुभूतीनें पहाणार नाहीत. पांढऱ्या कपाळाच्या स्त्रीला त्या म्हणतील, "विधवेला कुंकवाची उठाठेव कशाला ?" तिची ही गत तर माझ्या-सारख्याची काय गत. पण अखेर मी (त्यांच्या नाइलाजानें कां होइना) कुणाच्या तरी "कुंकवाचा धनी" आहे. तेव्हां कुंकवाची ही (नसती असेल कदाचित्) उठाठेव करायला मी 'सत्पात्र' आहे हे त्याही मान्य करतील ! आणि त्यांनीं केलें नाहीं तर माझा 'लग्न दत्त' अधिकार मी काय म्हणून गमावीन !

•••



# कधीं बहर......कधीं शिशिर

-प्रभाकर अत्रे



गा मधु. गा! गात्रागात्रांना
येऊं दे चेतना.
बरसू दे अमृतधारा.
विरून जाऊं दे साऱ्या खंती
आणि साकारूं दे
तुझ्या प्रीतीचा ताजमहाल!
शरीरिणी प्रतीच्या
पलिकडचं एक असामान्य
शिल्प झरूं दे तुझ्या
नेत्रांतून, सुरांतून, नुसत्या
अस्तित्वांतूनही........

परमभाग्याचा क्षण चालून आला होता. मित्रांनीं चर्चा करावी आणि शत्रूंनीं हेवा करावा असा क्षण! लहानपणीं कधींतरी स्वप्नांत तरळून गेलेला. आजोबांनीं कलत्या वयांत जोपासलेला. वडिलांनीं खतपाणी घालून फुलविलेला भाग्याचा क्षण!

मी न्यायाधीश झालो होतो. जिल्ह्यापुरता कां होइना रामशास्त्री बाण्यानें वागणार होतो. आणि योग असा कीं, माझं सारं शिक्षण, बालपण जिथें गेलं तिथेंच माझी बदली झाली होती. माझें सारें जीवन मला जणुं फार जवळून पाहण्याची संधि मिळणार होती. मी जिथें खंती पचविल्या होत्या, तिथें मी हर्षाचे मळे उभारणार होतो. आणि तेही माझ्या स्वतःच्या कर्तृत्वानें, तेसुद्धां चाळिशीच्या घरांत पदार्पण करतांना!

पण न्यायाधीश म्हणून कोणाच गांवीं बदलून जातांना मला जो आनंद झाला त्यापेक्षां किती तरी मोठा आनंद मला आज झाला आहे गांवीं तर मी आलोंच. त्याबद्दल गांवकऱ्यांनीं माझा गौरवही केला. पण आज मला माझ्या शाळेनें स्नेहसंमेलनाचा अध्यक्ष म्हणून बोलावले होते. माझ्या माहेरींच जणुं मी जाणार होतों. उत्सवमूर्ति म्हणून! ज्या शाळेंतल्या बाकांवर मी पांढरा सदरा आणि निळी चड्डी घालून बसलो, त्याच शाळेच्या व्यासपीठावर मी पाश्चात्य पद्धतीचा रुबाबदार सूट घालून बसणार होतो. जिथें मी नमस्कार करीत आंत शिरत होतो, तिथें मी त्यांचें नमस्कार स्वीकारीत आंत शिरणार होतो.

माझ्या दृष्टीनें तो परमभाग्याचा दिवस होता.

त्या शाळेनें खूपसं कांहीं दिलं होतं. त्या आठवणींच्या पायघड्यां-वरून मी व्यासपीठाकडे गेलो. स्थानापन्न झालो. सान्या बाजूकडे आठवणींचा चष्मा लावून मी एक दां नजर टाकली. तो कोपऱ्यांतला ड्रॉइंग हॉल, तो समारंभांचा हॉल. माझे वर्गांच्या वर्गांतल्या मुलो. मुलं. सारे शिक्षक माझ्या चष्म्यांतून भरंकन् पुढें सरकून गेले.

घंटा झाली. लाल रेशमी पडदा बाजूला झाला. पेटी तबल्याच्या साथींत स्वागतगीत सुरूं झाले. रंगमंचावर तीन मुली उभ्या होत्या. त्या म्हणत होत्या. "स्वागत करुं सुजनांचे" त्या तिघां मुलींमध्यें एक मुलगी गीताचें संचालन करीत होती–तिघीही मुलींनीं पांढरे झगे घातले होते. संचालन करणारी मुलगी सुरेल आवाजाची होती. मोठ्या आत्मविश्वासानें ती ताना घेऊन समेवर येत होती व मग बाकींच्या मुलींच्या आवाजांत आवाज मिसळून देत होती.

गाणें छान चाललें होतें. साथ चांगली जमली होती. रंगमंच सुंदर सजवला होता. प्रेक्षागारांतले वातावरणही मोठे प्रफुल्लित असे होते. समोर कांहीं वयोवृद्ध शिक्षकही बसले होते कीं, ज्यांच्या ज्ञानाच्या शिडयांवरून मी सर्व्यांचे रामशास्त्रीपद मिळविले होते. त्या शिड्या आतां वांकल्या होत्या. ती मुरलेलीं लोणचीं आतां सणावाराला बासनांतून बाहेर पडत होतीं. सारं वातावरण प्रसन्न होतं. ती मुलगी सुरेल आवाजांत म्हणत होती. "स्वागत करुं सुजनांचे" ती पुन्हां समेवर आली. सार्‍यांनीं 'वाहवा' म्हटले. टाळ्या पिटल्या...त्या मुली आंत निघून गेल्या. पुढचा समारंभ सत्काराचा होता. माझ्या दृष्टीनें तसा महत्वाचा. पण 'स्वागत करुं सुजनांचे' हें गाणं ऐकतांना कां कुणास ठाऊक मी अस्वस्थ झालो. तो आवाज गोड होता. त्याला धार होती. शब्दोच्चार अतिशय स्वच्छ होते. मन अप्रसन्न करणारं असं कांहींही त्यांत नव्हतं. पण मी अस्वस्थ झालो खरा ! ती मुलगी मला अस्वस्थ करून गेली होती कां ? ती तर माझें मोदभरें स्वागत करून गेली होती. मग मी अस्वस्थ कां बरं झालो होतो ? ती मुलगी–

. . . . ती मुलगी . . . .




पण तेवढयांत रंगमंचावर माझे माकोडे मास्तर येऊन उभे राहिले. ते जवळ जवळ पंचाहत्तरीच्या पुढे गेलेले होते. त्यांना पाहतांच मी उठून उभा राहिलो. त्यांना नमस्कार केला. "आतां आम्हीं तुम्हांला वांकून नमस्कार करायचा. योग्यता मोठी. शिष्य झाला म्हणून काय झालं ?" त्यांनीं तपकीर नाकांत कोंबली. माझें गुणवर्णन त्यांनीं खूप केलें. एकीकडे अंगावर स्तुतीमुळें रोमांच उभे रहात होते. आणि एकीकडे एक भुंगा मन पोखरीत होता— ती मुलगी. . . ती मुलगी कोण होती ? कोण असेल ? कदाचित् ती. . .

माकोडे मास्तर खूप आठवणींचा चित्रपट उभा करीत होते. त्यांत मी नायक होतो– प्रत्येक आठवणीचा ! एरव्ही मला चित्रपट आवडेही. पण माझेंच चित्र असूनही मी रंगलो नाहीं. नायकाच्या जागीं मी स्वतः विदुषक झालो असून सारेजण माझ्याकडे पाहून फिदीफिदी हंसताहेत असा मला भास झाला. कसा कुणास ठाऊक माझा स्वतःवरचा तावा त्या क्षणीं सुटला आणि मी मोठ्यानें ओरडलो. "खामोष ! असे हंसता काय ?"

माकोड्यांनीं सांगितलेल्या गोष्टीतल्या विनोदामुळें सारेजण खरोखरच हंसत होते. मी खामोष म्हणून ओरडतांच सारेजण एकदम गप्प बसले. माकोडे व प्रिन्सिपॉल पूर्णपात्रे माझ्याकडे पाहूं लागले. आणि मग कांहीं तरी चूक झाल्याचें माझ्या ध्यानीं आले. मी त्यांना क्षमा याचनेच्या शब्दांत म्हणालो "मला कोर्टातल्या शांततेची संवय झाली आहे ना. त्यामुळें हे असं होतं कधींतरी. म्हणून मी सहसा आमंत्रणं टाळतो." पण खरं म्हणजे मी त्याक्षणीं तरी खोटं बोलत होतो. माकोड्यांच्या चित्रांतल्या विदुपकानें मला अस्वस्थ केलें होतें. तो भुंगा मला सतावीत होता. ती मुलगी— तिचा चेहरा... तिचा आवाज–आणि विशेषतः तिचे डोळे.... होय ! होय ! ! नक्कीच. . . मनांत कांहीं स्मृतींचे स्पेअरपार्टस् एकत्र येऊं लागले होते. ते जणुं एकाच वस्तूचे पार्टस् असावेत असंही एक मन ग्वाही देत होतं. होय–तीच ती! नक्की तिचीच ही मुलगी... म्हणजे असावी ! तेंच रूप, तेंच डोळे. आवाजाची जातही तीच—

भाषणें संपलीं. पुन्हां एकदां टाळ्यांचा कडकडाट झाला. त्यानंतर सत्कार. पुन्हां टाळ्या. गुच्छ–पुन्हां टाळ्या. मग बक्षीस समारंभ. निरनिराळीं नांवें घेऊन मुलं येत होती आणि कुठल्यातरी गुणाबद्दल बक्षीस घेऊन जात होती. मोठ्या आदरानें वांकून नमस्कार करीत होती. कांहीं जण हस्तांदोलन करून जात होती. त्या नांवांत, बक्षीसांत, गुणांत वा त्या माणसांत मला कांहींही इंटरेस्ट नव्हता. मी उपचार उरकीत होतो. भुंगा आपलें काम करीतच होता. ती मुलगी–

आणि एक नांव पुकारले गेले "मधुमती मोहिले" मधुमती मोहिले. मधुमती हें नांव पुकारले गेले आणि पांढऱ्याशुभ्र झग्यांतली ती बालपरी

पुढें आली. तिनें बक्षीस घेतलें. मला वांकून नमस्कार केला आणि आपला हात तिनें आपल्या केंसावरून फिरविला. "हें काय ?" म्हणून तिला विचारण्याचा मोह मला होत होता. पण प्रतिष्ठा व तें विशिष्ट पद आडवे आले. मी पुन्हां रामशास्त्राचा मुखवटा चढवला आणि कांहींतरी प्रासंगिक बोललो. काय बोललो, किती वेळ बोललो, कसें बोललो, लोकांना तें कितपत आवडलें तें मला समजलें नाहीं. समजून घ्यावेसेंही वाटलें नाहीं. मी फक्त एकाच गोष्टीनें हैराण झालो होतो. पोखरणारा तो भुंगा– ती मुलगी– मधुमती मोहिले. तीच ती ! मधुमतीचीच मुलगी– नक्की ! !

कार्यक्रम संपल्यावर मी प्रिन्सिपॉलना सांगून त्या मुलीला बोलावून घेतलें. तिला एका पाकिटांत घालून अकरा रुपयांचें वेगळें बक्षीस दिलें. पुन्हां तिनें वांकून मघाचाच प्रकार केला.

"हें काय पोरी ?"

"देवाला नमस्कार !"

"मी तर माणूस आहे."

"नाहीं, तुम्हीं देव आहांत."

"तुला काय ठाऊक ?"

"मला ठाऊक आहे. माझ्या आईनें मला सांगितलं आहे."

"तुझी आई खोटं सांगते. तुला फसवते."

"नाहीं"! माझी आई कधीं खोटं बोलत नाहीं. ती मला फसवीत नाहीं."

"अरे वा ! मुलीशी खोटं न बोलणारी व तिला न फसवणारी आई पाहिलीच पाहिजे. आमची आई खोटं बोलायची."

"माझी आई कधीं कधीं खोटं बोलत नाही."

"कुठें आहे तुझी आई ?"

"घरीं !"

"मला दाखवशील ? मला पण अशा आईला नमस्कार करायला हवा."

"चला घरीं ! नाहींतरी मी तुम्हांला घरीं चला म्हणून म्हणणारच होते."

"कोण तूं ?" मी आश्चर्यानें विचारलें.

"हो ! तुम्हीं आज येणार म्हणून आईला मी निमंत्रण पत्रिका दिली. ती म्हणाली मी ओळखते तुमच्या पाहुण्यांना. जमलं तर त्यांना घरीं घेऊन ये."

माझ्या तर्काला आधार येत होता. तर्काला आतां भाषा आली होती. तो कांहींतरी कहाणी जुळवूं लागला होता.

मी प्रिन्सिपॉल, शिक्षक वगैरे मंडळींचा निरोप घेतला. आणि एक भला मोठा हार, वराचसा गुंता व एक चिमुकली पण गोड पोरगी बरोबर घेऊन मी गाडींत जाऊन बसलो. त्या मुलीला तिचा पत्ता विचारला. गाडी चालूं झाली. आणि भुंगाही !

"तुझ्या घरीं कोण कोण आहे !"

"आई–एक लहान भाऊ आणि माझे पपा"

"पपा भेटतील मला ? घरीं असतीलच कीं !"

"नाहीं, पपा गांवीं गेले आहेत. त्यांना फिरावं लागतं खूप !"

"तुला पपा आवडतात कीं आई ?" कांहींतरी विचारून गंमत करायची म्हणून मी विचारलें.

"दोघंही ! पण पपा आमच्या वांट्याला येतच नाहींत !"

"म्हणजे ?"

"एक तर ते गांवीं कमी असतात. आणि असले तर ते तासन्तास पत्त्यांत तरी असतात किंवा पुस्तकांत तरी असतात."

"अरे वा ! वाचायचं खूप वेड दिसतंय्."

"वेडच ते ! आम्हीं जवळ गेलों कीं, तेंच पुस्तक पाठीत बसत आमच्या ! पण तुम्हीं पपांबद्दलच सारं कांहीं विचारताहांत. आईबद्दल कांहींच नाहीं ?" तिनें माझ्यावर नजर रोखीत म्हटलें.

"तिला तर आपण भेटणारच आहोंत." मी उत्तर दिलें खरें. पण तिला मी काय सांगणार होतो दुसरं ? तिच्या आईला मी ओळखत होतो हे ? तिची माझी मैत्री होती हे ? कीं प्रीतीच्या पाऊलवाटेवर आम्ही 'सातपावलें' इच्छा असूनही टांकूं शकलो नाहीं हे ? तिच्या आईचं गाणं मी फुलवलं हे ? तिचें आणि माझें मीलन होत नाहीं हें कळल्यावर मी त्या वाटेवर रेंगाळत राहिलो नाहीं हें ?

मधुमतीची मुलगी मला धीटपणें विचारीत होती कीं, मी तिच्या आईबद्दल कांहींच कां विचारीत नाहीं. माझ्या उत्तरानें तिचें समाधान झालें कीं नाहीं ठाऊक नाहीं. पण तेवढ्यांत तिनें ड्रायव्हरला 'ठहरो' म्हणून सांगितलें. मी मधुमतीची कांहीं चित्रें मनांत रंगवीत चाललो होतो, तेवढ्यांत गाडी थांबली. मी गाडींतूनच पाहिलें. छोटी मधुमती धांवत घराकडे गेली होती. मला 'या ना' म्हणाली होती. पण कुणींतरी जणुं मणाच्या बेड्या माझ्या पायांत अडकविल्या होत्या. मी बसून राहिलों. छोटी मधुमति पुन्हां आली. 'चला ना !' तिनें मला हात दिला. त्या स्पर्शांत जणुं घणांचें सामर्थ्य होते. बेड्या तुटल्या. मी उठलो.

दारांत मधुमती उभी होती. तिच्या हातांत निरांजनांचें तबक होतें. आणि डोळ्यांत जणुं लक्ष निरांजनें उजळली होती. मायलेक शेजारीं उभ्या राहिल्या. त्या दोघींना शेजारीं उभें राहिलेलें पाहिलें आणि माझें मन एकदम लहान झालें आणि फुलपाखरांच्या पाठीवर बसून प्रवासाला निघालें, दूरदेशीं, गेलेल्या काळाच्या शोधांत, त्या मधुर आठवणींच्या कोषांत गुंतून जाण्यासाठीं ! त्या आनंदाच्या ओढीनें ! उरला फक्त देह. समोर उभे होते चार डोळे. पेटली होती लक्ष निरांजनें. ओंवाळींत होते हात आणि बाहेर वाजत होता चिमण्या, पोपटांचा चौघडा, आज उगवला होता जणुं दुसरा. नाचत आली होती दिवाळी !

"आज खरंच माझ्या घरीं दसरा आलाय्." पोवळं फुटलं आणि मध झिरपूं लागला.

"काय म्हणालांत ? मला कांहीं म्हणालांत काय ?"

"नाहीं ! मी ह्या मधुमतीला म्हटलं कीं, आज आपल्या घरी दसरा आलाय्."

"अरे वा ! छान !"

"छान काय ? नुसते पहात काय उभे राहिलांत ?"

अनुक्रमणिका








"पाहून घेतो. सांठवून घेतो तें लक्ष निरांजनांचें तेज ! कीं जें कधीं मला पुन्हां गवसेल कीं नाहीं ठाऊक नाही."

"बसा आधी." तुम्हीं असे उभे किती वेळ राहणार ?"

"विठ्ठल तर युगे युगें उभा राहिलाय् भक्तांसाठीं!"

"पण तुम्हीं बसा! मी आले हं!"असं म्हणत ती आंत गेली. मुलाला घेऊन आली. तो आंत अभ्यास करीत बसला होता. त्या दोन्हीं मुलाना पाहून माझ्या मनांत एक खूप समाधानाचा विचार येऊन गेला. आणि एक सैतानही! वात्सल्याचं भरतं दाटून आलें. मी त्या दोघांना जवळ घेतलं. त्या मुलाचे मी पापेही घेतले आणि मग मनांत एक विचार आला कीं, यांची आई मधुमति असली तरी बाप..........

माझी गंगा आटली. त्या मुलांनाही तें जाणवलें असावं. तीं विलग झाली आणि म्हणाली' आई आम्हीं शिवाजी बागेंत जाऊन येतो. "मला टाऽऽटा" करीत तीं निघून गेली.

"आतां बसा." मधुमति म्हणत होती.

तिनें चहा व खाद्यांची व्यवस्था केली आणि समोर बसत म्हणाली 'आतां बोला'

तरी ही मी गप्प होतो. खूप वर्षांनी आम्हीं एकमेकांना भेटत होतो. तिच्या मुलीनें तो भुंगा माझ्या पाठीशीं जणुं लावला होता. तिच्या डोळ्यांत मला मधुमति दिसली. तिचें गाणें दिसले. तिच्या नि माझ्या सहवासांतील सुवर्णकणांचे तेज पिऊन जणुं ते डोळे धाले होते. आज तीच मधुमति माझ्या समोर बसली होती. जिच्याशीं मीं तासन् तास, दिवस न् रात्र बोलत बसत होतो तीच मधुमति आज मला म्हणत होती 'बोला ना!"

आणि शब्द मात्र ओठांची सीमा ओलांडीत नव्हते.

"कसं काय चाललंय्!" तिने विचारले

"ठीक! तुमच्या कृपेनें सारं कांहीं ठीक!"

"असं कां बोलतां! आमची कसली कृपा?"

"खरंच तुमची कृपा, मी खरं तेंच बोलतो"

"राग कायम दिसतो"

"त्याच्या पलिकडे गेलोय् मी! तुमचं कसं काय?"

"तुमचं, तुम्हीं असं कां म्हणताय् प्रथमपासून!"

"तुम्हांला योग्य तो मान देणं माझं कर्तव्य आहे. तुम्हीं गृहिणी आहांत. माता आहांत."

"पण मी तर तुमची मधुमति आहे"

"होतीस म्हण. तुम्हीं माझ्या झाला असतात तर–

'खरंच, मी अजूनहि तुमची आहे. ह्या मनांत अजूनही तुमचीच पूजा चालते. ह्या गळ्यांतले सूर अजूनही तुमच्याच–साठीं आणि तुमच्याच आठवणीनें गातात. माझी मधुमतिसुद्धां तुमचीच सुरावट गाते. हे कितीदां तरी म्हणतात कीं, मधूचा आवाज येवढा चांगला आहे तर तिला एखादा गायन मास्तर ठेवूं या कीं. पण "मी असतांना मास्तर कशाला?" असं मी त्यांना सांगते. मी तयार केलंय् मधूला"

"त्याची खात्री पटली मघां कार्यक्रमाचेवेळीं. खरं म्हणजे त्या मुलीनेंच मला इथें खेंचून आणलं आहे. हुबेहूब सांवली आहे आईची !"

"तुम्हीं काल अशी मला खात्री होती. तिला मी तसं सांगितलं होतं. तुमचं कसं काय चाललंय् ?"

"चांगलं चाललंय्–मी आतां न्यायाधीश झालोय्"

"आणि संगीत? संसार?"

"त्या-दोन्हीं गोष्टीं मी तुला कधींच देऊन टाकल्या आहेत मधु! देण्यासारखं होतं तें सारं तुला देऊन टाकल्यावर मग मजजवळ बुद्धि राहिली होती. तिचा उपयोग करून मी वकील झालो. पैसा, यश मिळवलं आणि आतां न्यायशास्त्री झालो आहे"

'तुम्हीं लग्न केलं नाहीं अजून?"

"केलंय् ना!"

"कुठें असतात त्या?"

"कोर्टांत! मुलं बाळं ठेवसनात कांचेच्या कपाटांत. एकाचं नांव ठेवलंय् क्रिमिनल प्रोसीजर कोड–दुसरा आहे हिंदु लॉ"

"तुम्हीं ही गोष्ट बरी केली नाहीं!"

"त्याही विचाराच्या मी पलिकडे गेलोय् मधुमति! ज्या क्षणीं तुझं नि माझें मीलन अशक्य आहे याची जाणीव झाली, त्याक्षणीं माझ्या गळ्यांतल्या रागिण्या पळून गेल्या आणि सारीं नातीं सरलीं.

"पण तुम्हीं मला वचन दिलं होतंत"

"तें दिलं नसतं तर कदाचित् तूं दुःखी झाली असतीस. तुझ्या आयुष्याच्या मार्गांत मला कांटे पसरायचे नव्हते. म्हणून माझी सारीं सुखें तुझ्या मार्गावर मी पायघड्यांसारखी पसरली. तुझ्या संसाराच्या वार्ता मी ऐकत होतो आणि एकेक राग मी गिळून टाकीत होतो. आतां सारे राग आणि सारा राग मी पचविला आहे."

"तुम्हीं हें करून काय साधलंत ?"

"जमाखर्च मांडायला अजून अवकाश आहे मधु. पण मी फक्त तुझं सुख पाहिलं–फक्त तुझं सुख!" तूं सुखी झालीस ना ? तुझं ठीक चाललंय् ना?"

"तशी मी सुखी आहे. होते असं म्हटलं पाहिजे. आज मी खूप खुशीत होते. तुम्हीं खूप मोठे झालांत. माझ्या मधूनें मला स्वागत गीत म्हणून दाखविलें. मी घरीं ते स्वतःशीच खूपदां म्हटलं."







"पण मी दु:खी नाहीं. मधुमति, माणसं प्रेमावर, प्रेमाच्या आश्वासनांवर, नुसत्या आशिर्वादाच्या हातांच्या इशाऱ्यावर जगतात. मोठी होतात. जे भंग पावते तें प्रेम असत नाहीं. ती असते फक्त एक वासना. तुझ्या सुरांनीं, तुझ्या शब्दांनीं, तुझ्या वागण्यानें मला नेहमीं प्रीतीचेंच आश्वासन दिलें आहे. आणि त्या शक्तीनें माझी सतत साथ केली आहे. ही शक्ति फार मोठी आहे."

"पण यांत तुम्हीं सारं कांहीं गमावलं आहे आणि मी सारं कांहीं कमावलं आहे, याची खंत शिल्लक उरतेच."

"नाहीं मधु, तूं सारं कमावलं हेंही खरं नाहीं, मी सारं गमावलं हेंही खरं नाहीं, तूं संसार केला, तुला चांगली मुलं लाभली. पति लाभला. स्त्रीला आवश्यक असतं तें संरक्षण मिळालं. घर मिळालं आणि तरीही तूं सारं कमावलंस हें खरं नाही, तूंही असं कांही तरी गमावलं आहेस मधु. कीं जें गमावल्याची खंत तुला आयुष्यभर जाळीत राहील. तूं तुझे सूर गमावले आहेत. तुझी मुलगी ते घेऊन गेली आहे. तुझा तंबोरा. त्या गवसणीवरची धूळच सांगते कीं, तूं खूप वर्षांत गायलेली नाहींस. "खरं ना?"

"खरंय्!"

"आणि मी मात्र खूप कमावलं आहे. मी पूर्वी नुसताच गात होतो. आतां लोक म्हणतात तुमच्या गाण्यांत दिल आहे. हृदयाचे कणन् कण तुम्हीं हलवून सोडतां. ही दर्द, हा भाव, ही उत्कटता मला तूं दिलीस मधु! तंबोऱ्याचे सारे स्वर एकच स्वरलहरी माझ्या डोळ्यांपुढें उभ्या करतात–त्या स्वरांचं नांव असतं "मधुमती" मी तुला गाणं दिलं. पण तें देऊन मी श्रीमंत झालो. मला खूप मिळालं."

"पण तुम्हीं एकटे राह्यलांत. एकाकी राह्यलांत."

"हेंही खरं नाहीं नाहीं मधु! मी कधींच एकटा नव्हतो व नाहीं. कारण मी अशा एका मुलीवर प्रेम केलं कीं, जिनें मला कधीं एकटं राहूंच दिलं नाहीं."

"पण मला फार वाईट वाटतं. तुमच्या प्रगतीच्या वार्ता मी ऐकत होते. तुम्हीं इंग्लंडला गेलांत तेंही मला कळलं. बॅरिस्टरीहून परत आलांत तेंही वृत्तपत्रांत वाचलं. त्याचं कात्रणही मी जपून ठेवलं आहे. पण नंतरची हकीगत मला कळली नाहीं."

"तें श्रेय सुद्धां तुझेंच आहे मधु! मी तुझ्या पासून दूर गेलो. माझ्या अस्तित्वालाच जणुं ते आव्हान होते. माणूस मोठा आहे. जीवनांतली विविध सौंदर्यें कुठल्याही खंतीहून मोठी आहेत, अशी माझी श्रद्धा होती. पराक्रमाला पराभव हें एक आव्हान असते मधु, मी तें स्वीकारलें. लौकिक अर्थांनी मी मोठा झालो. मला सारें कांहीं मिळालें. मी सुखीही आहे आणि तुझ्याच प्रमाणें सर्व कांहीं मिळूनही दु:खी आहे. पण माणसांचं नेहमीं असंच असतं मधु! आपल्याला तें तसंच स्वीकारलं पाहिजे. नाइलाजानें नव्हे. आनंदानें!

"तुम्हीं खरोखरच फार मोठे आहांत. पण मला मात्र फार वाईट वाटतं हो हें पाहून."

"असं व्हायला नको होतं."

"हें सारं ठरविणारे तरी आपण कोण? आपण एकच करावं. जें आलं आहे. त्यांतलं उत्तम देऊं या लोकांना–राखूं या स्वत:-साठीं. तुला खरंच खंत वाटते मधु!"

"होय! खूप खंत वाटते"

"मग तो तंबोरा इकडे घेऊन ये. काढून टाक ती गवसणी आणि लाव सूर"

मधुमति उठली. तिनें तंबोरा काढला. तेवढ्यांत मुलें आली "आई, तूं आज गाणं म्हणणार? किती मजा "असं म्हणून तीं नाचायला लागली.

"मी नाहीं! हे म्हणणार आहेत. त्यांच्यासाठी मी तंबोरा काढला बाहेर!"

"काय मी!"

"होय तुम्हीं! तुम्हीं आज मला पुन्हां गाणं देऊन जा! खूप वर्षांनी मी तुमच्यासाठीं ही गवसणी बाहेर काढली. मी पुन्हां कमाईच करणार आहे. पुन्हां तुमच्याकडूनच कांहींतरी घेणार आहे."

"कीं जे घेतल्यानें मी दरिद्री होणार नाहीं. श्रीमंत होणार आहे. खूपसं कमावणार आहे.

तीं दोन्हीं मुलें आळीपाळीनें माझ्याकडे व तिच्याकडे पाहूं लागली.

"पाहतेस काय मधुमति, अग ह्यांनींच तर मला गाणं शिकवलं"

"काय ह्यांनीं ?" तिचा आईवर विश्वास बसेना.

"नाहीं ना बसत विश्वास? ऐक • तर!" "असें म्हणून मी तंबोरा घेऊन स्वर लावला. मी त्या दिवशीं खूप गायलो. पण काय गायलो ते मला कळत नव्हते. स्वरांच्या मखरांत मी बसलो होतो.

( पृष्ठ २११ वर पहा )














[ पृष्ठं १० वरून—शिरीन ]

माझ्या वायकोचें नांव ऐकतांच तुझ्या पापण्या किंचित् खालीं वर झाल्या व तूं म्हणालीस—

"कुणाची तरी वाट पहातां येणं, कुणीतरी वाट पहाणं, कुणाचा तरी आधार असणं, कुणाला तरी आधार देणं ह्या केवढचा भाग्याच्या गोष्टी आहेत !"

"आहेत खऱ्या." मी उत्तरलो.

'लहानपणीं आईवापांचा मला फार आधार वाटायचा. बाबा मला गाडींतून शाळेंत सोडायचे, गाडींतून परत न्यायचें !"

"तेव्हां तुमच्याकडे गाडी होती ?" मी विचारले.

"होय ! गाडी होती, पैसा होता, लहानपणीं फुलासारखं मला आईवाबांनीं वाढवलं. पुढें दिवस फिरले. मलाच त्यांना आधार द्यायची वेळ आली. भावाचा कांहींच उपयोग नाहीं. तोच माझे पैसे लुवाडतो. एवढंच त्याचं काम. बाकी सारं माझं मीच पहाते." तूं उसासा सोडलास. तुझ्या हाताला स्पर्श करून मी म्हणालो—

"उद्यांपासून तुमचं एक काम मी निश्चित करीन !"

"कोणतं काम कराल ?" तूं विचारलंस.

"माझ्या गाडींतून मी तुम्हांला घरापर्यंत पोहोंचवून देत जाईन."

"ओ ! थँक्यू सो मच !" तूं म्हणालीस, "त्या निमित्तानें तरी मला तुमची संगत मिळेल आणि तुमचं बोलणं ऐकायला सांपडेल. एकेकदां मला इतकं कांहीं उदास आणि एकटं वाटतं ! खरंच तुम्ही पोहोंचवत जा मला घरापर्यंत."

"तुला कुणी कांहीं म्हणणार तर नाहीं ?" मी विचारले.

"मला म्हणणारं आहेच कोण?" तूं मला स्मित करीत म्हणालीस, "म्हणणारं कुणी मिळावं हेच तर मला हवं आहे."

"उद्यांपासून मी ते काम करीन !" मी उत्तर दिले व घराकडे निघालो. त्यानंतर तुझा माझा स्नेह झपाट्यानें वाढत गेला. माझ्या गाडींतून मी तुला घरापर्यंत पोहोचवूं लागलों. कधीं कधीं घेऊन येऊं लागलो. तुझे म्हातारे आईबाप बारीक डोळे करून तुझा माझा वाढता संबंध पहात होते. ते माझ्याशीं वाईटहि वागत नव्हते आणि बरेहि वागत नव्हते. पाळायेचे ते उपचार पाळत होते.तुमच्या समाजांत एकीकडे बायकांना पुष्कळ स्वातंत्र्य आ आणि दुसरीकडे जातिप्रेम आहे. कर्मठपणा आहे. हा कर्मठपणा आधुनिकतेखालीं झांकलेला आहे. आजच्या काळानें कांहींसा हतबल करून ठेवला आहे. तुझ्या माझ्या संबंधांत तुझे आई-वडिल हतबल झालेले होते. मी कुटुंब-वत्सल विवाहित माणूस आहे, हें ऐकून त्यांना बरेहि वाटले आणि वाईटहि वाटले. हा मार्ग धोक्याचा आहे, आपल्या संगतींत आपत्तीची बीजं आहेत एवढी जाणीव त्यांच्या पांढऱ्या केसांना खचित झालेली होती.

ती जाणीव मलाहि होती. तुलाहि असायला चिंता नव्हती. मला बायकापोरे आहेत. माझ्या बायका पोरांवर माझें प्रेम आहे. एखाद्या नादापायीं बायकापोरांकडे दुर्लक्ष करणाऱ्या आणि त्यांचे हाल करणाऱ्या उल्लू माणसांपैकीं मी नव्हे. माझी बायको, माझे कुटुंब आणि तूं, असें द्वंद्व उत्पन्न झालें असते, तर निश्चितच मी माझ्या बायकोच्या व कुटुंबाच्या अंगानें उभा झालो असतो, तुझ्या अंगानें नव्हे. तसें करणेंच मला भाग होते. बायकोला टाकण्याइतकी किंवा दुखावण्याइतकी निर्दयता किंवा अन्याय माझ्या स्वभावांतच नाहीं. आणि तरीहि मी तुला सोडत नव्हतो. सावध करीत होतो. पण सोडत नव्हतो. आणि तूंहि मला सोडत नव्हतीस. सावध होत नव्हतीस. तुला सावध व्हायचेंच नव्हते. बोलून चालूनच एका विवाहित माणसाची संगत तूं शोधली होतीस, तो विवाहित आहे ह्याचा फारसा विधीनिषेधहि तुला नव्हता. संगत तुला अधिक महत्त्वाची वाटत होती. तीच तुझी भूक होती. आवश्यकता होती. माझी बायको तूं कधीं पाहिलीच नव्हतीस. माझे लग्न जसें कांहीं तुझ्या स्मरणांतच नव्हते. तुझ्या संगतींत मी एकटा असे. तेव्हां आणि तेवढ्यापुरता तरी मी तुझाच आहे असें तुला वाटत होते. आणि तेवढें तुला पुरत होते. त्यावर तूं जगत होतीस. माझ्या संगतींत मिळेल तेवढा आनंद तूं घेत होतीस. एक स्त्री म्हणून तेवढाच आनंद तुझ्या आयुष्यांत होता. एक तरुण मुलगी म्हणून तुला जे ह्या वयांत मिळावयास पाहिजे, ते तुला मिळालेलेच नव्हते. पुरुष मिळाला नव्हता, संसार मिळाला नव्हता. मिळाला होता तो एकटेपणा, कष्ट, ज्याचा शेवट दृष्टिपथांत नाहीं, असें यांत्रिक वैराण आयुष्य ! आणि हें मला ठाऊक होते. म्हणूनच कळून आणि न कळूनहि मी तुझ्याबरोबर पावलें टाकीत होतो. ह्या पावलाखालीं निखारे फुलूं शकतील, ह्याचीहि मला कल्पना होती. तरीहि तूं टाकावयाला सांगशील तेवढी पावलें मी टाकीतच होतो. एकीकडे मला तुम्हां शिकलेल्या कुमारिकांचा मोठा चमत्कार वाटत होता. दुसऱ्या स्त्रीच्या नवऱ्याबरोबर फिरण्यांत, त्याच्याशीं शारीरिक सलगी करण्यांत आतां तुम्हांला कसलाहि संकोच वाटत नव्हता. कसलेहि पाप वाटत नव्हते. पाप-पुण्याच्या कल्पनेला जाळून भस्म करील अशी तुमच्या एकटेपणाची आग होती. अशी तुमच्या अशांत व अतृप्त तारुण्याची भूक होती. डोळे असून तुम्हीं आंधळ्या होतात. बुद्धि असून विवेकशून्य होतात. आणि मन असूनहि तुम्हांला मन नसल्यासारखे झाले होते. एक प्रकारची बेछूट बधिरता तुमचे ठिकाणीं आली होती. आणि ह्याचेच मला दुःख वाटत होते. केवळ राग नव्हे, दुःख ! तुझ्या मुक्या दुःखानें मी कळवळत होतो. व तुझी संगत सोडत नव्हतो ! एखाद्या प्रियाराधन करणाऱ्या अविवाहित पुरुषानें एखाद्या कुमारिकेशीं वागावे तसा प्रसंगीं मी तुझ्याशीं वागत होतो. तीच माझी वास्तव भूमिका आहे, असे तूंहि त्या क्षणापुरते मानत होतीस. आपण दोघेहि भूमिका करीत होतो, आणि पुढें जात होतो. प्रवेशामागून प्रवेश रंगत होते. पहिल्या भेटींतच आपण कितीतरी पुढें गेलो. तूं पुढें नेलेस आणि मी पुढें गेलो. व मग तिथेंच थांबलो. मी तुला घरापर्यंत पोहोंचवीत राहिलो. पण तेवढ्याने तुझें समाधान झालें नाहीं. एक दिवस आपण गाडींत बसलो आणि तूं मला म्हणालीस—

"मला तुम्हीं असे नुसतेच घरापर्यंत कुठवर पोहोंचविणार ?"

"आणखी काय करूं मग ?" मी विचारले. "मी तुला घरापर्यंत पोहोंचवितो हेंच मुळी आतां कांहीं लोकांच्या डोळ्यांत येऊं लागले आहे !"

"तुम्ही लोकांच्या डोळयांनीं कां पहात असतां ?"

"नाहीं ! संध्यां तरी मी तुझ्याच डोळ्यांनी पहातो आहे."

"तर मग आज मला घरीं नेऊं नका. तिथला एकटेपणा, डॅडी ममीची किरकिर, कुबटपणा ह्यांचा मला अगदीं कंटाळा आला आहे. तिथं गेलं कीं, मला एकदम म्हातारं झाल्यासारखं वाटतं ?"

"तर ... तुला कुठें जावसं वाटतं !"

दूर कुठे तरी चला ! दूर गांवाबाहेरच्या टेकडयांत ! जियें सगळं हिरवंगार असेल, जियें झुळ झुळ पाणी वहात असेल, जियें म्हाताऱ्यालाहि तरुण झाल्यासारखं वाटेल, आणि तरुणाला पोरपणाचे पंख फुटतील तियं जाऊं या आपण ! घाटांत !

"पण तिथें जाऊन परत यायला उशीर होईल, अंधेर पडेल !"

"अंधेराची भीति कां वाटते तुम्हांला ?"

"मला भीति वाटत नाहीं. पण तुला भीति वाटायला पाहिजे."

"मला नाहीं अंधेराची भीति वाटत !" तूं माझ्या दंडावर तळवा दाबत म्हणालीस, "हा उजेडच मला अंधेरासारखा वाटतो, आणि तो अंधेर उजेडासारखा वाटेल !"

"घरीं तुझे डॅडी ममी वाट पाहतील !"

"पाहूं देत वाट ! त्यांच्यासाठीं मी किती गोष्टींची वाट पहात बसले आहे !" तुझ्या पाकळीसारख्या नाकपुडया-तुझ्या खोल शब्दार्थाचे पडसाद माझ्या मनांत उमटत राहिले. मी मुकाटयानें तुझ्या घराचा रस्ता सोडला व गाडी गांवाबाहेर काढली. गांवाबाहेरच्या हिरव्यागार टेकडयाच दिसूं लागल्या. नगरांतलें मचूळ, शिळे वायुमान मागें राहिले. रानांतल्या स्वच्छ, गार वाऱ्याचे झोत तुझ्या माझ्या अंगावर उसळूं लागले. तूं मला बिलगून बसलीस. सूर्य क्षितिजाला टेकला होता. सभोंवार सोनेरी प्रकाशाचा सागर पसरला होता. त्यांत हिरव्या डोंगर टेकडयांची बेटे उठून दिसत होती. स्वच्छ पाण्याचे झोत खडकावरून उडया घेत होते. तो देखावा एखाद्या चित्रासारखा होता. मी गाडीची गति मंद केली. तूं म्हणालीस—

" आपण येथें उतरूं या ? मी गाडी वाटेच्या कडेला घेतली व थांबविली. एका अंगाला डोंगर होते व दुसऱ्या अंगाला दरी होती. उतार होता. शिलखंड होते. झाडी होती. दरीच्या दिशेनें जाण्यासाठीं हातांत हात घालून आपण वाट ओलांडू लागलो. तोच वळणावरून मंद गतीनें "आरामगाडीचे धूड आलें. खिडकीं-तून कुणीतरी डोकं काढलं व ओरडले. "नमस्कार मंडळी ! नमस्कार !" तो व्होरा होता.

"आतां हा गांवात जाऊन वडवडणार !" मी म्हणालो.

"वडवडू दे !" तूं म्हणालीस.

"त्याच्या वडवडण्याची तुम्हांला भीति वाटते कां ?"

"तुला जास्त भीति आहे." मी उद्गारलो. तूं माझा हात धर-लास. व उतारावरून पावले टाकीत म्हणालीस—

"मला नाहीं कसली भीति ! किती सुंदर ही संध्याकाळ आहे ! तुम्ही आहांत, मी आहे ! ह्या क्षणांत रंगून मला जायचं आहे ? पुढचा मागचा विचारच करायचा नाहीं !"

"पण हा क्षण पुढच्या मागच्या क्षणाशीं बांधलेला आहे." मी शांतपणें म्हणालो. त्यावर उत्तेजित स्वरांत तूं उत्तर केलेस—

"आपण तो तोडून वेगळा काढूं या !" तेंच आज मला करायचं आहे !"

'तसं करणं सोपं नाहीं" तुला सावध करण्यासाठीं मी म्हणालो. "पुढचं मागचं सारं विसरून हा क्षण वेगळा काढणं सोपं नाहीं !" त्यावर तूं एकदम चिडून व रडकुंडीला येऊन म्हणालीस—

"हे असचं तुम्हाला बोलायचं आहे कां ? तर मग फिरा मागें ! ही मी चालले." माझा हात सोडून खरोखरचं तूं उलटी फिर-लीस व झपाटयानें चालू लागलीस. तुझ्या वगलेतल्या उशीकडे तेव्हां माझे लक्ष गेलें. त्याक्षणीं माझ्यांतला पुरुष जागा झाला. मी पुढचे मागचे सारे विसरलो व तुझ्यामागें धावत ओरडलो,

"चल शिरीन ! तुझी इच्छा असेल तिकडे चल !" मी तुला धरले. जवळ घेतली. तूं मला मिठी मारलीस. तुला हातावर घेऊन मी पुन्हां उताराला लागलो. समोरच्या झाडींत शिरलो. एका ओलसर शिलखंडावर मी माझा पाणकोट पसरला आणि मग काळाचे भानच आपणाला उरले नाहीं. पुढचे मागचे भान उरले नाहीं. कांहीं काळ आपण अभेदसम होऊन गेलो. एकदां घडल्यावर कधींहि पुसतां येत नाहीं, असें कांहीं तरी घडून गेलें. आपण परत फिरलो तेव्हां अंधेर पडला होता. विरळ ढगांतून फिकट चंद्र मधूनच डोकावत होता. चंद्र थकलेला दिसत होता. झिंगलेला दिसत होता. आपणहि एका तंद्रित होतो. फारसे बोलत नव्हतो.

"तुम्हीं बोलत कां नाहीं ?" तूं विचारलेस.

"आतां आपण बोलण्याच्या पलीकडे नाहीं कां गेलो !" मी उत्तर दिले.

"आपलं चुकलं असें तुम्हाला वाटते आहे कां ?" माझ्या खांद्यावर तूं गाल घासलास.

"आतां ती चर्चा पाहिजे कशाला !" मी म्हणालो.

"नाहीं, मला चर्चाच करायची आहे." तूं आग्रह धरलास. "पाप-पुण्य कशावरून ठरवतात हो ? पूर्वी पुरुष पुष्कळ बायकांशीं लग्न करीत होते नव्हे कां ?"

"करीत होते." मी थोडक्यांत उत्तर दिले.

"कृष्णाला पुष्कळ बायका होत्या. अर्जुनाला एकापेक्षा जास्त बायका होत्या, भीमाला होत्या."

"होत्या !"

"मग ती सगळी माणसें पापी होती कां ?"

"असं त्यांना कुणी म्हटलेलं नाहीं. त्यांची गणना श्रेष्ठ पुरुषांतच केली जाते. पण कृष्ण, अर्जुन, भीम, एवढी मोठीं नांवें तरी हवीत कशाला ? अगदीं पर्वापर्यंत कांहीं सामान्य माणसें देखील एकापेक्षां अधिक बायका करीत !"

"खरं ना ?" तूं माझ्या खांद्यावर मस्तक ठेवलंस.

"अगदी खरं ! पण पुरुषानं एकाच वेळीं एकाच बाईशीं लग्न करावं असा निर्बंध तुमच्यांतल्याच दीडशहाण्या बायकांनीं मागून घेतला आहे."

"पण समजा !" माझ्या केसाशीं खेळत तूं म्हणालीस. "असा निर्बंध नसता, तर तुम्हीं माझ्याशीं लग्न केलं असतंत कां ?"

"तुला माझ्याशीं लग्न करावसं वाटलं असतं कां ?" मी विचारले.

अनुक्रमणिका






"अजून हा प्रश्न तुम्हांला विचारावासा वाटतो कां ?" तूं प्रति प्रश्न केलास.

"तुझं स्वतंत्र व्यक्तित्व, तुझं आर्थिक स्वावलंबन तुला सोडावसं वाटलं असतं कां ?"

"बुडवून टाका ते स्वतंत्र व्यक्तीत्व आणि आर्थिक स्वावलंबन ! त्याचाच तर मला वीट आला आहे. ज्याच्याशीं एकरूप होऊन जावं असा पुरुष पाहिल्यावर कोणती शहाणी मुलगी स्वतंत्र व्यक्तित्वाचा हट्ट करील आणि आर्थिक स्वावलंबनासाठीं टाहो फोडील ?"

"असं म्हणतेस ?"

"होय, असं म्हणते ! तर मग सांगा, तुम्ही माझ्याशीं लग्न केलं असतत कां ?"

"आतां तो खेळ करुन उपयोग काय शिरीन ?"

"उत्तर टाळूं नका ! खरं सांगा तुम्हीं माझ्याशीं लग्न केलं असतंत कां नाहीं ते !"

"ह्या वयांत !"

"हो ह्या वयांत !"

"माझं एक लग्न झालं असतांना ?"

"होय, एक लग्न झालं असतांना !"

"मी काय केलं असतं हे निश्चित सांगता येत नाहीं शिरीन. कारण आजच मी माझ्या कल्पनेबाहेरच्या गोष्टी करून बसलो आहे. पण एक लग्न झालं असतांना ह्या वयांत मी तुझ्याशीं लग्न करणं बरोबर झालं नसतं. एव्हढं निश्चित !"

"कां ?"

"त्यांत तुझ्यावर अन्याय झाला असतां. तुला होणाऱ्या मुलांवर अन्याय झाला असतां, माझ्या पहिल्या बायका-पोरांवर अन्याय झाला असता ! आमच्यांतल्या सुधारकांनीं ज्या विषम विवाहावर आणि 'बिगमी'वर पापकर्मांचा शिक्का मारला तेंच पाप माझ्या हातून घडलं असतं !"

"म्हणजे दोन बायका करणं हे तुम्हांला पाप वाटतं तर ?" तूं कांहींशा तीव्र स्वरांत विचारलेस.

"तसंच कांहीं नव्हे." मी म्हणालो, "ते सारं संदर्भावर अवलंबून आहे. ह्या देशांत पुरुषानें एकापेक्षां अधिक बायका केल्याची उदाहरणं आहेत. एव्हढंच नव्हे, तर बायकांनीं एकापेक्षां अधिक पति वरल्याची उदाहरणं आहेत. पण वरंच वय झालेल्या पुरुषानें एखाद्या कोवळ्या मुलीशीं लग्न केल्यामुळें किंवा मोठ्या वयाच्या बाईनें एखाद्या तरुण पुरुषाशीं लग्न केल्यामुळें आयुष्यांतले सर्वच फार महत्वाचे हिशेब चुकण्याचा संभव आहे."

"अस्सं !" उसासा सोडून तूं म्हणालीस व गप्प बसलीस. मी जे कांहीं बोललो ते एकीकडे तुला पटलं असलं पाहिजे तरीहि त्यानंतर आपण पुन्हां पुन्हां त्या टेकड्यांवर गेलो. अगदीं दुसऱ्या दिवशींहि गेलो. सारं कळून तुला कांहींच वळत नव्हतं. आणि तुला सोडावं, तोडावं, असं मला वाटत नव्हतं. तुझा हिरमोड करणं मला शक्य होत नव्हतं. वाटेंतले सर्व काटेकुटे दिसत असूनहि त्याच मार्गानें मी जात होतो. ह्याचं कारण ? अनुकंपा, सहानुभूति, हे तर एक कारण होतंच. तुझा कोंडमारा माझ्यानं पहावत नव्हता. पण एवढ्यानं सारं संपलं नाहीं. मला तुझ्या सर्व गुणांचाहि मोह वाटत होता. एका कोवळ्या मुलीनं आपल्या प्रेमांत पडावं, ह्याचा कांहीं आनंदहि वाटत होता. भ्रमरवृत्ति, बहुपत्नीकत्व हा पुरुषाच्या स्वभावाचा एक स्थायीभाव आहे. संस्कार, मूल्य, भावना, वय, अनुभव, विचार ह्यामुळें हा स्वभाव पालटल्यासारखा वाटतो. पालटतोहि, दबून जातो. पण ह्यापैकीं कशाचेहि दडपण नसलेल्या आधुनिक स्त्रीशीं गांठ पडताच हा स्वभाव जागा होतो. मोकळा सुटतो. तेच माझ्याही विषयांत झाले तुझ्या संगतींत मी रमूं लागलो, रंगू लागलो. त्या संगतीचें सारें मूल्य तुलाच द्यावयाचे होते. माझा संसार सुखानें चालू होता आणि तुला संसारच नव्हता. माझ्या सहवासांत मिळणाऱ्या दोन घडीच्या सुखावरच तूं संतुष्ट होतीस. तुला संतुष्ट राहणें भाग होते. एकटेपणा सोसण्याचे सामर्थ्य त्या दोन घटकामुळें तुला मिळत होते. तुझ्या बेचव आयुष्यांत धुंदी उत्पन्न करणाऱ्या त्या दोन घटका होत्या. पण ह्या धुंदीला एके दिवशीं अकस्मात् धक्का बसला. त्या दिवशीं तूं व मी दुपारच्या एक "शो" पहायला गेलो होतो. नवरा-बायकोनें जावे तसेंच आपण गेलो, व तसेंच आपण बसलो. चित्र विवाहबाह्य प्रेमाविषयीं होते आणि अतिशय हृदयद्रावक होते. चित्र पाहतांच तूं क्षणोक्षणीं डोळे पुसत होतीस. विवाहित पुरुषाच्या प्रेमांत पडलेली कुमारी नायिका शेवटीं स्वतःला जाळून घेते त्या प्रसंगाचा चटका तुला फार बसला. आणि मलाहि तो चटका बसला. तुझ्या अंगावर रेललेला माझा देह दूर झाला. मी ताठ होऊन बसलो आणि ताठ होऊन बसलो तेंच फार बरे झाले. कारण चित्र संपले आणि माझी बायको माझ्यासमोर येऊन थबकली. आपल्या एका मैत्रिणीबरोबर अकस्मात् ती ह्या चित्राला आली होती. माझ्या बायकोला आज तूं प्रथमच पाहात होतीस. तिची आणि तुझी मी ओळख करून दिली. तिचा स्मित करणारा चेहरा तेव्हांहि तसाच स्मित करीत होता. त्या स्मितांत मला मात्र उपरोधाची छटा दिसली. तूं कांहींशीं गांगरल्यासारखी वाटलीस. पण तुझ्या बुद्धीचे चापल्य शाबूत होते. तूं माझ्या बायकोला म्हणालीस--

"बरं झालं हे मला इथें भेटले ! मीच त्यांना माझ्या शेजारी बोलावून घेतलं. एक गुंड सारखा माझ्या मागावर होता !"

माझ्या बायकोला हे तुझे चतुर स्पष्टिकरण कुठवर पटलं ते ठाऊक नाहीं. पण माझ्या बायकोनें त्या प्रसंगावर विशेष असें कुठ-

लेच भाष्य केले नाहीं. "सिनेमा छान होता ना!" एवढेंच तिनें मला विचारले. माझी बायको फार प्रेमळ आणि शहाणी बाई आहे. तिचीहि आतां चाळीशीं उलटली आहे. पाव शतकावर तिनें माझ्यासंगें संसार केला आहे. ती मला फार चांगला ओळखते. आजकालच्या मुलींनाहि ओळखते. त्यांची सुखदुःखें व गुणदोष ओळखते. माझ्या कुटुंबनिष्ठेविषयीं तिची निश्चिती आहे. जगांतल्या दुसऱ्या कुठल्याहि बाईसाठीं मी तिला सोडणार नाहीं हेंहि तिला पक्के ठाऊक आहे. माझे अन्य दोष ती चालवून घेते. तिनें तें चालवून घेतलेच आहेत. प्रेम करणाऱ्या स्त्रीला क्षमा आणि समज कुणी शिकवावी लागत नाहीं. तुझ्या माझ्याकडे तिनें क्षमेच्या व समजुतीच्या व दृष्टिनें पाहिलें. पण त्या दिवसापासून तूं मात्र कांहींशीं अस्वस्थ झालीस. पुन्हां आपण घाटांत फिरायला गेलो. मी तुला घरापर्यंत पोहोंचवूनहि दिले. पण तूं अस्वस्थ होतीस. तूं अस्वस्थ आहेस, कसल्यातरी विचारांत आहेस हे मला कळत होतें. एखाद्याचे लग्न झाले आहे हे ठाऊक असणें, आणि त्याच्या बायकोशीं प्रत्यक्ष गांठ पडणें ह्या दोन गोष्टींत अंतर आहे. तशी तूं संवेदनाक्षम मुलगी आहेस. बुद्धिमान मुलगी आहेस. तुझे हे गुण गारठणें, कोंडले जाणें व बधिर होणें हा परिस्थितीचा परिणाम आहे. पण कांहीं एका परिस्थितींत माझी बायको तुला भेटली. व तुझी बुद्धि वेगळ्या दिशेनें चलनवलन करूं लागली. माझ्या बायकोच्या भेटीनंतर चारच दिवसांत तूं मला म्हणालीस—

"सध्यां कांहीं दिवस तुम्ही मला पोहोंचवायला येऊं नका. मी आपली बसनें जाईन!"

"कां?" मी विचारले. "पुन्हां माझी बायको भेटेल असं तुला वाटतं कां?"

"तसंच कांहीं नाहीं. पण सध्यां मी एकटीच जाईन." तूं उत्तर दिलेस.

मी आग्रह धरला नाहीं. आणि त्यानंतर तूं एकटीच घरीं जाऊं लागलीस. तेवढ्यांतच तुझी आणि निहालसिंगची ओळख झाली. ओळख वाढली. बस ठाण्यावरच तुझी एका गुंडानें छेड काढली. आणि जवळच उभ्या असलेल्या निहालसिंगनें तुझ्यासाठीं मारामारी केली. त्यानें तुला स्वतःच्या गाडींतून घरीं पोहोचवून दिलं. त्यानंतर त्याच्याच गाडींतून तूं घरीं जाऊं लागलीस. तो कार्यालय सुटण्याचे वेळीं बस ठाण्याजवळ तुझी वाट पाहूं लागला. अद्याप तूं माझ्याशीं बोलत होतीस. माझ्याकडे पाहून स्मित करीत होतीस. पण हे ते नव्हे, कुठेतरी कांहींतरी पाणी मुरत आहे हे माझ्या केव्हांच ध्यानांत आल होत. असेंच कांहीं आठवडे व कांहीं महिनेहि गेले. तुझ्या माझ्या सव्वा वर्षाच्या निकट स्नेहांत कसलं तरी अंतर पडलं. ते अंतर मी ओळखलं. मला ते थोडं जाणवलंहि. तुझीहि मला एक प्रकारची संवय झाली होती. म्हणून एक दिवस मी तुला विचारलं—

"चलायचं कां आज घाटांत!" तूं टाळाटाळ केलीस व म्हणालीस—

"आज नको! पुन्हां केव्हां तरी!" पण तो "पुन्हां" उजाडतां उजाडेना. तेव्हां मी पुन्हां तुला विचारलं—

"अलिकडे माया बरीच पातळ झालेली दिसते?"

"तसंच कांहीं नाहीं" तूं चाचरत म्हणालीस, "पण...

"हे पहा शिरीन" मी तुझ्या हातावर हात देत म्हणालो, "माणसानें मोकळ्या मनाने बोलणं चांगलं असतं!"

त्या माझ्या स्पर्शाचा म्हण, त्या माझ्या शब्दांचा म्हण, तुझ्यावर परिणाम झाला व तूं निकडीच्या स्वरांत म्हणालीस—

"बरेच दिवस झाले. मला तुम्हांला कांहींतरी सांगायचं आहे!"

"टाक सांगून!" मी म्हणालो.

"चला घाटांत फिरायला. मग सांगते!" तूं म्हणालीस व गाडी घाटाच्या दिशेनें धावूं लागली. आपल्या ठराविक जागीं गाडी थांबली.

"मात्र आज खाली त्या खडकाकडे जायचं नाहीं. इथेच मी तुमच्याशीं बोलणार आहे." तूं सूचना दिलीस. मी ती मुकाट्यानें मान्य केली व दाराच्या वरचा हात काढीत म्हणालो—

"बोल काय बोलायचे ते!"

"मी लवकरच लग्न करणार आहे." तूं एका दमांत बोलून गेलीस.

"निहालसिंगशीं?" मी विचारले. तुझ्या चेहऱ्यावर किंचित् आश्चर्य व भय दिसले आणि तूं उद्गारलीस—

"तुम्हांला त्याचं नांवसुद्धां ठाऊक झालेलं दिसत आहे!"

"मला सर्व ठाऊक आहे. पुढें बोल!"

"ह्या लग्नाच्या संबंधांत मला तुमचं सहाय्य पाहिजे आहे." पुनश्च साभिमाय दृष्टिनं तूं माझ्याकडे पहात राहिलीस. तुझ्या लग्नाला माझ्याकडून कांहीं अडचण येईल अशी शंका तुला वाटत असावी. तुझ्या शंकेमुळें माझ्या चेहऱ्यावर हास्याची छटा उमटली. तिकडे रोखून पहात करुण स्वरांत तूं म्हणालीस, "माझी अवस्था बरीच अडचणीची आहे!"

लग्नांतली अडचण प्रियकराला दूर करायला सांगण्याचा हा प्रकार थोडा विलक्षण होता. त्याचेंहि मला हंसू आले, पण ते आवरीत मी म्हणालो, "बोल, तुझी अडचण काय आहे? तुला मी कोणते सहाय्य करूं?"

"ह्या लग्नाला माझ्या मॅमी—डॅडींचा विरोध आहे. "तूं सांगू लागलीस—

"मी जाती बाहेर लग्न करूं नये असा त्यांचा हट्ट आहे."

"त्यांच्या ह्या हट्टांत कांहीं अर्थ आहे." मी म्हणालो, "तुमची जात फार लहान आहे. जातिधर्म टिकविण्यासाठीं तुमचा समाज इराणांतून येथें परांगदा झाला. जातीसाठींच हे तुमच्या पूर्वजांनीं केले व आपल्या धर्माचा पवित्र अग्नि प्रज्वलित ठेवला. अशा अवस्थेंत ह्या इवल्याशा जातींतल्या जर मुलीं भराभर परधर्मीयांशीं लग्न करून जाऊं लागल्या. तर ही जात लवकरच संपुष्टांत येईल. जुन्या संस्कारांत वाढलेल्या माणसांना ही गोष्ट असह्य वाटण्यासारखी आहे. तेव्हां एका हिंदूशीं तूं लग्न करूं नयेस असें तुझ्या आई-वडिलांना वाटणें साहजिक आहे."

"पण हिंदूंत आणि आमच्यांत तसें कोणते अंतर आहे?" तूं उत्तेजित स्वरांत प्रश्न केलास. तुझ्या लग्नाला अप्रत्यक्षपणें मी






अंड्षण आणोत आहे असें तुला वाटले व किंचित् उंचावलेल्या स्वरांत तूं म्हणालीस, "आम्ही अनेक हिंदू पद्धति पाळतो. रांगोळ्या काढतो. जानवी घालतो. कुंकू लावतो. हिंदूप्रमाणेंच आम्ही अग्नीला पवित्र मानतो. एवढेंच नव्हे तर अनेक हिंदू दैवतेंहि आम्ही पुजतो. वेषानें, भाषेनें व संस्कृतीनें आम्ही हिंदूनाच अगदीं जवळचे आहोंत, नव्हे आम्ही हिंदूच आहोंत. आमच्या जातींत लग्न करायचा ममी-डॅडींचा हट्ट पुरवायचा म्हणजे माझं कधीं लग्नच व्हायला नको. आमच्यांत मुलींची लग्नं सोपी नसतात. लग्नाविना अनेक मुली सुकून जातात किंवा फुगून फुगून म्हाताऱ्या होतात. माझं तसं व्हायला मला नको आहे. मी ज्याच्याशीं लग्न करणार आहे तो माणूस तरुण आहे, सुंदर आहे. संपन्न आहे. त्याचं फर्नीचरचं मोठं दुकान आहे. त्याच्या घरीं दोन गाड्या आहेत. प्रकृतीनेंहि तो चांगला धट्टा-कट्टा आहे. पूरा सहा फूट ऊंच आहे. निहालसिंग. माझ्या आई वडिलांचं दायित्व घ्यायलाहि तो सिद्ध आहे. अशा अवस्थेंत तो केवळ हिंदू आहे म्हणून मी त्याच्याशीं लग्न करूं नको? खरं तर, म्हणूनच मला त्याच्याशीं लग्न करावसं वाटतं. आमच्या एवढ्याशा जमातींत inbreeding फार झालेलं आहे. तेच तेच रक्त पुन्हां पुन्हां एकमेकांत मिसळत आहे. मला ते सारं नको आहे. मी वाटेल ते झालं तरी निहालसिंगशीच लग्न करणार आहे एवढेंच नव्हे, तर हिंदू धर्माचा विधीपूर्वक स्वीकार सुद्धां करणार आहे."

"निहालसिंगचा तसा आग्रह आहे कां?" मी कुतूहलानें विचारले.

"नाहीं!" तूं उत्तर दिलेस. "त्यांचा तसा आग्रह नाहीं. पण त्यांची तशी सूचना आहे आणि मी ती मान्य करणार आहे. माझ्यांत आणि त्यांच्यांत थोडंसुद्धां अंतर रहायला मला नको आहे!"

"तर मग तुझं सारं ठरलेलंच आहे." मी म्हणालों "इथें मी मध्यें पडण्याचा प्रश्न कुठें आला?"

"तुम्ही माझ्या ममी-डॅडींचं मन वळविण्याचा प्रयत्न करा. शक्य तर सारं गोडीगुलाबीनं व्हावं. आणि लग्न झाल्यावर त्यांनीं माझ्याकडे येऊन रहावं अशी माझी इच्छा आहे. तुमच्याविषयीं ममी-डॅडींचे चांगले मत आहे."

"खरंच?" मी उद्गारलो.

"होय" तूं सांगू लागलीस. "विशेषतः निहालशीं माझा परिचय वाढल्यावर आणि मी त्यांच्याशीं लग्न करायचं ठरवल्यावर तुम्ही त्यांना अगदीं देव माणूस वाटूं लागलांत!"

"मोठी मौज आहे?" हंसावे कीं रडावे ते न कळून मी नेहमीच्या गंभीर स्वरांत म्हणालो.

"तर तुम्ही त्यांना एकदां भेटा. त्यांचं मन वळविण्याचा प्रयत्न करून पहा."

"ठीक आहे. भेटतो मी तुझ्या ममी-डॅडींना."

"खरंच भेटतां?" डोळे विस्फारून माझ्याकडे पहात तूं म्हणालीस.

"खरंच भेटतो." मी उत्तर दिलें आणि तात्काळ तूं माझ्या अंगाभोंवती हात टाकलेस. माझ्या खांद्यावर गाल घासलेस. ह्या तुझ्या स्पर्शांत कुठलाहि विकार नव्हता. कुठलाहि मोह नव्हता. होता केवळ स्नेह! होती केवळ कृतज्ञता! होतें केवळ प्रेम! अगदीं स्फटिकासारखें शुद्ध व शुभ्र प्रेम! तुझ्या प्रेमाचा हा नवा आविष्कार पाहून माझ्या डोळ्यांत पाणी आले. मी क्षणभर तुझ्या मस्तकावर ओठ टेकले व तुला थोपटत राहिलो. आणि हा माझा स्पर्शहि अगदीं निर्विकार होता. त्यांत कुठलेहि हीण नव्हते. होतें ते केवळ वात्सल्य! होती ती केवळ सहानुभूति, सदिच्छा व सद्भावना! उपमा देतांना पूर्वेतिहास आठवून थोडा संकोच वाटतो, पण बापानें मुलीला करावा, तसाच तो स्पर्श होता. आणि त्या स्पर्शाला मी जागलो. तुझ्या आई-वडिलांचे मन मी वळविले. तुझे लग्न व्हावे, अशीच माझी इच्छा होती. माझ्या संपत आलेल्या आयुष्यांत तुझ्यासारख्या तरुण मुलीला जागा नव्हती.

केवळ भुकेपोटी तूं प्रवाहपतित झालीस व माझ्या आयुष्यांत आलीस. माझी भूक हा केवळ एक चाळा होता. ती जीवन मरणाशीं संबंध ठेवणारी निकड नव्हती. तुझ्या तारुण्याचे, सौंदर्याचे व बुद्धीमत्तेचे सार्थक व्हायचे तर तुझ्यासारखाच जोडीदार तुला मिळणें आवश्यक होते. तुझा माझा संबंध लांबत राहिला असता तर तुझ्या सर्व आयुष्यावरच कीड पडली असती. तुझा जन्मचा जन्म वाया गेला असतां. मलाहि ते पाप अक्षम्य वाटले असते. जाळत राहिले असते. ही जाणीव मला होती. तुझ्याविषयीं माझ्या मनांत वात्सल्याची भावना होती, विशुद्ध प्रेमाची होती. त्या भावनेला प्रसंगीं विकारानें ग्रासले, पण अंतीं त्या भावनेनेंच मला व तुलाहि वांचविले. प्रायश्चित्तास योग्य अशा पापापेक्षांहि त्या शुद्ध भावनेचे पुण्य अधिक बलवत्तर ठरले व त्यानेंच तुला मला तारले. तुझे लग्न ठरले व झाले. तुझ्या लग्नाला मी उपस्थित राहूं शकलो नाहीं पण माझ्या सदिच्छा व माझे आशीर्वाद अगदीं मनःपूर्वक तुझ्यावरोबर होते. तुला योग्य पति सांपडला, तुला योग्य मार्ग अगदीं योग्य वेळीं सांपडला. जे फार थोड्या चुकलेल्या कुमारिकांच्या विषयांत घडते ते तुझ्या विषयांत घडले, ह्याचा मला मनस्वी आनंद झाला. मी नेहमींच्या चाकोरीनें चालू लागलो. तुला विसरून गेलो. बोलून चालून तूं माझ्या आयुष्यांतील एक फुटकळ प्रसंग होतीस. एक क्षणभर उसळून ओसरलेली लाट होतीस. तुझ्या माझ्या जीवनाची मुळें कुठेंहि परस्परांत गुंतलेली नव्हती. आणि आतां तर तूं एक परस्त्रीहि होतीस. तुला मी विसरून जाणेंच योग्य होते. मी तुला विसरून गेलोहि होतो. ह्या अशा गोष्टी जितपत विसरतां येतात, तितपत विसरलो होतो. आणि त्यानंतर आज तूं मला दिसलीस. ओळखीचे कुठलेहि चिन्ह तूं मला दाखविले नाहींस. कां बरे दाखविले नाहींस? कां बरे दाखविले नसशील? मी फटफटी चालवीत होतो व विचार करीत होतो. अपापतःच माझी फटफटी गांवाबाहेर आली होती; टेकड्या पार करून गेली होती. घाटांत आली होती. व थांबलो










होती. तुझ्यामाझ्या परिचयाच्या त्या लांबरूंद आसनासारख्या सपाट खडकावर मी विचार करीत बसलो होतो. तूं माझी ओळख सुद्धां कां म्हणून नाकारलीस? इतका कां मी निकृष्ट मनुष्य होतो? मी वागलो तसा तुझ्याशीं वागणारा, मी ज्या दृष्टीनें तुझ्याकडे पाहिले त्या दृष्टीनें तुझ्याकडे पहाणारा, आपली भूमिका संपतांच मुकाटयानें कडेस सरणारा दुसरा एखादा पुरुष तूं पाहिला आहेस कां? स्त्री पुरुषांना येणें शक्य तितक्या जवळ आपण येऊन गेलो. खेळांतला कां होईना, पण सहचर म्हणून तूं माझ्याकडे पाहिलेस. माझ्याशीं तूं लग्नाची भाषा केलीस ह्या साऱ्या गोष्टी इतक्या सहज व इतक्या पूर्णपणें विसरून जाणे शक्य आहे काय?

माझ्या मनाला मी हे प्रश्न विचारीत होतो. व एकेकाळीं तुझा निकटचा स्पर्श अनुभवलेल्या त्या दगडाला स्पर्श करीत होतो. मिनिटें गेली व तास! आणि एकाएकी मी माझ्या तंद्रीतून जागा झालो. घाटांत स्वयंप्रेरिकेचा कर्णा घुमला. एक झगझगीत वाहन धांवत आले व थांबले. माझे वाहन थांवत असें तिथेंच थांबले. वाहनांतून तुम्हीं दोघे खाली उतरलांत. तूं व निहालसिंग. परस्परांच्या हातांत हात घालून तुम्ही वाट ओलांडूं लागलांत. मी झुडपाआड दवलो. तूं उतारापाशीं आलीस. उभी राहिलीस. आपल्या त्या खडकाकडे पहात उभी राहिलीस. निहाल तुझ्या पाठोपाठ आला. हात धरून त्यानें तुला मागें नेले. आतां मला कळण्यासारखे कांहीं राहिले नाहीं. सांगण्यासारखें कांहीं राहिले नाहीं. तुम्हां दोघांच्या पाठमोऱ्या आकृति मला दिसत होत्या. मी तुमच्यापासून फार दूर नव्हतो. आणि तरीहि फार दूर होतो. आणि तसाच मी राहणार होतो. प्रत्येक स्त्रीला मिळाले पाहिजे ते तुला मिळाले होते. तुला तुझा संसार मिळाला होता. मी तुझ्या आयुष्यांत आलो आणि तुझ्या आयुष्यांतून गेलो याला कितीसा अर्थ होता? हे असें घडण्याचे तरी कारण काय होते? हेंहि घडले नसते तर वरे झाले असते. पण आपल्या समाजाच्या आजच्या अवस्थेत हे अपघात घडणें अनिवार्य आहे. फारसे कांहीं न बिघडतां ह्या अपघातांतून तूं सावरलीस हें तुझे भाग्य आहे व माझेंहि भाग्य आहे.

मावळतीच्या सूर्यकिरणांत जोडप्यानें वाट ओलांडतांना तुम्हांला मी पाहिले व माझा कंठ दाटून आला. मी डोळे मिटले व पुसले. पहाडांत मोटारीचा कर्णा पुन्हां घुमूं लागला. तेव्हां मी तुला मनोमन आशीर्वाद देत होतो. तुमचे कल्याण इच्छित होतो. • • •








[ पान २०४ वरून—कधीं वहर ......]

समोर मधु वसली होती. सुरांनीं वेडी झाली होती तीही, येवढंच मला दिसत होतं. भोंवतालचं मला कांहीं ठाऊक नव्हतं. फक्त मी, सूर आणि मधु !

माझी ती अवस्था पाहून मधूही घावरली. ती म्हणाली "पुरे, पुरे करा दिलीप, पुरे करा!" आणि तरीही मी गात राहिलो, माझे कान तर वहिरे झाले नव्हते ना?

आणि एकाएकीं मधुमतीनें वसंत वहार सुरूं केला. ते सूर मी ऐकले आणि मला शुद्ध आली. मधुमतीचे गाणें परत आले होते. ती गात होती. त्या गाण्यांत जणुं मला पुन्हां एकदां माझी मधुमति परत मिळाली होती. आणि तिला आणि त्या गाण्याला मी परत कधींही सोडणार नव्हतो.

मुलें कंटाळून झोंपली. माझ्या समोर त्यांचे चेहरे दिसत होते. पग जणुं मला डोळे नव्हतेच फक्त कान होते.

"गा. मधु गा, खूप गा. गात्रागात्रांना येऊं दे चेतना. वरसूं दे अमृत धारा. विरून जाऊं दे साऱ्या खंती आणि साकारूं दे तृप्त प्रीतीचा ताजमहाल! शरीरीणी प्रीतीच्या पलिकडचं एक असामान्य शिल्प झरूं दे तुझ्या नेत्रांतून, सुरांतून, नुसत्या अस्तित्वातूनही!

गातां गातां ती दमली. आणि माझ्या पायावर कोसळली. मी सावध झालो. उठलो.

"जातो मी मधु, मला गेलं पाहिजे. माझं काम संपलं. तूं मला जीवन दिलंस-नवं जीवन! नवी प्रेरणा! मी तुला तुझे हरवलेले सूर परत दिले. मी आंत आलो तेव्हां तंबोरा पाहिला. त्याची दुर्दशा पाहिली तेव्हांच मनांत एक ईर्षा पेटत गेली. मधुमति गायली पाहिजे. जिवाच्या आकांतानें गायली पाहिजे. तूं गायलीस. माझं काम झालं. ते सूर कधीं गमावूं नकोस मधु. अग, तीच तर माझी प्रेरणा आहे. माझ्यावर तुझं प्रेम आहे मधु?"

"होय दिलीप!"

"मग गात रहा मुली. ज्या दिवशी तुझं गाणं थांबेल त्यादिवशी माझं जिणं संपेल असं समज. त्या गाण्याची साथ हवी मज! त्या गाण्याची साथ! मधु मी आज श्रीमंत झालो. मला सोवत मिळाली. जीवनभर पुरणारी सोवत. आतां मी एकटा नाहीं मधु. एकाकी नाहीं! आजचा क्षण परम भाग्याचा आहे, परम भाग्याचा!" आणि मी वूट चढवूं लागलो. मधुमति दाराशीं आली. तिनें माझ्या पाठीवर हात टेकले. केंसावरून फिरवले. तिच्या डोळचांत गंगायमुना दाटल्या होत्या.

"आतां कधीं याल?" रुद्ध कंठानें तिनें विचारलें.

"तूं पुकारशील तेंव्हां. ज्या दिवशीं तूं खूप गाशील त्या दिवशीं मी येईन. अगदीं न बोलावतां येईन. कारण तेच तर माझें सुख आहे. गाणं विसरूं नकोस मात्र!"

मी वाहेर पडलो. गाडी स्टार्ट केली. करतांना मागें वळून पाहिलें. ढगांनीं व जलधारांनीं आकाश झांकळून गेलं होतं.

•••

# जोशी [एक कार्कून]



(मंगेश पाडगांवकरांची क्षमा मागून ह्या 'जोशीला' घरांत घेतला आहे. )

एक जोशी आहे माझ्या एका खोलींत पडून
आठवते बेकारींत होता तो फिरत
होता लिहीत अर्ज सवंगडयांच्या संगत
'सर्टिफिकिटें' अर्जाला आणि वशिल्यांसाठीं
आठवते अजूनि होता काळजींत किती ?
पण अकस्मात तो जातो कसा तरी चिकटून
एक जोशी आहे माझ्या एका खोलींत पडून
हपिसांतले ते दिवस टाकं-दौत घेऊन
खुर्ची मोडकी जराशी. . ठेवारी बसली वांकून
जाड कांचेची चाळिशी लावुनिया डोळयांवर
होते वोलत साहेब उग्र रोखून नजर
पण ठरेचना मन फायलींच्या जगतांत
जाई निमित्त काढून जवळच्या हॉटेलींत
'संडे' तांबडया रंगानें होता त्याला वोलावीत
चत्कोर रुमालानें पोर होती खुणावीत

कसें आवरावें मन? दांडी गेला हो मारून
एक जोशी होता माझ्या एका खोलींत पडून.

आणि पुढें कशासाठीं गेला रजा तो काढून ?
झाली बहिणींची लग्नें, नव्हते आजारपण
परि बारावें होतें 'तिचें' बाळंतपण
अशा सुखांत दुःखी आहे जोशी कारकून
खर्चाचा डोंगर पाहूं लागले लोचन
आणि कंबरडे त्याचे पार गेले हो मोडून
मिटलेल्या डोळचांपुढें पगारांच्या नोटा
फडफडणारी बिलें. . . . . . . .कशा चुकवाव्या वाटा ?

बिलांसवें त्या पळाला सारें कांहीं चुकवून
एक जोशी आहे माझ्या एका खोलींत पडून.
रोजपरि फुफांटतं घरीं बायको कजाग
तोफखाना गरजतो घेऊन डोक्यांत राग
जाचूं लागली जोशीला बायकोची कटकट
परि आठवते त्याला सकाळचे थालिपीठ
खेळ मोडलेला पुन्हा सारा मांडाया धजे
आपल्याच "निमिती"ला आपणच दूध पाजे

आणि कारटयाच्या कालव्यांत जातसे बुडून
एक 'जोशी' आहे माझ्या एका खोलींत पडून.
खोली असूनहि आतां खोली उरलेली नाहीं
हपिसाची 'जोशी'ला ओढ राहिलेली नाहीं
कुणीं सांगावें असेल पेन्शनीचा हा प्रताप
दोन वेळ 'गिळाया'ला मिळतसे आपोआप
कुणीं तरी साद घाली समोरच्या गल्लींतून
एक 'जोशी' आहे माझ्या एका खोलींत पडून.











# कृतज्ञता :

निष्ठावंत भारतीय जवानांनी आपल्या मातृभूमीच्या रक्षणासाठीं गाजविलेल्या शौर्याचा उत्साह दीपावलीच्या या बावीसाव्या खास अंकाच्या पाठीशीं आहे. त्याच उत्साहानें प्रेरित होऊन सध्याच्या अनेक अडचणींच्या परिस्थितींत कोणतीहि काटकसर न करतां साहित्य, संस्कृति व कला यांतील जितकें कांहीं चांगलें व नवें देतां येईल तितके दीपावलीच्या वाचकांना सादर करावयाचा प्रयत्न केलेला आहे.

या वार्षिकाचें हें स्वरूप म्हणजे विचारपूर्वक आणि योजनाबद्धरीत्या केलेली एक रचना आहे. गेल्या एकवीस वर्षांची ही साधना आहे. (यांतूनच निर्माण झालेली एक वाढती परंपरा आज दिसूं लागलेली आहे याचा आम्हांला अभिमान वाटतो) अर्थातच याचें कौतुक तेवढयाच उत्साहानें करणें व आमच्या प्रयत्नांना प्रतिसाद देणें हें चोखंदळ वाचकांच्या हातीं आहे.

महाराष्ट्रांतील साहित्य, संस्कृति व कलाप्रांतांतील प्रथितयश बुद्धिमंतांची आम्हांला नेहेमींच साथ असते. हें एक दुर्मिळ असें मोठें भाग्य ! या अंकातली 'मला परदेशांत भेटलेली अविस्मरणी स्त्री' ह्या लेखमालेचे श्रेय तर आमचे लेखकमित्र श्री. अरविंद गोखले यांना द्यायला हवे. त्यांच्याच प्रेरणेने ही लेखमाला दीपावलीला देणे शक्य झालें. या खास अंकाच्या योजनेंत या सर्वांनी आपला अमोलिक वेळ खर्चून आम्हांला जी आत्मीयतेनें मदत केली त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच.

दीपावलीच्या स्थापनेपासून 'घरोब्या'चे संबंध असलेले मे. टॉम अँण्ड बेचे मॅ. डा. श्री. गणेशराव तांबे यांच्या सहकार्याचा हात फार मोठा. अंक 'दीपावली'च्या श्रेष्ठ परंपरेचा निघावा म्हणून तळमळीनें हरतऱ्हेची मदत करणारे मित्रवर्य श्री. अच्युतराव बर्वे यांचें अकृत्रिम पाठबळ फार महत्वाचें. संपादनकार्यांत श्री. गोपाळकृष्ण भोबे व श्री. प्रभाकर अत्रे यांचें व जाहिरात विभागांत श्री. दाभोळकर यांचे सहाय्य फार मोलाचें. आणि मुद्रणकार्यात श्री. चंद्रकांत दळी यांचा श्रमाचा वांटा मोठा.

अंकाची सुबक छपाई करणारे 'जन्मभूमि' प्रेसचे संचालक व कामगार बंधु, बहुरंगी चित्रछपाई यशस्वी रीतीनें केलेलें 'आशा प्रिंटरी'चे श्री. भाई व सुरेश मालपेकर, फोटो ऑफसेट छपाई सफाईने करणारे जगदीश्वर प्रि. प्रेसचे श्री. भालचंद्रपंत पाठक व त्यांचे सहकारी– तिरंगी ब्लॉक्स दर्जेदार रीतीनें करणारे बॉम्बे प्रोसेसचे श्री. मोहनराव कामत व इतर ब्लॉक्स तत्परतेनें करून देणारे प्रभात प्रोसेसचे श्री. विष्णुपंत कडव यांचे–आणि अत्यंत महत्वाचे व मुख्य काम अनेक वर्षे आपलेपणानें व चोखपणें पार पाडणारे श्री. बाबुराव बागवे या सर्वांचे या मंगलप्रसंगीं शुभ चिंतितो.

स्टूडिओंतल्या सर्व सहाय्यकांनीं मनःपूर्वक सहाय्य केले त्याला तोड नाही. ते घरचेच. त्यांना आभार आवडणार नाहींत.

शेवटीं या अंकाला आपले बहुमोल साहाय्य देणारे आमचे सर्व लेखक मित्र, जाहिरातदार आणि आमचे असंख्य रसिक वाचक यांना येतें वर्ष आनंददायी जावो असें मनःपूर्वक इच्छितो.

दीनानाथ दलाल


| प्रकाशन स्थळ | ऑफसेट छपाई | रंगीत चित्र छपाई | ब्लॉक्स | छपाई |
|---|---|---|---|---|
| दलाल आर्ट स्टुडियो ४०।४२, केनेडी ब्रिज् मुंबई ४. | जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस. गायवाडी, मुंबई ४. | आशा प्रिंटरी. खेतवाडी मुंबई ४. | बॉम्बे प्रोसेस स्टुडियो फोर्ट मुंबई १. प्रभात प्रोसेस स्टुडियो ठाकुरद्वार. मुंबई–४. | स्टेटस् पीपल् प्रेस. घोगा स्ट्रीट .फोर्ट मुंबई १. |


पुढील अंक १ डिसेंबरला नेहमीप्रमाणें प्रसिद्ध होईल!